

# मराठी रियासत

## ५ पुण्यश्लोक शाहू

### ३ पेशवा बाळाजीराव : १

गो. स. सरदेसाई

# A HISTORY OF MODERN INDIA

IN THREE PARTS

MUSSALMANI, MARATHI & BRITISH RIYASATS

# II MARATHI RIYASAT

5

## CHHATRAPATI SHAHU

3 PESHWA BALAJIRAO

PART I

[ 1740-1749 ]

BY

GOVIND SAKHARAM SARADESAI, B. A.

KESHAV BHIKAJI DHAWALE

SHRI SAMARTH-SADAN, GIRGAON, BOMBAY

1944

*Price Rs. Two only*

हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास

# मराठी रियासत

५

## पुण्यश्लोक शाहू

### ३ पेशवा बाळाजीराव

भाग पहिला

[१७४०-१७४९]

लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए.

केशव भिकाजी ढवळे : श्रीसमर्थ-सदन, गिरगांव, मुंबई.

मूल्य दोन रुपये

# दुरुस्ती

पृ० ३२ रघुनाथरावाच्या पत्राची तारीख ५ मे स. १७४८ समजावी.

पृ० ३७, ५८, ६०, १२१ व १९७ यांवर चंदासाहेब साताऱ्यास कैदी असल्याचा उल्लेख आहे. त्रिचनापल्लीस स. १७४१ त कैद होऊन तो भास्कररामाबरोबर वऱ्हाडांत गेला, तेथून स. १७४४अखेर साताऱ्यास आला.

पृ० १२१ त्रिचनापल्ली काबीज केल्याची मिति रामनवमी १४ मार्च स. १७४१.

पृ० १५० पादटीप—पुरंदरे दप्तर भा. १ ले० १५५ वाचावें.

पृ० १५७ वर मुधोजी भोसले यास दत्तक घेण्याचा शाहूचा विचार सांगितला आहे. वैद्य दप्तरांतील कागदांत हा मुधोजी स. १७४७ च्या पितृपक्षांत साताऱ्यास शाहू व त्याची राणी यांनीं पाहाण्यासाठीं आणल्याचा स्पष्ट उल्लेख आहे.

# प्रस्तावना

स. १९४२ च्या एप्रिलांत पुणें येथें बाजीरावाच्या मृत्युदिन-स्मरणार्थ त्याच्या राहात्या वाड्यासमोर सभा भरली, त्या प्रसंगीं मी त्या पेशव्याचा रियासतीचा भाग प्रसिद्ध केला. तदुत्तर त्याचा पुत्र बाळाजीराव याचाही भाग यथावकाश तयार झाला असतां कागदाच्या युद्धकालीन टंचाईमुळें छपाईच्या कामास व्यत्यय आला. ही अडचण प्रकाशक ढवळे यांनीं आस्थापूर्वक निवारण केली म्हणूनच हा भाग आतां बाहेर पडत आहे.

बाळाजीराव पेशव्याचा काल मराठी इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा असून त्याचा साधनसंभारही फार विशाल आहे. पंचवीस वर्षांपूर्वी तयार केलेला माझा भाग अलीकडील संशोधनानें सर्वथा त्याज्य होऊन एकंदर मांडणावळ पुनश्च नवीन बनवावी लागली. सामान्य वाचकांच्या व विशिष्ट अभ्यासकांच्या अपेक्षा भागवायच्या म्हणजे विस्तार होईल तो सहन करणें प्राप्त आहे. त्यांतून या पेशव्याच्या कारभाराचे तीन भाग मूलतःच अलग बनतात—

१ पहिल्या १० वर्षांचा शाहूच्या हयातीचा,
२ त्यापुढील अकरा वर्षांचा दक्षिण हिंदचा, व
३ याच अकरा वर्षांचा उत्तर हिंदचा म्हणजे पानिपतच्या संग्रामांत परिणत होणारा.

एकाच पुस्तकांत हा सर्व विषय द्यायचा म्हणजे सात आठशें पानांचा बोजडपणा उत्पन्न होतो; तो टाळण्यासाठीं सुमारें दोन अडीचशें पानांचे तीन स्वतंत्र भाग या एका पेशव्याच्या कालाचे योजिले आहेत, ते वाचकांनाही सुटसुटीत व अभ्यासाच्या सोयीचे वाटतील यांत संशय नाहीं. अर्थात् पूर्वी बाळाजी विश्वनाथ व बाजीराव हे भाग प्रसिद्ध झाले त्याच धरतीचा हा पुढचा भाग

९ पुण्यश्लोक शाहू, ३ पेशवा बाळाजीराव, भाग पहिला
( १७४०–१७४९ )

या संज्ञेनें मी आज वाचकांस सादर करीत आहें. यापुढचे भागही यथाक्रम लवकरच बाहेर येऊन स्वीकृत कार्याचा माझा भार हलका होईल अशी आशा बाळगतों. शहाजीच्या पहिल्या भागापासून मराठी रियासतीचा हा प्रस्तुतचा भाग अनुक्रमानें सातवा येतो हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

गो. स. सरदेसाई

मु. कामशेत, ता. १४ जानेवारी, १९४४

# अनुक्रमणिका


सूची (शेवटीं) .... ... ... पृष्ठें ९-१५

१ पदप्राप्ति व परिस्थिति

१ पेशवाईवर नेमणूक, २ बाबूजीची खटपट, ३ पदाचीं वस्त्रें प्राप्त, ४ प्रस्तुतची निकड, ५ कौटुंबिक साह्य ... ... पृष्ठें १९-३६

२ पहिली छाप

१ उत्तरेच्या स्वाऱ्या, २ नासिरजंगाचा बंडावा, ३ निजामाची भेट, ४ जयसिंगाची भेट, ५ माळव्याचें फर्मान, ६ बाबूजी नायकाचें उच्चाटन ... ... ... पृष्ठें ३९-५३

३ मराठी सत्तेचा पूर्वेस फैलाव

१ रघूजी भोसल्याचें बीजारोपण, २ भास्कररामाचें आक्रमण, ३ दुर्गापूजेचा विध्वंस, ४ पेशवा–रघूजींची तेढ, ५ अलिवर्दीखान–पेशवा भेट, ६ पेशवा–रघूजींचा संग्राम, ७ पेशवा–रघूजी समेट, ८ अमानुष अत्याचार, ९ सेवेची कदर, १० बंगाल मराठ्यांचा झाला ... ... ... पृष्ठें ५७-८२

४ उत्तर दक्षिण व्यवधानें

१ ओर्छेकराचा दगा, झाशीची स्थापना, २ पेशव्याचें अपूर्व यश, ३ भेलसा काबीज, ४ बुंदेल्यांशीं प्रखर संग्राम, ५ महादेव भट व राणोजी, मृत्यु, ६ नेवाईची स्वारी, ७ महाराष्ट्रीय जीवनावर परिणाम, ८ मातुःश्रीची काशीयात्रा, ९ आंग्रेबंधूंचा विकोप ... ... ... पृष्ठें ८५-११२

५ कर्नाटक राजकारणाचा आरंभ

१ पूर्ववृत्तान्त, २ रघूजीची मोठी स्वारी, ३ निजामाचा मराठ्यांस शह, ४ बाबूजीचे पाय ओढले, ५ सदाशिवरावाची सावरासावर ... ... ... ... पृष्ठें ११५-१३१

६ राजपूत–मराठा बेबनाव

१ प्रकोपाचीं पूर्वचिन्हें, २ जयपुर गादीचें युद्ध, ३ ईश्वरसिंगाची आत्महत्या, मराठ्यांची कत्तल ... ... पृष्ठें १३५–१४५

७ अंतसमयाची छाया

१ नैराश्याचा उद्वेग, २ आमची सत्ता उडाली, ३ नानासाहेब पदभ्रष्ट, ४ अंतर्बाह्य खटपटी, ५ वनवासवाडी, ६ पुढील धन्याचा शोध ... ... ... पृष्ठें १४९–१७४

८ योग्यता व निष्कर्ष

१ अंत्यविधि, २ सकवारबाईचें सहगमन, ३ समकालीन लोकमत, ४ कुटुंबपरिवार, ५ दिनचर्या, ६ कर्मणुकी, व्यवसाय, ७ सौजन्याचें सामर्थ्य, ८ व्याप, ९ पार्श्वभूमि, १० समबुद्धि, ११ दोषाविष्करण, १२ लोभांतील मंडळी, १३ शाहूनगर पृष्ठें १७७-२०८

# १

# पदप्राप्ति व परिस्थिति

## का ल सू ची

| | | | |
|---|---|---|---|
| १७२१ | डिसेंबर | १२ | नानासाहेबाचा जन्म |
| १७३० | जाने. | ११ | लग्न गोपिकाबाईशीं |
| १७४० | जाने. | १८ | गोपिकाबाई ऋतुप्राप्ति |
| ,, | मे-जून | | रघूजी भोसले अल्प काळ सातान्यास |
| ,, | मे | २६ | नानासाहेब कुलाब्याहून पुण्यास दाखल |
| ,, | जून | २ | संभाजी राजे सातान्यास दाखल |
| ,, | जून | ३ | काशीबाई नर्मदेहून पुण्यास दाखल |
| ,, | जून | ५ | नानासाहेब सातान्यास प्रयाण |
| ,, | जून | २५ | नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें |
| ,, | ऑगस्ट | २० | महादेवभट हिंगणे पुण्यास दाखल |
| ,, | डिसेंबर | १७ | चिमाजी आपा मृत्यु |

# १

# पदप्राप्ति, परिस्थिति

१ पेशवाईवर नेमणूक  २ बाबूजीची खटपट
३ पदाचीं वस्त्रें प्राप्त  ४ प्रस्तुतची निकड
५ कौटुंबिक साह्य

**१ पेशवाईवर नेमणूक** ( २५ जून, स. १७४० ).—वैशाख शु. १३ रविवार शक १६६२, ता. २८ एप्रिल, स. १७४० रोजीं बाजीराव पेशवा नर्मदाकांठीं रावेरखेडी येथें मृत्यु पावला. त्या वेळीं त्याचा वडील मुलगा बाळाजी व बंधु चिमाजीआपा आणि महादाजीपंत पुरंदरे, हे कुलाब्यास मानाजी आंगरे याच्या साह्यास गेलेले असून, तेथें त्यांस बाजीरावाच्या मृत्यूची खबर मे महिन्याच्या आरंभीं कळली. पुढें तेथेंच क्रिया वगैरे आटोपून त्यांनीं आंगऱ्याचें प्रकरण मिटविलें. पुढें कुलाबा सोडून परत निघाले, ते सोमवार ता. २६ मे रोजीं रात्रीं पुण्यास दाखल झाले. ता. २८ मे रोजीं पुण्याच्या देशमुख देशपांड्यांनीं नानासाहेबास दुखवटा केला. इतक्यांत बाजीरावाचें लष्कर उत्तरेकडून परत आलें, त्याजबरोबर नानासाहेबाची मातुश्री काशीबाई स्वारींत होती, ती ता. ३ जून रोजीं पुण्यास येऊन पोंचली. त्याच सुमारास साताऱ्याहून शाहूकडून नारो राम मंत्री व जिवाजी खंडेराव चिटणीस हे दोघे नानासाहेबास साताऱ्यास नेण्याकरितां मुद्दाम पुण्यास आले. त्यांसह नानासाहेब व चिमाजी ता. ५ जून रोजीं पुणें सोडून निघाले, ते ता. १३ जून रोजीं साताऱ्यास पोंचले. त्यापुढें बाराव्या दिवशीं म्हणजे २५ जून रोजीं बुधवारीं आषाढ शु॥ १२ स सकाळीं दहा वाजतां शाहू छत्रपतीनें नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें सातारा येथें दिलीं. त्याची खबर मातुश्री राधाबाईस पुण्यास दुसरेच दिवशीं आली, तेव्हां तेथें नौबत सुरू होऊन तोफांचे आवाज झाले. हलकारा आला, त्यास चांदीचें कडें व तिवट बक्षिस दिलें.

नानासाहेबाच्या कारभाराचें रहस्य व त्याची कर्तबगारी यांचा यथायोग्य अंदाज कळण्यासाठीं, त्याचें पहिलें आयुष्य कोठें व कसें गेलें, हें ठोकळ मानानें

सांगितलें पाहिजे. त्याचा जन्म १२ डिसेंबर, स. १७२१ चा आहे.¶ त्याचें प्रथमचें आयुष्य बहुतेक चिमाजीआपाबरोबर सातार्‍यास व लहानमोठ्या स्वार्‍यांत गेलें. वयाचीं आठ वर्षें पुरीं होतांच म्हणजे ता. ११ जानेवारी, स.१७३० रोजीं त्याचें लग्न भिकाजी नाईक रास्ते यांची कन्या गोपिकाबाईशीं जालें.§ त्यानंतर नऊ वर्षांनीं ह्या बाईस ऋतु प्राप्त झाला. ही बातमी १८ जानेवारी, स. १७४० त नानासाहेबास कळली; म्हणजे त्या वेळीं तो कोठें तरी स्वारींत होता. लग्नानंतर दहा वर्षांनीं ऋतुप्राप्ति झाली, यावरून लग्नांत तिचें वय सहा वर्षांचें असावें. पुढें गोपिकाबाई बहुधा स्वारींत वगैरे शक्य तितकी नवर्‍याबरोबर जात असे. नानासाहेबाचें प्रथमचें आयुष्य बहुतेक सातारा येथें शाहूजवळ गेलें. स. १७३५ पासून पुढें तो हळूहळू चिमाजीआपाबरोबर बाहेर जाऊं लागला. स. १७३७ पासून दोन वर्षें तो शाहूबरोबर मिरजेचे स्वारींत होता. अर्थात् वसईच्या मोहिमेंत तो नव्हता. खुद्द बाजीरावाबरोबर तो स्वारींत गेलेला आढळत नाहीं. बाजीरावाच्या मृत्यूपूर्वी थोडे दिवस रघुनाथरावाची मुंज व सदाशिवरावाचें लग्न हे समारंभ अनुक्रमें ता. ४ व ७ फेब्रुवारी, स. १७४०त पुण्यास झाले, त्यास शाहू छत्रपति बाळाजीच्या आग्रहावरून

¶ बाळाजी बाजीरावाचा जन्म छ २८ सफर, मार्गशीर्ष वद्य १३ सह १४ मु॥ सातें ता॥ नाणेमावळ येथें घटी ४१ पळें ५२, ज्येष्ठा नक्षत्र, प्रथम चरणीं झाला. कुंडली रा. खं. २ पृ. ४६ वर आहे.




| रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु |
|---|---|---|---|---|
| ८ | ७ | ० | ७ | ७ |
| ६ | १९ | १५ | २२ | ६ |
| ११ | २७ | ५२ | १४ | २ |
| शुक्र | शनि | राहु | केतु | लग्न |
| ७ | ७ | ८ | २ | ४ |
| ९ | २१ | २२ | २२ | २० |
| १३ | ५ | ५० | ५० | ४५ |

§ हें लग्न खुद्द शाहूमहाराजांनीं जुळविलें अशी आख्यायिका आहे. भिकाजी नाईकांनीं महाराजांस दिवाळीच्या लक्ष्मीपूजनानिमित्त आपल्याकडे फराळास बोलाविलें, त्या प्रसंगीं ही मुलगी हुशारीनें वाढीत असलेली पाहून महाराजांनीं नायकांस कळविलें, " या मुलीचें लग्न आम्ही करितों, आमची गोष्ट तुम्हीं मान्य केली पाहिजे." नायकांनीं कबुली दिली आणि वांई येथें समारंभ झाला. खुद्द महाराज स्वारीनिशीं त्या प्रसंगास हजर राहिले. गोखले घ. इ., पृ. ३.

मुद्दाम पुण्यास आले होते. म्हणजे पेशव्याच्या कुटुंबावर व विशेषतः नाना-साहेबावर शाहूचा लोभ केवढा होता, हें यावरून दिसून येतें. बाजीराव त्या वेळीं स्वारींत असून वरील समारंभास हजर नव्हता. नानासाहेबास पेशवाई मिळाल्यावर स. १७४० चे ऑक्टोबरांत चिमाजीआपाची प्रकृति विशेष बिघडून ता. १७ डिसेंबर रोजीं तो मरण पावला. सारांश, स. १७४० हें वयाचें एकोणिसावें वर्ष नानासाहेबाच्या आयुष्यांत मोठें क्रान्तिकारक समजलें पाहिजे. आठ महिन्यांच्या अवधींत घरांतले दोन पराक्रमी पुरुष नाहींसे झाले, आणि पेशवाईपद मिळून मराठशाहीच्या राज्यकारभाराचें ओझें त्याजवर येऊन पडलें. पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यावर तीन महिने पावेतों त्याचा मुक्काम साताऱ्यासच होता. पुढें तो सातारा सोडून ११ ऑक्टोबरास पुण्यास आला. पुढील जुलै मासपावेतों तो साताऱ्यास गेला नाहीं.

नानासाहेबास पेशवाई मिळाली त्या सुमारास कोल्हापुरचा संभाजी शाहूचे भेटीस साताऱ्यास आला होता. या भेटीची थोडी हकीकत पूर्वी येऊन गेली आहे. या भेटींत शाहूच्या पश्चात् संभाजीनें गादीवर बसावें, असा बारा कलमांचा गुप्त करार संभाजी व नानासाहेब यांचा झाला. ता. २जून, स. १७४०ला ' संभाजी राजे जेजुरीस आले, ' आणि सोमवार ता. ३० मार्च, स. १७४१ रोजीं ' महाराज रा. संभाजी राजे आज्ञा घेऊन कोल्हापुरीं आपल्या स्थळास गेले. ' § कराराचा मतलब कोल्हापुर-सातारा गादी एक करण्याचा होता. नानासाहेबाच्या पेशवेगिरीचें पहिलें मोठें कारस्थान हा करार होय. दुहीच्या योगानें राज्याचें होणारें नुकसान नानासाहेबास व जवळच्या विचारी माणसांस कळून चुकलें असून, बाजीरावाच्या हयातींत तें शल्य काढून टाकण्याची संधि आली नाहीं. ही गोष्ट नानासाहेब व चिमाजीआपा यांनीं मनावर घेऊन पुढील योजना ठरविली. संभाजी शाहूस भेटण्यासाठीं साताऱ्यास आला. प्रतिनिधीनें नानासाहेबाची बाजू सांवरून धरिली. हा गुप्त करार शाहूच्या परोक्ष झाला असला पाहिजे; कारण त्यास या कराराची खबर कळती तर नानासाहेबावर लगेच त्याची इतराजी झाली असती. संभाजीनें आपल्या पश्चात् सातारच्या गादीवर बसणें शाहूस पसंत नव्हतें आणि बाहेरून कितीही गोडी दिसली तरी भाऊबंदकीचा अंतर्यामींचा फार दिवसांचा वैरभाव, त्याच्या मनांतून साफ गेला नव्हता. मात्र दोन राज्यांचें एक राज्य करण्याची

§ का. सं. प. या. २४६ व २४९, ना. रो. १., १९३, शा. रो. १७८.

नानासाहेबाची कल्पना राष्ट्रहिताची व मुत्सद्देगिरीची होती. शाहूला संतान नव्हतें. राज्याची वृद्धि होत होती तशा नानाप्रकारच्या अडचणीही वाढत होत्या. शाहूच्या हयातीपर्यंत मराठी राज्याचें गाडें कसेंबसें चालेल; परंतु पुढें काय ? हा प्रश्न धूर्त मुत्सद्यांच्या दृष्टीपुढें डोकावूं लागला. व्यवहारास धनी म्हणून कोणी तरी पाहिजे. अशा स्थितींत शाहूच्या पश्चात् संभाजीस सातारची गादी देऊन घरची मजबुदी करावी अशी कल्पना निघाली आणि त्याप्रमाणें स. १७४० च्या भेटींत नानासाहेबानें संभाजीशीं त्याजबद्दलची वाटाघाट करून वरील करार बाळाजी व चिमाजीआपांनीं संभाजीस लिहून दिला, त्याचा आशय ‘ सातारचें राज्य स्वामीचें आणि एकछत्री शिक्का महाराजांचा ( संभाजीचा ) चालावा. शाहूमहाराजांचा जीवात्मा आहे, तों बाह्यात्कारीं आम्ही त्यांचे सेवक, परंतु अंतर्यामीं स्वामींचे, शाहूमहाराज यांनीं कैलासवास केल्यावर दोन्ही राज्यें स्वामींचीं आणि आम्ही सेवक स्वामींचे. स्वामींच्या आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं, अशी शपथ दिली. दोन्ही राज्यें एक करून एकछत्री स्वामींचा शिक्का चालावा आणि आम्हीं शाहूमहाराज यांचे कारकीर्दीप्रमाणें सेवा करून असावें, हें प्रमाण. यासी अंतर करणार नाहीं. अशी विनंति सेवकांनीं शाहूमहाराज असते समयीं किल्ले सातारच्या मुक्कामीं केली होती. ’

शाहूच्या मृत्यूपूर्वी नऊ वर्षें पेशव्यांनीं हा ठराव संभाजीशीं केला आणि शाहूच्या मृत्यूनंतर तो अमलांत आणणें शक्य झालें नाहीं. रामराजाची स्थापना होऊन हें कारस्थान संपलें, तेव्हां हा तह पाळण्याची पेशव्यांस जरूर राहिली नाहीं. परंतु स. १७४० च्या संभाजीच्या भेटींत हा महत्त्वाचा उपक्रम पेशव्यांनीं सुरू केला हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. हा राज्याच्या अंतिम हिताचा उत्तम मार्ग होता यांत संशय नाहीं. ‘ कोल्हापुरचें करूं नये ’ अशी स्पष्ट लेखी आज्ञा शाहूनें केली म्हणूनच हा बेत सिद्धीस गेला नाहीं. पण सुरळीत राज्यव्यवस्थेस विरोध करणारीं जितकीं प्रकरणें मिटवितां येतील तितकीं चांगलीं अशी नानासाहेबाची सामान्य पद्धत असून, तदनुसार त्यानें संभाजी व जिजाबाई यांजबरोबर सख्य राखिलें आणि पुढेंही हा तह मोडल्याबद्दल संभाजीनें पेशव्यास दोष दिला नाहीं. यावरून ‘ बाह्यात्कारीं त्यांचे सेवक ’ हें कपटवाक्य लिहून देण्यांत पेशव्यानें शाहूशीं राजद्रोह केला, असें होत नाहीं. या तहानें शाहूचें कांहीं एक नुकसान नव्हतें आणि वास्तविक

मरणसमयीं शाहूनें रामराजाऐवजीं संभाजीसच साताऱ्यास आणण्याची व्यवस्था केली असती, तर ती राज्याच्या दृष्टीनें ज्यास्त फायदेशीर झाली असती. या गोष्टींचा विचार पुढें यथास्थळीं येणार आहे. एकोणीस वर्षांच्या नानासाहेबांनें पेशवाई प्राप्त होतांच एवढें मोठें कारस्थान अंगावर घेतलें आणि पराक्रमी बापाच्या मृत्यूनें हताश न होतां जरूर तो राज्याचा उद्योग झपाट्यानें पुढें चालविला हें विशेष होय.

**२ बाबूजीची खटपट.**—नानासाहेबास पेशवाईपद न देतां तें बाबूजी नाईक बारामतीकरास द्यावें, अशी खटपट बाजीरावाच्या मृत्यूनंतर रघूजी भोसल्यानें केली. स. १७४० त रघूजी कर्नाटकचे स्वारींत असतां तिकडेच बाजीरावाच्या मृत्यूची खबर त्यास समजली. त्याबरोबर स्वारीचें काम तसेंच टाकून तो अल्पकाळ पेशवाईच्या खटपटीसाठीं उतावळीनें साताऱ्यास आला. " बाबूजी नाईक फौज बाळगून होते; त्यांस पेशवाई द्यावयाचें बोलणें रघूजी भोसले यांनीं घातलें, तेव्हां महादोबा पुरंदरे यांनीं गोविंदराव चिटणिसाचे विद्यमानें दरसाल महाराजांस नजर करार करून नानासाहेबास वस्त्रें देवविलीं." बाबूजीस पेशवाई देण्यांत ताराबाईचें अंग होतें, असा उल्लेख आढळतो. ‡ रघूजी भोसल्याचें व पेशव्याचें सूत असें कधींच नव्हतें आणि बाजीरावाच्या घराण्यांतून पेशवाईपद निघेल तर आपल्या पक्षास पुष्टि येईल आणि कदाचित् तेणेंकरून पुढेंमागें आपल्या मुलास सातारची गादी मिळण्यास मदत होईल, अशी रघूजीची भावना होती. कांहीं असलें तरी ह्या त्याच्या खटपटीस यश आलें नाहीं आणि फारसा अवधिही मिळाला नाहीं. बाळाजीस पेशवाईचीं वस्त्रें स. १७४० च्या ऑगस्टांत मिळालीं हें डफचें विधान चूक आहे. शाहूनें २५ जूनलाच म्हणजे बाजीरावाच्या मृत्यूनंतर बरोबर दोन महिन्यांनीं बाळाजीस वस्त्रें दिलीं. § त्यास साताऱ्यास आणण्यासाठीं विश्वासांतील इसमांस शाहूनें पुण्यास पाठविलें. यावरून त्यास बाबूजी पसंत नव्हता हें स्पष्ट आहे. साताऱ्यास आल्यावर नानासाहेबास पेशवाई मिळेपावेतों बाराच दिवस गेले. त्या अवधींत थोडीबहुत खटपट झाली असेल, परंतु डफनें त्याचें अवडंबर माजविलें तितकें महत्त्व त्या प्रश्नास त्या वेळीं आलें नाहीं. प्रतिनिधि रघूजीस अनुकूल नव्हता आणि नानासाहेबानें त्यास अगोदरच सर्वस्वीं आपल्या पक्षांत मिळवून घेतलें होतें. वास्तविक नानासाहेबाच्या

‡ भा. व. श. पृ. १६. § ना. रो. १. १३३.

लायकीसंबंधानें तत्कालीन एकूणएक प्रमुख व्यक्तींचें एकमत होतें. ब्राह्मण व ब्राह्मणेतर, सर्व सरदार व मुत्सद्दी, नानासाहेबास अनुकूल होते, आणि वाढत्या राज्याचें ओझें छत्रपतीच्या उतारवयांत आंगावर घेण्यास तत्कालीन मंडळींत हा तरुण व होतकरू नानासाहेबच लायक होय, अशी सामान्य समजूत असून शाहूची तर त्याजवर बालंबाल मर्जी होती. बापानें व आजानें विलक्षण करामत करून मराठशाहीच्या उद्योगास विशिष्ट दिशा लाविली होती. ते उद्योग तडीस नेण्याचें सामर्थ्य दुसऱ्या कोणाचे अंगीं नाहीं, हें समजूनच त्यास पेशवाई देण्यांत शाहूनें योग्य तेंच केलें. नेहमींच्या पद्धतीनें हा वस्त्रदानाचा प्रकार सुलभ रीतीनें पार पडला.

शाहूला मनुष्याची पारख होती; किंबहुना, प्रत्येकाची योग्यता ओळखून त्याजकडून योग्य ती कामगिरी घेऊन राज्याचा परिपोष करणें, हेंच काम त्यानें चांगलें केलें, असें म्हणतां येईल. महाराष्ट्रीयांच्या अंगीं अठराव्या शतकाच्या ऱ्हासकाळांत जितका म्हणून कर्तृत्वसमुच्चय होता, तितक्याचा शाहूनें उपयोग करून दाखविला. यापेक्षां जास्त करामत करून मराठशाहीचें स्वातंत्र्य त्यानें चिरंतन करून ठेवलें नाहीं, याजबद्दल एकट्या शाहूस किंवा अमुक एका विशिष्ट व्यक्तीस जबाबदार धरतां येत नाहीं; त्यास सर्व राष्ट्र जबाबदार आहे. नानासाहेबासारख्या तरुणाच्या हातांत राज्यसूत्रें देण्यांत शाहूनें चांगलीच योजकता दाखविली. स. १७२० त बाजीरावास पेशवाईचा कारभार सांगतांना व पुढें वीस वर्षांनीं नानासाहेबास तें काम देतांना शाहूचे विचार पुष्कळ अंशीं भिन्न असावे. दोन्ही प्रसंग वेगळ्या स्वरूपाचे होते. पूर्वी शाहू उमेदींत होता, तर आतां उतार वयांत होता. बाजीरावासंबंधानें शाहू नेहमीं साशंक असे, तसा तो नानासाहेबासंबंधानें नव्हता. नानासाहेबास तो केवळ पुत्र समजे. पेशवाई देतांना बाजीरावास शाहूनें जी कामगिरी सांगितली होती, ती त्यानें बरीच तडीस नेऊन राज्याची वृद्धि केली. तेव्हां त्याहीपेक्षां कांहीं तरी जास्त करामत नानासाहेब करील, अशी शाहूची अपेक्षा होती ती वावगी नव्हती. त्या वेळीं प्रतिनिधीला तर स्वतःचे व्यवहारसुद्धां संभाळण्याची ताकद नव्हती. रघूजी भोसले किंवा इतर सरदार व्यक्तिशः कितीही शूर व कर्तृत्ववान् असले तरी पेशवेगिरीचें आवळ्यांची मोट बांधण्यासारखें बिकट काम अंगावर घेण्यास ते स्वतःच आपणांस लायक समजत नव्हते. नानासारख्या तरुण पुरुषाच्या हातांत शाहूनें राज्यकारभाराचीं सूत्रें दिलीं,

म्हणूनच मराठशाहीचें आयुष्य पन्नास पाऊणशें वर्षें तरी वाढलें. नाहीं तर १७५७ तील प्लासीबरोबर मराठशाहीचीही पानिपतच्या पूर्वीच प्लासी झाली असती. इंग्रजांचे तत्कालीन लेख वाचले आणि त्यांचे कावे मनांत आणिले, म्हणजे मद्रास किंवा बंगालप्रमाणें १७५७ च्याच सुमारास साताऱ्यासही इंग्रजशाही झाली नाहीं, याचें श्रेय या पेशव्यास दिलें पाहिजे. यासंबंधानें तत्कालीन बखरीचें मत विचारार्ह दिसतें, तें असें—

' बाजीराव बल्लाळ पेशवे वैशाख शु॥ १३ स कैलासवासी झाले. महाराजांला फार वाईट वाटलें. तीन दिवस चौघडा बंद होता. कचेरी नाहीं. उदास मर्जी राहिली. नंतर बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासा० यांस पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. मोठा समारंभ झाला. संपूर्ण दरखदार व सरदार लहान थोर यांस वस्त्रें सरकारांतून दिलीं. पेशव्यांचे तैनातीस होते त्यांस महाराजांनीं सांगितलें कीं, बाजीराव लहान वय होऊन आपले उमेदींत दहा पांच सरकारच्या कामगिऱ्या यश संपादून केल्या. सरकारांत द्रव्यही मिळवून आणून दिल्हें. प्रतारणा ठेविली नाहीं. बाळाजीपंत लहान हुशार आहे. सर्व यथास्थित चालेल. परंतु सर्वांस माझें एक मागणें आहे, तें देतों म्हणून कबूल कराल तर बोलतों, म्हणून सर्वांस विचारिलें. ते समयीं विनंति केली कीं, महाराजांस मागावयाजोगी वस्तु आम्हांजवळ काय आहे, आणि न देऊं तर आमचें जन्म व्यर्थ; आज्ञा होईल त्याप्रमाणें शरीरसुद्धां देण्यास राजी आहों. आज्ञा मात्र झाली पाहिजे. चाकरींत अंतर होणार नाहीं. असें ऐकल्यावर महाराजांनीं उत्तर केलें, आतां तुमचे म्हटल्यावर बोलतों, देतों होय म्हणून उत्तर केलें. ते समयीं महाराज सांगूं लागले कीं, बाळाजीपंत लहान आहे, मसलत उभी करील, जाईल, हूडपणा करील, पत घेतली असें होऊं न देतां, याजला सांभाळून, मसलतीस एकदील होऊन, याचा लौकिक होईल असें तुम्ही करून दाखवा, हें मागणें आहे. म्हणतां सर्वांनीं मुजरा करून, महाराजांचें लक्ष यांचे ठिकाणीं आणि आम्ही हरामखोरी करूं तरी ईश्वर आम्हांस महाराजांचे घरीं अन्न न देवो,· असें बोलून पायावर शपथहात ठेवून बोलले. महाराज संतोषी झाले, निरोप दिल्हा. ' ¶

**३ पदार्चीं वस्त्रें प्राप्त**.—नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें ता. २५ जून, स.१७४० रोजीं मिळालीं, त्यांची यादी व किंमत उपलब्ध आहे. वस्त्रांची किंमत

¶ भा. व. २ मधील शा. म. ब. पृ. ७६.

रुपये २३०, चिमाजीस दिलेल्यांची रुपये २०० व यांशिवाय प्रत्येकास मोत्यांचा तुरा एक (किंमत २०० रु.) व निमचा आणि कट्यार साधी इतके जिन्नस होते. विरूबाईनेंही उभयतांस आणखी निराळीं वस्त्रें दिलीं, त्यांची किं. नानासा०स रु. ११० व आपास रुपये १०० अशी होती. त्याच प्रसंगीं महादाजी अंबाजी पुरंदरे यास पेशव्यांची मुतालकी करार करून देण्यांत आली. मुतालिक म्हणजे, धन्याचे ऐवजीं महाराजांजवळ राहून काम करणारा कारभारी. नानासा०चे कारभारी निरनिराळ्या वेळीं निरनिराळे होते. शाहूच्या हयातीपर्यंत मुतालिकास सातार्‍यास राहावें लागत होतें. पुढें रामराजाचे कारकीर्दींत छत्रपतीची मुखत्यारी नाहींशी झाल्यावर मुतालिकाचेंही प्रयोजन राहिलें नाहीं, फक्त कारभार्‍याची जरूर राहिली. नानासाहेबाचे कारभारी येणेंप्रमाणें झाले—

स. १७४०–५० महादाजी पुरंदरे; १७५०–५३ रामचंद्र बाबा व सदाशिवराव; १७५०–६० सदाशिवराव; १७६०–६१ नीलकंठ म. पुरंदरे.

पेशवाईचीं वस्त्रें दिल्यावर शाहूनें नवीन पेशव्यास मुकासे गांव एकंदर ३० बाहेर ठिकठिकाणीं नेमून दिले. हे गांव निरनिराळ्या सरदारांच्या ताब्यांतले होते. सबब ते पेशव्यांकडे बिनतक्रार चालविण्याबद्दल शाहूनें रघूजी भोसले, फत्तेसिंग भोसले व दुसरे कित्येक सरदार यांस त्याच समयीं ताकीदपत्रें पाठविलीं. ¶

वस्त्रें देतांना शाहूनें बाळाजीस आज्ञा केली कीं, 'बाजीरावांनीं थोरले बाळाजीपंत यांचे मागें बहुत सेवा निष्ठेनें करून मोठमोठीं कार्यें करून दाखविलीं. शेवटीं इराणीचें पारिपत्य करून बादशाही स्थापावी, म्हणोन रवाना केले. तेथें आयुष्य थोडें झालें. त्यास त्यांचे पुत्र तुम्ही, पातशाही रक्षून हिंदुस्थान सर्व आपलें करावें, ऐसा बेत त्यांहीं केला तो सिद्धीस तुम्हीं न्यावा. अटकेपार घोडे चालवावे, ऐशी आज्ञा करून पुण्यास जावयास निरोप दिल्हा.' बाजीरावास जी अडचण आरंभीं पडली तीच नानासा०सही पडली. वीस वर्षांच्या तरुण मुलानें मोठमोठ्या वृद्ध व अनुभवी मंडळीला आपल्या ताब्यांत ठेवणें सोपें काम नव्हतें. प्रतिनिधि, बाबूजी नाईक, दमाजी गायकवाड, रघूजी भोसले, ताराबाई वगैरे कित्येक मंडळींचा नानासाहेबास विरोध होता, तो सवड सांपडतांच प्रगट होत असे. या मंडळीस कह्यांत ठेवणें नानासा०स बरेंच

¶ शा. रो. ११२, ११३, ११४, ना. रो. १.१३३, पु. रो. पृ. ३५, का. सं. प. या० ४९७, चि० ब० पृ. ७७–७८

जड गेलें. स. १७८४ त पिट्ट इंग्लंडचा मुख्य प्रधान झाला, त्या वेळीं त्याचें वय तेवीस वर्षांचें होतें ही गोष्ट या प्रसंगानें मनांत येते.

'नंतर वऱ्हाडप्रांत हिंदुस्थान पाहून यावें, असा विचार करून महाराजांची आज्ञा घेऊन गेले. खंडण्या घेतल्या. हिंदुस्थानांत जाऊन पोंचतात तों, गोविंदपंत बुंदेले सामोरे आले आणि द्रव्यही दिलें. लोकांस हुशारी आली. कुच दरकुच कोठें राजेरजवाडे यांनीं मेजवानीस ठेवून घेतलें तरी राहणें. पूर्वी बाजीरावाची जरब होती, कामदार तेच वागवणार, फौजी लोक सर्व हुशार, कांहीं आयास पडला नाहीं. स्वारी करून उज्जनीस आले.' अशा उत्साही वृत्तीनें नानासाहेबानें राज्याचा उद्योग चालू केला. बाजीरावानें केलेल्या उद्योगाची तड पोंचविण्यास नानासाहेबाची किती जरूर होती, आणि शाहूनें ही योजना दूरवर विचार करून कां केली, याचा उलगडा अशा तत्कालीन लेखांनीं होतो.

**४ प्रस्तुतची निकड.**—वर्धिष्णु राज्याच्या कारभारांत कोणत्याही प्रकरणास खळ असा कधीं पडत नसतो. एकांतून दुसरें, दुसऱ्यांतून तिसरें अशीं कामें निघत जातात. बाजीरावाच्या वीस वर्षांत उत्तर हिंद, कर्नाटक, पश्चिम किनारा, निजामाकडील पूर्व बाजू अशा सर्व दिशांकडे मराठशाहीचा व्याप वाढत चालला होता, तो सहज लीलेनें त्यानें हातीं घेतला आणि अहोरात्र खपून ज्या वेळीं जो विषय पुढें आला, तो त्या त्या वेळच्या निकडी ओळखून त्यानें निभावून नेला. अशीं निकडीचीं कामें खालीं दाखविलेलीं सहज दिसतात—

१. माळवा प्रांत मराठ्यांचे ताब्यांत आला होता, त्याच्या सनदा पैदा करून तेथील कारभाराची व्यवस्था बांधून देणें;

२. दिल्ली येथें बादशहाजवळ आपलें राजकारण भक्कम बनविणें;

३. महाराष्ट्रांत निजाम उल्मुल्कचा अडथळा मराठी राज्यास पदोपदीं होत असे, त्याचें निवारण युद्धानें किंवा सलुखानें घडवून आणणें ;

४. कर्नाटकांत अत्यंत बेबंदशाही माजली होती. औरंगजेबाच्या युद्धानंतर त्या प्रदेशाचा मालक कोण हें ठरवून तेथील लहानमोठ्या नबाबांस व पाळेगारांस एका व्यवस्थेंत बांधून घेणें;

५. पश्चिम किनाऱ्यावर मराठ्यांची सत्ता डळमळित होती, वसई हातची गेलेली परत घेण्यासाठीं पोर्तुगीझ शिकस्त करून राहिले होते, त्यांत इंग्रज

व आंगरे यांचा संबंध येऊन पेशव्याची हुकमत चालत नसे ती सुरळीत करणें. हे सर्व प्रकार दृष्टीपुढें वागवून त्यांतच नानासाहेबानें शक्य तितकी यशःसिद्धि मिळविली हें उत्तरोत्तर स्पष्ट होईल.

ता. २५ जून, स. १७४० पासून ता. २३ जून, स. १७६१ पावेतों बरोबर एकवीस वर्षें नानासाहेबानें पेशवाईचा कारभार जवळ जवळ पूर्ण मुखत्यारीनें केला. पैकीं पहिल्या नऊ वर्षांत त्याजवर शाहूचें नियंत्रण होतें. तें जरी उत्तरोत्तर ढिलें होत गेलें, तरी त्यामुळें पेशव्याची चिंताही दुणावली. शाहूच्या मृत्यूपासून पुढील बारा वर्षांत त्याला कारभारांत पूर्ण स्वतंत्रता होती, पैकीं पहिलीं दोन वर्षें पुढील घडी बसविण्यांत फुकट गेलीं. ताराबाईच्या कारस्थानांत दमाजी गायकवाड सामील झाला, त्याचें निराकरण करून नानासाहेबानें साताऱ्याचा नाद सोडून पुण्यास आपलें बस्तान बसविलें, तेणेंकरून साताऱ्याचें महत्त्व आपोआप कमी झालें आणि इतउत्तर छत्रपति केवळ नामधारी बनले. शेवटच्या नऊ वर्षांत नानासाहेबाचा उद्योग झपाट्यानें वाढलेला दिसतो. पानिपतच्या अरिष्टानें त्याच्या उद्योगास कायमचें ग्रहण लागलें तें बाजूस ठेवून विचार केला तर मराठशाहीची खरी वृद्धि याच पेशव्याचे वेळीं झाली असें म्हणतां येईल. पहिल्या नऊ वर्षांत मात्र शाहू जिवंत असेपर्यंत नानासाहेबाचें चित्त जितकें बाह्य व्यवसायांत तितकेंच सातारा राजधानींत गुंतलेलें असे.

बाजीरावाचें वैशिष्ट्य धडाडी व युद्धनैपुण्य होय असें सांगतां आलें तर नानासाहेबाचें वैशिष्ट्य हिशेबी कारभार असें थोडक्यांत सांगतां येईल. तो वारंवार स्वाऱ्यांत गेला आणि युद्धप्रसंगांतही लक्ष देणारा होता; तथापि युद्धाची ही बाब त्यानें सर्वथा आपल्या हस्तकांकडून सिद्धीस नेली. द्रव्यार्जनाचे उगम, ते कायम ठेवण्याची दक्षता आणि सर्व ठिकाणीं सारखी नजर ठेवून एकंदर राज्याचे हिशेब वेळच्या वेळीं पाहून उत्पन्नाची निगा बरोबर ठेवणें या बाबतींत नानासाहेबाचा हात धरणारा दुसरा पेशवा झाला नाहीं. पैसा आणणें, कर्ज वारणें, महाराष्ट्राचें दैन्य निवारण करणें हाच विषय त्याच्या एकंदर पत्रसंभारांत व व्यवस्थेंत मुख्यतः नजरेस येतो. हल्लीं जसें राज्याचें सार्वजनिक कर्ज सर्व समाजावर विभागण्याची सोय आहे तशी त्या वेळीं नव्हती. कर्जाचा बोजा व्यक्तिशः मुख्य चालकावर असून त्याची एकट्याची मान सावकारांकडे गुंतलेली असे. बाजीरावाच्या मृत्युसमयीं राज्याचें कर्ज चौदा लाखांचे आंतबाहेर

होतें आणि तें तीस सावकारांत विभागलेलें होतें. ना. रो. २.२५०.२५४ चे कागद या विषयांत अभ्यसनीय आहेत, त्यांत सावकारांची नांवनिशी व कर्जाचे आंकडे आहेत. बाबूजी नायकाचे कर्जाचा आंकडा छत्तीस हजार आहे. व्याजाचा दर दरमहा दरशेंकडा एक रुपयापासून अडीच रुपये पावेतों लावलेला आढळतो. म्हणजे पैसा त्या वेळीं अत्यंत महाग असून चालकांची पत फार अल्प होती असें म्हणावें लागतें. कर्जापायीं मानेस लागणारी ही तांत नाहींशी करण्याचा पेशव्याचा प्रयत्न हरएक व्यवहारांत दिसून येतो. तहाचे वगैरे ठराव झाले त्यांत रोख पैसा देण्याचें कलम आहे. स.१७४१ च्या मार्च महिन्यांत त्रिचनापल्लीचा कारभार मुरारराव घोरपड्याकडे सोपण्यांत आला, तेव्हां त्यानें दरसाल वीस हजार रुपये पेशव्याकडे पाठवावे असा ठराव होता. वसईकडील प्रदेशाची अशीच सनद पेशव्यानें आपली गरिबी महाराजांस दाखवून अल्पांत करून घेतली. नर्मदोत्तर प्रदेशाची खंडणी यावयाची त्याची व्यवस्था त्यानें शाहूकडून ठरवून घेतली.§ 'राजश्री पंतप्रधानांस कर्ज आहे त्याची वांटणी लोकांवर घातली आहे' असे उल्लेख आढळतात, म्हणजे विशिष्ट कारणांनीं कर्जाचा बोजा विभागण्यांत येत असे हें उघड होतें. बाजीरावानें केलेल्या उद्योगांत हिशेबी एकसूत्रीपणा व वसुलाची व्यवस्था बनली नव्हती, तीच मुख्यतः नानासाहेबानें सर्वत्र उत्पन्न केली. मराठे सरदार दक्षिणोत्तर प्रदेशांत संचार करीत गेले, त्यांच्या उद्योगास नियमित वळण लावण्यासाठींच नानासाहेबानें पहिल्या स्वाऱ्या केल्या. निजामास आळा घालून कर्नाटक जिंकणें हा त्याच्या उत्तरायुष्याचा मुख्य उद्देश पुढें बनला. आरंभीं तीन स्वाऱ्या त्यानें लागोपाठ उत्तरेंत केल्या, त्यांत हिंदुपदपातशाहीची निर्मिति स्पष्ट दिसते. राजपुताना, बुंदेलखंड, दुआब व पुढें बंगाल–बिहारपर्यंतचा प्रदेश त्याच्या उद्योगाचें क्षेत्र बनला.

एका जागीं न बसतां सारखें हिंडत राहणें हा एकंदर पेशव्यांचा नित्यक्रम नानासाहेबानें उत्कटत्वानें चालविला असें रोजनिशींतील त्याच्या मुक्कामांवरून सहज दिसतें. प्रवासांत देखील कामाच्या जरुरीप्रमाणें चारदोन दिवसांपेक्षां जास्त वास्तव्य एकाच ठिकाणीं झालेलें दिसत नाहीं. लग्नकार्यादि प्रसंगांची अडचणही त्यास व्यत्यय आणीत नसे. एका पुरुषानें नानाविध व्यवहारांत अहोरात्र लक्ष घालून सारखी घासाघीस सोसल्याचीं उदाहरणें

§ रा. खं. २ शकावली. पृ. ८७ ; पु. द. १, ११९.

पेशव्यांच्या इतकीं फार थोडीं मिळतील. रोज नवीन काम, नवीन स्वारी, नवीन अडचण, नवीन उपाय अशी कर्तव्यपरंपरा सारखी चालू असे. याची दगदग चित्तास न वाटतां उलट तोच विषय त्यांच्या नेहमींच्या सरावाचा बनला होता. राज्याचा व्याप वाढता व पसरलेला असला, म्हणजे लहानापासून थोरापर्यंत प्रत्येकास अशा दंगलींत सदैव कसें राबावें व झिजावें लागतें हें सांगणें नकोच.

पुण्यानजीकच्या भागावर तर पेशव्याचें लक्ष जास्तच तीक्ष्ण होतें. हा घांटावरचा व कोंकणांतील प्रदेश एक प्रकारें त्याच्या खास मालकीचा होता. या प्रदेशाचा वसूल, न्याय, देवस्थानादि लोकोपयोगी कामें करण्याच्या व्यवसायांत पेशव्याचें व त्याच्या हस्तकांचें मन वेधलेलें असे. लष्करभरती देखील पुष्कळशी या नजीकच्या परिचित प्रदेशांतून होई. ठिकठिकाणीं वावरणाऱ्या सरदारांवर मध्यवर्ती सत्तेचें भरपूर नियंत्रण मुख्यतः नानासाहेबानें घातलें. असें करतांना अनेक घरच्या व बाहेरच्या मंडळींशीं त्याचे वारंवार खटके उडत असल्यास नवल नाहीं. त्यांतल्या त्यांत नानासाहेबाची स्वभावप्रवृत्ति गोडीनें व तडजोडीनें अंतःकलह मिटवून काम चालीस लावण्याची असे. याच्या उलट सदाशिवराव भाऊची वृति थोडीशी उद्दाम व ताटकन तोडण्याची होती. प्रसंगीं अपमान सोसून दुसऱ्यावर आपला शह बसविण्याचें धोरण नानासाहेबाचें विशेष होतें. खरें म्हटलें तर हे दोघेच पुरुष एकंदर राज्याचा कारभार एकमेकांच्या विचारानें सिद्धसाधकपणें रेटीत असत. प्रत्यक्ष युद्धाच्या हालचाली नानासाहेबानें स्वतःच्या अंगावर घेतल्या नाहींत. सत्ताधीश व वकील यांच्या भेटी घेऊन व राजकारणी बोलणीं बोलून निकाल करण्याचा त्याचा सामान्य प्रघात होता. "सरदारांनें काम करावें, जातीनिशीं जायां होऊं नये," हें त्याचें सामान्य धोरण होतें. युद्धसंग्रामांत त्यानें स्वतः भाग फारसा कधीं घेतला नाहीं, मागें तळांवर राहून मुत्सद्देगिरीची देखरेख तो [illegible]वी. तो उत्कृष्ट कलमबहाद्दर होता. या बाबतींत त्याची बरोबरी करणारा दुसरा इसम पेशवाईंत झाला नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. युद्धाचें फल तहानें पदरांत पाडून घ्यावयाचें असतें हें तत्त्व तो उत्कृष्ट पाळी. त्याची नजर सर्वत्र सारखी फिरत राही. श्रीरंगपट्टणांतून दिल्लीचा कारभार उरकणें किंवा बुंदेलखंडांतून कर्नाटकची उस्तवारी करणें असे प्रकार त्याच्या लेखनांत भरपूर दिसतात. स्वहस्तानें उत्कृष्ट पत्रें बोलबोल म्हणतां लिहून

व्यवहार उलगडण्यांत तो अत्यंत निपुण होता. त्याचीं पुष्कळशीं पत्रें स्वतः लिहिलेलीं, निदान प्रत्येक पत्रांत स्वहस्तानें बराचसा मजकूर वाढविलेला आढळून येतो.

**५ कौटुंबिक साह्य.**—पहिल्या नऊ वर्षांत साताऱ्यास छत्रपतीचें अनुसंधान राखणें त्याचें महत्त्वाचें काम बनलें होतें. छत्रपतीच्या कानांशीं लागून पेशव्यास खालीं ओढणारे विरोधक थोडे नव्हते. शाहूच्या दोन राण्यांमध्यें कलहप्रवृत्ति वाढून त्यांत त्याचें जिणें कष्टप्रद बनलें. त्याला संतान झालें नाहीं म्हणून पुढील घटनेकडे लहान मोठ्यांचे विचार चालूं लागले, त्या सर्वांवर नजर ठेवून आपला मतलब सिद्धीस नेण्याचें अवघड काम पेशव्यास करावें लागलें. परिस्थिति कबजांत ठेवून मराठी राज्याचा कारभार सुरळीत चालविल्याचें श्रेय या पेशव्यास आहे. यासाठीं स्वतःच्या घरचा कोणी तरी इसम साताऱ्यास छत्रपतीजवळ कायमचा राहत असे. पेशवा स्वारींत गेल्यावर शाहूलाही कोणा तरी जबाबदार इसमाची जरूर लागे. त्यासाठीं सदाशिवराव, रघुनाथराव, जनार्दनपंत हे जाऊन येऊन शाहूपाशीं एकंदर बस्तान संभाळीत. साताऱ्यास पेशव्याचा वाडा होता, तसेच सरदारांचे व मुत्सद्यांचे वाडे होते, त्यांत भेटी, खलबतें, राजकारणें अहोरात्र चालत, त्यांची माहिती योग्य द्वारें काढून सदाशिवराव, रघुनाथराव, वगैरे मुलगे आपलीं कर्तव्यें यथायोग्य बजावूं शकले. शाहूनगरांत मुत्सद्देगिरीची ही एक शाळाच बनली होती. दरबारांत होणारी चर्चा, व्यक्तींचे स्वभाव व मतलब हे विषय लहानपणापासून पेशव्यांच्या अंगवळणीं पडत गेले. राजवाड्यांतील व जनानखान्यांतील लहान मोठ्या गोष्टींची संपूर्ण बातमी पेशव्यास मिळे. तसेंच पेशव्याचा कोणीना कोणी इसम साताऱ्यास राहून व्यवस्था पाहतो हा वचक बाह्य जगावर कायम राही. सदाशिवराव तर सर्व व्यवहार दक्षतेनें पाहूं लागला. स. १७४६ त सोळाव्या वर्षी त्यानें पहिली स्वतंत्र स्वारी कर्नाटकांत केली. उत्तरेंत रघुनाथराव व दक्षिणेंत सदाशिवराव हे पेशव्याचे दोन घरचे सहायक पुढील उद्योगांत लायकी पैदा करूं लागले. घरच्या जमयतीवरच पेशव्याचा कारभार चहूंकडे यशस्वी होत गेला.

नानासाहेबास मुख्य दीक्षा चिमाजी आपा व अंबाजी पुरंदरे यांची मिळाली असें म्हणतां येईल. त्याचा आरंभींचा बराचसा काळ साताऱ्यास शाहू महाराजांचे सान्निध चिटणीस, प्रतिनिधि, नारोराम इत्यादींच्या संगतींत

गेला. अंब्राजीचा मुलगा महादोबा व नाना हे बरोबरचे. त्यापुढची जोडी सदाशिवराव व नाना पुरंदरे यांची. पुरंदरे व पेशवे या दोन घराण्यांचा लोभ अत्यंत जिव्हाळ्याचा होता. मोडी-बाळबोध लेखनवाचन, संस्कृत भाषेचें व नीतिशास्त्राचें अध्ययन हेंच त्या वेळचें मुख्य शिक्षण लहानपणीं मुलांस घरीं मिळे. सवाईमाधवरावास गोपिकाबाईनें केलेला उपदेश व माधवराव वेदान्ती याची शिक्षा हे कागद पाहिले म्हणजे तत्कालीन शिक्षणाची योग्य कल्पना होईल. या शिक्षणसंबंधांत खालील दोन पत्रें स्मरणीय आहेत. ता. २ जुलै, स. १७४२ चें पत्र " चिरंजीव राजश्री रघुनाथ यासी प्रति बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद, उपरी, विशेष. येथून जाते समयीं जें सुचलें तें तुम्हांस सांगितलें आहे, त्याचें स्मरण निरंतर मनांत असूं देत जाणें. रघुवंश, विदुरनीति, चाणक्य व जें तुम्हांस येत असेल, त्याची नेमपूर्वक चिंतनिका करून, थोडेंबहुत शास्त्री यांजवळ नित्य म्हणत जाणें. विराटपर्वापासून पुढें भारत रिकामपणीं वाचीत जाणें. केवळ घोडीं फेरावयाचे छंदास न लागणें. वजनी, कैली, बेरीज, बराबर करावयाचा सराव बहुत करणें. चिरंजीव भाऊची मर्जी बहुत प्रकारें रक्षण करीत जाणें. जे आज्ञा करतील तेंच काम करावें. बहुत करून भाऊबरोबरच जेवीत जाणें. घोडीं वेगळीं बांधीत न जाणें. क्षुद्र मनुष्यांशीं सहवास कोणे प्रकारेंही न करणें. मातुश्री बाई ( = राधाबाई ), ताई ( =काशीताई, ), अनुबाई यांसीं एका दों दिवशीं अर्धघटकाभर जाऊन बसत जाणें. शरीरप्रकृत नीट नाहीं. यास्तव औषध कांहीं नेमेंकरून घेत जाणें. भाऊसमागमें घोडीं फेरावयास जात जाणें. सातारियास जर जावयाची आज्ञा केली तर चिमणगिरि गंगाधर भटास, भाऊजवळ विनंति करून, बरोबर दिल्हे तर घेऊन जाणें. सातारियास गेलियावर दोहीं बाईकडे विना बोलविल्यावांचून, अथवा गोविंदराव यांनीं आपणहून सांगितल्यावांचून, न जाणें. कालानुरूप, वयास उचित, योग्य वेष करीत असावें. देवपूजा थोडी परंतु एकान्तीं, न बोलतां करीत जाणें. इतकेंही नेमेंकरून करावें आणि गर्व न करावा. निरंतर साधनवृत्तीनें वडिलांची आज्ञा प्रसन्नतेनें मानावी. सावध वर्तावें. सर्व जें मनेंकरून समजेल तें समजावें. वडिलांची मर्जी उत्तम असलिया पुसावें. शिष्यधर्में असलिया फार उपयोग आहे. चिरंजीव जनार्दन बहुत कामही करून पढतात. ते हरएक गोष्टींत अधिक जाहल्यास तुम्ही त्यांस मान्य पुरुष कसे व्हाल ! विशेष

काय लिहिणें. येथील वर्तमान तर उदेपुराजवळ पंचविसा दिवसांत पावलों. श्रीकृपेनें मेहेनत करून दिल्लीचे सुमारें जात आहों. जसें पुढील वर्तमान होत जाईल, तैसी योजना होईल. हे आशीर्वाद."

ता. १७ एप्रिल, स. १७६० रोजीं सदाशिवरावानें पानिपत स्वारींतून वजाबा पुरंदऱ्यास लिहिलेलें पत्र,—

'तुम्हांकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी वरचेवर सविस्तर वर्तमान लिहीत जाणें. आम्ही मजल दरमजल नर्मदापार झालों. पुढेंही दरकूच जात असों. घोड्यावर बसणें व लिहिणें पढणें चांगलें करणें. तीर्थरूप बोलावतील तेव्हां पुण्यास जात जाणें. फार खेळत न जाणें. घरीं अबई मायेनें रागें भरणार नाहीं, लाडके व्हाल तें कामाचें नाहीं. चांगलें लिहिणें, पढणें, घोड्यावर बसणें करणें. छ २ रमजान हे आशीर्वाद'. †

या पत्रावरून नानासाहेब,सदाशिवराव, रघुनाथराव इत्यादींचे स्वभाव कळून येतात. त्यांतील सूचना सहेतुक दिसतात. रघुनाथराव लहानपणीं छांदिष्ट, वडील माणसांचें न ऐकतां स्वतःच्या लहरीनें वागणारा, नेमलेला अभ्यास न करितां कोठें तरी घोडे उडवीत क्षुद्र माणसांच्या संगतींत काळ घालविणारा, किंबहुना वेळेवर पंक्तीस भोजनासही न येणारा असा दिसतो. शाहूच्या राण्यांस परभारें भेटून खटपटी करण्याची त्यास सवय असावी. सदाशिवराव भाऊचें तो बहुधा ऐकत नसेल. म्हणूनच रघुनाथरावासंबंधानें नानासाहेबास चिंता वाटून त्यानें वरील पत्रांत मुद्दाम त्यास कित्येक बाबतींचा इशारा दिला आहे. सदाशिवरावावर काम सोंपवून नानासाहेब निर्धास्त असे, तशी रघुनाथरावा-संबंधानें त्यास निश्चिति वाटत नव्हती. घोड्यावर बसण्यापलीकडे दादाच्या अंगीं दुसरा उपयुक्त गुण उत्पन्न झालेला दिसत नाहीं. घोड्यावरील चपळाईचा उपयोग मात्र त्यानें वेळीं अवेळीं भरपूर केल्याचें पुढें दिसून येईल. दादापेक्षां धाकटा जनार्दन जास्त सुलक्षणी होता, हें पत्रांत व्यक्त होतें. एका प्रसंगानें रघुनाथराव लिहितो, "आमचें साताऱ्यास राहावयाचें बरें आहे. तीर्थरूपांची मर्जी व विद्याभ्यास उत्तम प्रकारें करतों. दरबारांत दुवक्ता जातों. दंड काढितों."

रघुनाथरावाचीं अनेक पत्रें पे० द० च्या १ ल्या खंडांत आहेत तीं पाहतां त्याच्या स्वभावाचें व कर्तृत्वाचें प्रत्यंतर मिळतें. सदाशिवरावाच्या

† रा. खं. १ पृ. ९६; खं. ६. ४३६; का. सं. प. या. १८३ व ३९३.

तडफेपुढें तो अगदीं फिका दिसतो. स्वतःचें निश्चित मत नाहीं, मुहूर्तादिकांवर भिस्त मोठी, दैव, परमेश्वर करतील तें खरें अशी अंतःकरणाची भावना हे त्याचे स्वभावभेद ठळक नजरेस येतात. निश्चयानें मी असें करीन ही बाजीराव-सदाशिवरावाची भावना त्याचे ठिकाणीं उमटली नाहीं.

मुलांना स्वारींत जाण्याची उत्कंठा केवढी असे हें नाना पुरंदऱ्याच्या उदाहरणावरून दिसून येतें. आपणांस स्वारींत नेलें नाहीं म्हणून तो रंजीस झाला, आपण होऊन निघून जाणार, असें कळलें तेव्हां महादोबानें त्यास स्वारींतून समजुतीचें पुढील पत्र ता. १ डिसेंबर १७४१ चें लिहिलें, "तुम्हांस लष्करांत न्यावें हें आमचें पूर्ण मानस होतें. परंतु श्रीमंतांची आज्ञा नाहीं. त्यांचे आज्ञेशिवाय वर्तणूक करावी उचित नाहीं. तरी तुम्ही अवंदांचे चार महिने घरींच राहवयाचें करणें. विचारें जाहलें तरी साताऱ्यास जाणें, नाहीं तर आम्ही येऊं तों सासवडींच राहणें. नवा कारभार आहे (पेशव्याचा), मोगलांचा कलह आहे. वडिलांनींही मोडा घातला आहे, यास्तव अगत्य माघारें जावयाचा विचार करणें." †

घरांत कुटुंबांतील वृद्ध स्त्रियांचा दाब, महाभारतांतील युद्धप्रकरणाचें अध्ययन, चिटणिसाशीं पेशव्यांचा घरोबा अशा कित्येक बाबती वरील पत्रांत सहजगत्या उल्लेखिलेल्या स्मरणीय वाटतात. पराक्रमाच्या मानानें पाहिल्यास पेशव्यांचें एकंदर घराणें इतरांहून पुष्कळच वरचढ होतें यांत संशय नाहीं. हा वरचढपणा मुख्यतः गृहदीक्षेंत व्यक्त होतो. ही दीक्षा देण्यांत बाजीरावाची मातुश्री राधाबाई हिचा भाग विशेष आहे. पेशवे बाहेर फिरतीवर असतां पुण्यांतील व्यवहार ही बाई मोठ्या दक्षतेनें चालवीत असे. बाजीराव मस्तानी यांच्या निधनानें पेशव्यांच्या घरांतील क्षुब्धता लगेच नाहींशी झाली. शहराची वसाहत, बंदोबस्त, सणउत्सवादि समारंभ, दानधर्म, अहेर, बाळंतविडे, मंदिरांचीं बांधकामें अशा अनेक कामांत राधाबाईचें पुढारपण पुष्कळ काळ पेशव्यांस लाभल्यामुळें त्यांच्या बाह्य उद्योगास जोर आला यांत संशय नाहीं. नानासाहेबास याचा फायदा फार झाला. प्रत्यक्ष अनुभवानें येणारें शहाणपण पुस्तकी विद्येपेक्षां जास्त मोलवान होय.

बाजीरावासारखा पराक्रमी पिता व त्याच्याच तोडीचा चुलता चिमाजीआपा अल्पावकाशांत दिवंगत झाल्यानें यत्किंचित् न डगमगतां तरुण नानासाहेब

† पु. द. १. २१९, १५१.

उत्साहानें परंपरागत कर्तव्यावर रुजू झाला हा तत्कालीन शिक्षणाचाच महिमा समजला पाहिजे. अडचणीच्या प्रसंगीं खचून न जातां प्राप्त कर्तव्य करीत राहणें ही जिवंत राष्ट्राची खूण होय. पानिपतानंतर हीच भावना महाराष्ट्रानें जगाच्या निदर्शनास आणिली. अकरा वर्षांच्या वयापासून नानासाहेब राज्याच्या कामांत लक्ष घालून अनुभव मिळवीत होता. त्याचें अगदीं पहिलें पत्र उपलब्ध आहे, त्याची तारीख २० मार्च, स. १७३१ आहे,‡ म्हणजे त्याच्या वयास नुक्तींच नऊ वर्षें होऊन गेलीं होतीं. दहाबारा वर्षांच्या वयापासून स्वारीचीं कामें अंगावर घेणें, पत्रांचे जबाब पाठविणें, पंचाइती तोडणें, जरुरीप्रमाणें लोकांस हुकूम सोडणें अशीं कामें पेशव्यांच्या व इतर कुटुंबांतील मुलांनीं करण्याचा रिवाज त्या वेळीं सार्वत्रिक होता. शिवाय पेशव्यांस सांभाळून घेणारे पुरंदऱ्यांसारखे अनेक पुरुष जवळ होते. रामचंद्र मल्हार, सखाराम बापू, गंगाधरपंत चंद्रचूड, बर्वे, चासकर वगैरे कर्ते पुरुष एकजुटीनें वागून पडेल तें काम उठविण्यास तयार असल्यामुळें जुटीच्या बळावर राज्य वृद्धिंगत होत गेलें. नानासाहेबास संस्कृत चांगल्यापैकीं येत असावें. रामायण महाभारतांतील निवडक भाग, विदुरनीति, भगवद्गीता, स्तोत्रपाठ, अशीं कित्येक प्रकरणें त्याला अवगत होतीं. सारांश, गृहशिक्षणाला आरंभापासून व्यवहारज्ञानाची जोड मिळत गेली म्हणून लहान मोठ्यांवर त्याची छाप लगोलग बसून राज्य वृद्धिंगत झालें.

बाजीरावाच्या मृत्यूनें उत्तरेंत एक प्रकारची चलबिचल उडून माळवा बुंदेलखंडच्या सनदा पदरांत पाडून घेण्याची निकड उत्पन्न झाली. नादीरशहाच्या स्वारीमुळें बादशहाच्या दरबारांत नवीन प्रकार काय बनले आणि मराठ्यांचे उद्योग पुढें कोणत्या धोरणानें चालवावे याचा विचार ठरविण्याकरितां नानासाहेबानें महादेवभट हिंगणे यास त्वरेनें भेटीस बोलाविलें. ता. २० ऑगस्ट रोजीं हिंगणे नाशकास आला, नंतर पुण्यास येऊन त्यानें पेशव्याची भेट घेतली. ¶ राणोजी सिंदे वसईच्या मोहिमेंत दक्षिणेंत आला तो इकडेच होता, पण त्याचा कारभारी रामचंद्रबावा व होळकर यांसही नानासाहेबानें या वेळीं दक्षिणेंत बोलाविलें. पिलाजी जाधव व आवजी कवडे हेही सरदार बुंदेलखंडांतून परत आले. सर्वांशीं बोलणें करून विचार ठरला, कीं सवाई

‡ खं. ६. ५५.

¶ रा. खं. ६.१४६, पु. रो. पृ. २८, ४७.

जयसिंगाची भेट घेऊन पुढील कर्तव्याचा निश्चय ठरवावा. या उपक्रमास शाहूची संमति मिळून दसरा झाल्यावर स्वारीस निघण्याचा बेत कायम झाला.

देवाब्राह्मणांचा आशीर्वाद मिळविण्यांत चिमाजीआपा व नानासाहेब किती तत्पर असत हें त्यांच्या एका पत्रांत दिसून येतें. नारायण दीक्षित पाटणकराकडून बाजीरावाच्या मृत्यूचें सांत्वनपत्र आलें, त्यांत त्यानें कित्येक महत्त्वाच्या सूचना कळविल्या आणि रायांचे वैभवाची वृद्धि करण्यास सांगितलें, त्या पत्राचा जबाब ता. २९ सेप्टेंबरचा सर्वच वाचण्यालायक आहे. त्यांत पेशव्यांची उदात्त धार्मिक वृत्ति व्यक्त होते.†

स्वारींत चिमांजीआपानेंही नानासाहेबाबरोबर जावें असा बेत ठरला. मुहूर्तानें दोघे बाहेर पडले, इतक्यांत ता. ३१ ऑक्टोबर, कार्तिक व० ८ रोजीं चिमाजीची प्रकृति एकदम अत्यवस्थ झाली, त्यामुळें चिमाजी तसाच परत आला आणि नानासाहेब पुढें गेला. दिवसेंदिवस चिमाजीआपाची प्रकृति खालावत जाऊन तो पौष शु. १०, ता. १७ डिसेंबर रोजीं पुणें येथें मरण पावला. त्यासंबंधानें काशीराव शिवदेव, पेशव्यांचा ऋणानुबंधी, ज्यानें पुढें पानिपतची बखर लिहिली, त्यानें पुढील पत्र पेशव्यास पाठविलें. "चिमाजीआपांचें वर्तमान ऐकून चित्तास परमखेद झाला तो लिहितां पुरवत नाहीं. स्वामींस तों अतिशयेंसी दुःखाच्या राशी जाहल्या. परंतु हे गोष्टीस उपाय नाहीं. ईश्वरी सत्ता प्रमाण. स्वामी सुज्ञ आहेत. विवेक करून खेद परिमार्जन केला पाहिजे." §

चिमाजीच्या मृत्यूनें नानासाहेबाचा धीर खचलेला दिसत नाहीं. ता. १४ जानेवारी, स. १७४१ रोजीं त्यानें ब्रह्मेन्द्रस्वामींस खालील पत्र लिहिलें. 'ती. आपांनीं कैलासवास केला, हें वर्तमान स्वामींनीं ऐकलेंच असेल. मोठा घातच झाला. ती. राव यांनीं कैलासवास केल्यास आठ महिने न झाले तों श्रीनें हा प्रसंग घडविला. होणार बलवंत श्रीइच्छेस उपाय काय ! चरणरजावरील महाराजांची कृपा आहेच, त्या कृपेमुळें कल्याणच होईल. नबाब निजाम उल्मुल्क याचा व नासरजंगाचा कलह निर्माण झाला होता, त्यास आम्ही साहित्य निजाम उल्मुल्क याचें केलें. यावरून नासरजंग फकीर झाले. तदुत्तर निजामाची भेट झाली. बहुमान आदर फारच केला. सर्व प्रताप स्वामींचे कृपेचा आहे. स्वामीवांचून आम्हांस दैवत नाहीं. कळावें,'

एदलाबाद येथें निजामाची भेट नानासाहेबानें घेतली, तो भाग अन्यत्र सांगितला आहे. या भेटीनें विशेष कांहीं निष्पन्न झालें नाहीं.

† का. सं. प. या. ३६. § पे. द. ४०.–२५, का. सं. प. या. ३८.

# पहिली छाप

## कालसूची

१७४० नोव्हेंबर २३—१७४१ जुलै ७, सुरंज भेलसा स्वारी.

१७४१ डिसेंबर १८—१७४३ जुलै ३०, प्रयाग-बंगाल स्वारी.

१७४४ नोव्हेंबर २०—१७४५ ऑगस्ट १, भेलसा स्वारी.

१७४७ डिसेंबर १०—१७४८ जुलै ९, नेवाई स्वारी.

| | | |
|---|---|---|
| १७४० | ऑगस्ट | निजाम दिल्लीहून निघाला. |
| ,, | नोव्हेंबर | निजाम बऱ्हाणपुरास दाखल. |
| १७४१ | जाने. ५ | धारचें ठाणें काबीज. |
| १७४१ | जाने. ७ | एदलाबादेस निजाम-पेशवा भेट |
| ,, | ,, १४ | नासिरजंग फकीर झाले. |
| ,, | मार्च ७ | पेशवा नर्मदापार. |
| ,, | मे १२-१९ | पेशवा-जयसिंग भेट, धोलपुरीं. |
| ,, | जून | चंदासाहेब साताऱ्यास दाखल, कैद. |
| ,, | जुलै ४ | माळव्याचें फर्मान सिद्ध झालें. |
| ,, | ,, २३ | औरंगाबादेस नासिरजंगाचा पराभव, कैद. |
| ,, | ,, | बाबूजी नायकाचें पुण्यांतून उच्चाटन. |
| १७४३ | जून १९ | शाहूची सनद बाबूजी नायकास. |
| ,, | सेप्टें. २३ | सवाई जयसिंग मृत्यु. |

# २
# पहिली छाप


१ उत्तरेच्या स्वाऱ्या — २ नासिरजंगाचा बंडावा
३ निजामाची भेट — ४ जयसिंगाची भेट
५ माळव्याचें फर्मान — ६ बाबूजी नायकाचें उच्चाटन


**१ उत्तरेच्या स्वाऱ्या.**—नानासाहेबानें पहिल्या आठ वर्षांत उत्तरेंत चार स्वाऱ्या केल्या, त्यांची नांवनिशी त्या वेळच्या कागदांत नमूद आहे ती अशी,—

१ **सुरंज-भेलसा**—२३ नोव्हेंबर, स. १७४० पासून ७ जुलै, स. १७४१. मे महिन्यांत धवलपूर येथें सवाई जयसिंगाची भेट. या स्वारींत गोपिकाबाई बरोबर होती.

२ **प्रयाग-बंगाल**—१८ डिसेंबर, स. १७४१ पासून ३० जुलै, स. १७४३ पावेतों. पावसाची छावणी उत्तरेंत झाली. माळव्याच्या सनदा मिळाल्या. रघूजी भोसले व अलिवर्दीखान यांचे व्यवहार व कलह मिटले. या स्वारींत मातुश्री काशीताई यात्रेस गेली ती काशीस पांच वर्षे राहिली.

३ **भेलसा स्वारी**—ता. २० नोव्हेंबर, स. १७४४ ते ऑगस्ट, स. १७४५.

४ स. १७४८ त आणखी एक स्वारी पेशव्यानें उत्तरेंत केली, तिला **नेवाईची स्वारी** म्हणतात, तिचा प्रकार पुढें सांगण्यांत येईल.

दूरदूरच्या क्षेत्रांत चालणारीं भिन्न राजकारणें व त्यांत वावरणाऱ्या पुरुषांच्या हालचाली नजरेपुढें सतत ठेवल्याशिवाय कोणत्याही एका प्रकरणाची संगति संपूर्णपणें सांगतां येणार नाहीं. प्रकरणारंभीं शकावलि जोडण्याचें प्रयोजन हें आहे. या शकावलीवरून कोण कोठें काय कामासाठीं वावरतो आहे हें लक्षांत येऊन त्यांच्या उद्योगामुळें विवाच्य प्रकरण कसें सुधारलें किंवा बिघडलें हें कळून येतें. पेशव्याला हरएक कामांत अशी चहूंकडे नजर ठेवावी लागत होती. साताऱ्यास शाहू, कर्नाटकांत रघूजी भोसले, उत्तरेंत बादशहा व त्याचे उमराव, मुख्यतः निजाम व सवाई जयसिंग, अशांचीं संधानें ओळखून पेशव्यास सुरुवातीस आपलें उद्दिष्ट सिद्धीस न्यावयाचें होतें. यास्तव कोणतेंही प्रकरण पूर्णपणें विभक्त करून स्वतंत्रतेनें सांगणें सोयीसाठीं अवश्य असलें

तरी व्यक्ति व घडामोडी यांची अंतर्गत गुंतागुंत नेहमींच बनलेली असते हें लक्षांत बाळगिलें पाहिजे.

बाजीरावाच्या पश्चात् लगेच उत्तरेंत स्वारी करण्याचें प्रयोजन कसें उत्पन्न झालें, त्याचा खुलासा कित्येक पत्रांत मिळतो. जनार्दन बाजीराव महादेवभट हिंगण्यास लिहितो, "रायांनीं कैलासवास केल्याचें वर्तमान तुम्हांस लिहून पाठविलें. सांप्रत तुमचें पत्र आलें त्यांत राजकारणाचा मजकूर होता. तीर्थरूपांचा प्रताप तैसाच होता. जो मनसबा सिद्धीस न जावयाचा तोही त्यांचे पुण्येंकरून सिद्धीस जात होता. कैलासवासीयांनीं समागमें कांहीं नेलें नाहीं. सर्व प्रसंग यथास्थित आहे. दिल्लीचें राजकारण बाबूरावांचे विद्यमानें जाहालें तें सवाईजींनीं रक्षिल्यास चातुर्मासानंतर उभय पक्षांस उपयोगाचें आहे. राजराजेंद्रांचा व राव कैलासवासी यांचा स्नेह व एकात्मता होती, तेणेंकरून बहुतांस दबाव होता. प्रस्तुत राव कैलासवासी झाल्यामुळें राजराजेन्द्र दुश्चित्त होऊन पूर्वीचें अनुसंधान सोडतील तरी कार्याचें नाहीं. कारण निजामांच्या चित्तीं सारी पातशाही आक्रमांत आणावीसें आहे. त्यास आधीं ते राजराजेन्द्रांसीं हर्षामर्ष वाढवितील." हें पत्र ता. १० मे, स. १७४० चें आहे, त्यावरून स्पष्ट होतें, कीं नादीरशहानें बादशहास बलहीन बनविलें व बाजीराव मृत्यु पावला या दोन गोष्टींचा फायदा घेऊन दिल्लीस निजाम आपलें वर्चस्व वाढविणार त्यापूर्वी जयसिंग व मराठे यांनीं पूर्वीचा स्नेहभाव कायम राखून निजामास हलकें करावें अशी सूचना वरील पत्रांत आहे. बाजीराव गेल्यानें कोणतीच कमतरता मराठ्यांच्या व्यवस्थेंत उद्भवली नाहीं. सवाईजींनीं आपलें मत कायम ठेवावें अशी तजवीज नानासाहेबानें करून लगेच हिंगण्यास त्यासाठीं आपल्या भेटीस बोलावून एकंदर विचार केल्यावर जयसिंगाच्या राजकारणास बळकटी आणण्यासाठीं त्यानें एकदम उत्तरेस जाण्याचें निश्चित केलें. तिकडील सत्ताधीशांचे ठिकाणीं मराठ्यांचा आत्मप्रत्यय कायम टिकविणें हीच पहिली निकड होती.

दरम्यान निजामाचा डाव व्यक्त झाला तो असा. ता. २० जुलै, स. १७४० रोजीं मल्हारराव होळकर महादेवभटास लिहितो, 'निजामांनीं बहुतसा उपद्व्याप मांडून अजीमुल्लाखानास माळव्याची सुभेदारी देवविली, वस्त्रें देऊन रवाना केलें. बरोबर पंधरा हजार फौज घेऊन पुढें चालणार असें सविस्तर लिहिलें तो अर्थ कळून आला. निजामाचा पराक्रम व उपद्व्याप तुम्हां

आम्हांस पूर्ण श्रुत आहे. आम्ही देशास आलों, त्याप्रांतीं छावणी नाहीं ही संधि पाहून येतात. याउपरी सेनासहवर्तमान सत्वरींच येतों. अविंधास बरेवजेनें नतीजा पावविला जाईल. लबाडी करितील ते आपल्या गुणें फजित पावतील.' † सिंदे होळकर हे दोन दमाचे सरदार पदरीं असल्यामुळें नानासाहेबाची जरब सर्वत्र बसली. अजीमुल्लाखान हा निजामाचा चुलतभाऊ, पूर्वी स. १७२३ त त्याचे तर्फेनें माळव्याचे कारभारावर होता; आणि हल्लीं तो दिल्लीस त्याचा केवळ उजवा हात म्हणून वागत असे. मात्र सिंदे-होळकरांची तयारी पाहून दिल्लीच्या पुढें चालून येण्याची त्यास या वेळीं छाती झाली नाहीं. निजामानें मात्र भोपाळ तहाविरुद्ध माळवाप्रांत आपला समजून तेथील कारभार अजीमुल्लाखानास सांगितला.

बाळाजीरावास पेशवाई नुकतीच मिळाली असून त्यास जेव्हां निजामाच्या पुत्राचा बंडावा कळला, तेव्हां याच समयीं निजामाला चापती लावण्याचें त्यानें ठरविलें आणि मुख्यतः जुन्नर, संगमनेर, नासिक हा भाग व त्यांतील किल्ले भराभर काबीज करण्याची सूचना त्यानें आपल्या अंमलदारांस केली. माळव्याची सुभेदारी भोपाळ प्रसंगांत निजामानें पेशव्यास देण्याची कबुलात होती, पण ती त्यानें झुगारलेली पाहून दिल्लीहून महादेवभट हिंगणे यास पेशव्यानें भेटीस बोलाविलें आणि निजाम दक्षिणेंत आल्याची संधि साधून जयसिंग सवाईच्या मार्फत बादशहाकडून सुभेगिरी मिळविण्यासाठीं पेशवा दिल्लीकडे जाण्यास निघाला. जाण्यापूर्वी निजामाच्या पुत्राचा बंडावा उपस्थित होऊन त्यांत बाजीरावानें काय उपक्रम केला होता तें सांगितलें पाहिजे.

**२ नासिरजंगाचा बंडावा** ( ऑगस्ट, १७४०—जुलै, १७४१ ).—निजाम उल्मुल्कची एक विवाहित स्त्री व चार रक्षा होत्या असें ब्रिग्ज सांगतो. सय्यदुन्निसाबेगम या त्याच्या विवाहित बायकोच्या पोटीं गाजीउद्दीन व नासिरजंग हे दोन पुत्र व दोन मुली जन्मल्या. याशिवाय सलाबतजंग, बसालतजंग, निजामअली व मीर मोगल हे चार पुत्र रक्षांच्या पोटचे होत. स. १७१४ त पहिल्या दोन पुत्रांचा सुंताविधि निजामानें औरंगाबाद येथें मोठ्या इतमामानें केला, त्या वेळीं त्यांचें वय पांच चार वर्षांचें असावें. हे दोघे व इतर सर्व पुत्र बरेच कर्तृत्ववान निघाले. गाजीउद्दीन बहुतेक दिल्लीस व नासिरजंग बापाबरोबर दक्षिणेंत वाढला. स. १७३७ त बादशहाचे

† रा. खं. ६.१४४,१४५.

बोलावण्यावरून निजामानें दिल्लीस जाऊन बाजीरावावर चढाई केली, त्या वेळीं त्यानें पुत्र नासिरजंगास दक्षिणच्या फौजा घेऊन उत्तरेंत आपल्या मदतीस बोलाविलें, पण चिमाजीनें नासिरजंगास अडवून भोपाळच्या संग्रामांत जाऊं दिलें नाहीं. नंतर नादीरशहा दिल्लीवर आला. मिळून स. १७३७ पासूनचीं तीन वर्षे लष्करी दृष्ट्या उत्तरेंत धामधुमीचीं गेलीं. नासिरजंग बापापेक्षां जास्त तडफदार होता. लाखपन्नास हजार फौज ताब्यांत व तीन वर्षें सर्व दक्षिणची मुखत्यारी हातीं असल्यामुळें मराठ्यांना आळा घालण्याचें काम बापास साधलें नाहीं, तें आपण करून दाखवावें अशा उद्देशानें त्यानें स. १७४० च्या आरंभीं बाजीरावाशीं संग्राम केले ते गोदावरीचें युद्ध या कलमांत मागें सांगितले आहेत. नादीरशहाचे स्वारींत निजामाची दिल्ली येथें मोठी नाचक्की झाली ती नासिरजंगाचे कानावर आली; त्याच्या मनानें घेतलें, बाप अवसानघातकी व पराक्रमशून्य आहे. दक्षिणचा कारभार वार्धक्यामुळें त्यास निभत नाहीं, सबब बापानें निवृत्त होऊन आपणास मुखत्यारी द्यावी. अशा धोरणानें त्यानें दक्षिणेंत आपला जम बसविला; आणि बापाच्या वेळच्या नेमणुका व व्यवस्था बदलून आपला स्वतंत्र कारभार आरंभिला. इतक्यांत बाजीराव मरण पावल्यानें त्यास नवीन हुरूप चढला. निजामाला दिल्लीस हा प्रकार हस्तकांकडून कळला, तेव्हां समजुतीच्या गोष्टी सांगून त्यानें नासिरजंगाची कानउघाडणी केली. पण पुत्रानें माघार घेतली नाहीं, बापाशीं लढण्याची तयारी केली. राज्यांत दोन तट निर्माण झाले. निजामाला धास्ती पडली, हा मुलगा आतां आपणास गुंडाळून ठेवणार. तेव्हां पुत्राच्या बंदोबस्तासाठीं बादशहाची परवानगी घेऊन तो स. १७४० ऑगस्टांत दिल्लीहून निघाला. तुम्ही दिल्लीसच राहा, इकडे याल तर फजित पावाल असें पुत्रानें कळविलें, तें न जुमानतां निजाम अत्यंत सावधगिरीनें स. १७४० नोव्हेंबर अखेर बऱ्हाणपुरास दाखल झाला. तेथून दोन महिनेपावेतों माणसें पाठवून व पत्रें लिहून त्यानें एकीकडे पुत्राची समजूत घालण्याचा प्रयत्न व युद्धाचीही तयारी केली. निजामावर नाराज झालेले कित्येक इसम नासिरजंगास सामील झाले. "तुम्ही दिल्लीचा कारभार करा, मला इकडे संपूर्ण मुखत्यारी द्या, तुमच्याशीं संग्राम करण्याची मला बिलकूल इच्छा नाहीं. इतकें असून तुम्ही मला दक्षिणचा कारभार न द्याल तर मी फकीर होऊन संसार सोडून खुल्दाबाद येथील शहाबुऱ्हाणुद्दीन घरीब या साधूच्या मठांत कायमचें वास्तव्य करीन." पुत्राचें हें बळ पाहून निजाम चपापून गेला.

त्यास पेशव्याचें साह्य असावें असें समजून निजामानें गोदावरीच्या दक्षिण प्रदेशावर चाल केली. "ता. ३ मार्च, स. १७४१चें वर्तमान, नबाब बैजापुरावरून पुणतांब्यास आले. अकोलें, जुन्नर नाशिककडे शह दिला. त्रिंगा किल्ला § काबीज करण्यास लोक रवाना केले. मराठ्यांनीं किल्ला हिंमतीनें लढविला. मल्हार दादाजी बर्वे पेशव्याचे तर्फेनें या भागाचें संरक्षण करीत होता. कावनई, अलंग, मदनगड, त्रिंगा हे सर्व घेण्याची मुख्यांनीं आज्ञा केली. संगमनेर प्रांतीं पागेचीं वगैरे ठाणीं आहेत तीं पाडण्याचा नबाबांनीं हुकूम केला." † नासिरजंगास मराठ्यांनीं साह्य करूं नये यासाठींच निजामानें पेशव्याच्या मुलखावर वरील स्वारी केली. संगमनेर, नासिक बाजूचा हा भाग पुढें नासिरजंगाच्या मृत्यूनंतर स. १७५१ त मराठ्यांनीं काबीज केला.

होतां होतां नासिरजंगानें बापाशीं लढण्याची तयारी केली. निजामानें औरंगाबादेस जाऊन तेथील बंदोबस्त पक्का केला. तों नासिरजंग औरंगाबाद काबीज करण्याकरितां चालून आला. ता. २३ जुलै, स. १७४१ रोजीं खुल्दाबाद व दौलताबादचे दरम्यान बापलेकांचा सामना होऊन तुंबळ कंदन झालें. निजामाचा तोफखाना जालीम होता, त्यामुळें नासिरजंगाचें शौर्य निष्फळ ठरलें. त्याचे साथीदार बरेच मारले गेले आणि त्यासही भारी जखमा लागल्या. हें पाहून निजामाचा विश्वासु सरदार सय्यद लष्करखान यानें आपला हत्ती नासिरजंगाजवळ नेऊन त्यास पकडून घेऊन निजामाच्या हवालीं केलें. शहानवाजखान हा दुसरा एक प्रमुख व हुशार गृहस्थ नासिरजंगाच्या पक्षास मिळाला होता, तो जीव बचावण्यासाठीं पळून जाऊन पांच वर्षें पावेतों अज्ञात अवस्थेंत लपून बसला. 'मासिरुल उमरा' नांवाचा मोगल साम्राज्यांतील सरदारांचा नामकोश हा उत्कृष्ट ग्रंथ या शहानवाजखानानें वरील अज्ञात कालांत लिहिला. पांच वर्षांनंतर निजामानें त्याचे अपराध क्षमा करून त्यास पुनः नोकरींत दाखल केलें. नासिरजंगाचें दर्शनच बापानें घेतलें नाहीं. आपल्या शेजारींच त्याचा तंबू ठेवून त्याच्या औषधपाण्याची निगा ठेविली. त्याची सर्व देखरेख सय्यद लष्करखानास सांगण्यांत आली.

लढाईच्या दिवशीं परमेश्वराचे आभार निजामानें मानले, तेव्हां तो बोलला, "आज देवानें मला तीन गोष्टी दिल्या आहेत, पहिली संग्रामांत जय, दुसरी पुत्र जिवंत प्राप्त झाला, तिसरी त्याचें अनुपम शौर्य प्रत्यक्ष पाहण्याचें भाग्य

§ इगतपुरीजवळ. † पे. द. २८.१२, १३.

मला लाभलें. " वर्ष सहा महिन्यांनीं निजामाचा राग शांत झाला. कुटुंबांतील स्त्रीपुरुषांनीं नासिरजंगावरचा रुसवा सोडून देण्याचा आग्रह चालविला, तेव्हां निजामानें त्यास भेटीस आणून आलिंगन दिलें. बापाचे पायां पडून नासिरजंग ढळढळां रडला आणि बोलला, 'मला भलतीच दुर्बुद्धि झाली, त्यापेक्षां आईनें मला जन्मच कशाला दिला, अगर उपजतांच विष कां नाहीं दिलें ?' हे शब्द ऐकून निजामासुद्धां सर्वांसच रडें कोसळलें. तदुत्तर त्यानें दुर्वर्तन केलें नाहीं. ‡

**२ निजामाची भेट.**—नानासाहेब उत्तरेंत जाण्यास व निजाम दाक्षिणेंत येण्यास एक गांठ पडली. पूर्णेच्या कांठीं एदलाबाद येथें निजामाचा तळ होता त्या ठिकाणीं ता. ७ जानेवारी, स. १७४१ रोजीं पेशव्यानें त्याची भेट घेतली. भेटीपूर्वी पिलाजी जाधवानें पुढें जाऊन आदरसत्काराचे तपशील ठरविले त्याप्रमाणें सर्व विधी पार पडले. आठचार दिवस पावेतों हा भेटीचा समारंभ बाह्यतः तरी सौरस्यानें सिद्धीस गेला. अंतर्यामींचा प्रकार मात्र दोघे पूर्ण जाणून होते. भोपाळसंग्रामाच्या करारांत माळव्याच्या सनदा पेशव्यास बादशहाकडून मिळवून देण्याचें निजामानें कबूल केलें होतें, त्या सनदा अद्यापि त्यानें देवविल्या नाहींत. निजाम दिल्लीस नाहीं अशी ही संधि साधून त्या सनदा सवाईजीच्या मार्फत लगोलग मिळवाव्या अशी उत्कंठा पेशव्यास होती, तर निजामाचें आसन डळमळित झालें होतें. नादीरशहाच्या वेळची त्याची कारवाई बादशहासुद्धां सर्व जाणत असल्यामुळें ही ब्याद येथून जाईल तर बरी असा तेथील दरबारचा भाव असून इकडे त्याचा पुत्र नासिरगंज कर्तबगार व वर्तनानें सच्चा असल्यामुळें दक्षिणेंत त्यासच लोकांचा पाठिंबा होता. अशा स्थितींत पुत्राचा बंडावा मोडण्याच्या कामीं पेशव्यानें आपलें साह्य करावें, निदान भलताच उपद्व्याप करून पुत्राला पेशव्यानें थारा देऊं नये एवढें तरी पदरांत पाडून घ्यावें, असा उद्देश निजामाचा होता. अशा स्थितींत भेटींत विशेष कांहीं निष्पन्न झालें नाहीं याचें आश्चर्य वाटण्यास नको.

पेशव्याचें लक्ष माळव्याच्या सनदांकडे वेधलें होतें. बाजीरावालाच सनदा मिळायच्या, त्यास इतके दिवस जाऊन भोपाळचा एवढा खटाटोप फुकट गेल्यासारखा झाला, तो सामोपचारानें भरून काढावा, पुनः तसला संग्राम अंगावर घेण्याची पाळी येऊं नये ही आकांक्षा पेशव्याची. बाजीराव गेला,

‡ Khan's Life of Nizam-ul-mulk.

त्याच्या पश्चात् सात महिन्यांनीं चिमाजीआपा १७ डिसेंबरास परलोकवासी झाला, तरी तेणेंकरून पेशव्याची बाजू बिलकूल लंगडी झाली नाहीं; दुसरा पेशवा पहिल्यासारखाच पूर्वीचे उद्योग सिद्धीस नेण्यास सज्ज आहे, हा प्रकार निजामाचे निदर्शनास आणणें पेशव्याला अगत्याचें होतें. ता. २४ डिसेंबरास विरूबाई साताऱ्यास वारली, त्यामुळेंही शाहूच्या दरबारांत किमपि बदल झाला नाहीं; बाजीरावाप्रमाणेंच शाहूदेखील आपला पाठीराखा आहे हें पेशव्यानें निजामाचे मनावर ठसविलें. अशा कारणांनीं वरील दोघां उमरावांची भेट केवळ औपचारिक व गुळमुळीत झाली. प्रत्यक्ष परिणाम कांहींच घडून आला नाहीं. ता. १४ जानेवारी रोजीं नानासाहेब ब्रह्मेन्द्रस्वामींस लिहितो,—

"निजामांचा व नासरजंगाचा कलह निर्माण झाला होता, त्यास आम्ही साहित्य निजामांचें केलें. त्यावरून नासिरजंग फकीर झाले. निजामांनीं बहुमान आदर फारच केला." यावरून पेशव्याचें साह्य निजामानें मागितलें, तें देण्याचें त्यानें कबूल केलें. याच भेटींत माळव्याचे सनदांची मागणी पेशव्यानें केली, त्याजवर निजामानें जबाब दिला, "ती सुभेदारी बादशहांनीं आम्हांस सुप्रत केली आहे. तुम्ही आमचे हुकमतींत वागाल, तर आम्ही माळव्याची नायबी तुम्हांस देऊं." मिळून या बाबतींत त्यानें पेशव्याची निराशाच केली.†

राज्यकारभारांत वावरणारे ठिकठिकाणचे मराटे वकील व अधिकारी कसे दक्ष असत याचें उदाहरण खालील पत्रांत मिळतें. व्यंकाजी शिवदेव म्हणून पेशव्याचा वकील आर्काटच्या नबाबाजवळ होता, त्यास बातमी लागली, कीं पेशवे-निजामांची भेट होणार, त्या भेटींत आर्काटकडील मतलब पेशव्यानें निजामापासून साधून घ्यावा, अशी सूचना त्यानें आयाबा मुजुमदार यास पाठविली. "नानास्वामींची व निजामांची भेटी आहे, ये समयीं आर्काटसुभ्यांत नवेंजुनें केलीया उत्तम आहे. आर्काटचे चौथाई सरदेशमुखीचा मामला बारा वर्षांपासून चालत आला आहे त्याप्रमाणें आतांही देत जाणेबद्दल निजामाचें पत्र येथील सुभ्यास पाठविल्यास द्रव्याचा कार्यभाग घडून येईल. आपल्या हातींचा मामला दुसऱ्याकडे जाऊं देऊं नये."‡

भेटीपूर्वी पेशवे व निजाम आपापल्या फौजांनिशीं अभिमुख होऊन जवळ येऊं लागले तेव्हां कदाचित् उभयतांचा युद्धसंग्राम होईल अशी भीति कांहींकांना उत्पन्न झाल्याचें दिसतें. मानाजी आंगऱ्यानें पेशव्यास

† रा. खं. २, पृ.९०. ‡ पे. द. २८. १०.

लिहिलें, " आपण मजल दर मजल मोगलांचा उपमर्द करावयाकरितां जात आहांत ऐसें वर्तमान परस्परें कळों आलें. मोगलस्नेहांत असतां दर्पें करून दुर्बुद्धि धरिल्यास पारिपत्याचा विचार योजावा लागेल. फौजेचा गाहा पुरता होय तावत्काल सलाबती खालें राखोन धरावें. कै० राव यांच्या युक्ति प्रयुक्ति आपण पाहिल्याच आहेत. "§

निजामाची भेट आटोपून पेशवा लगोलग पुढें सवाई जयसिंगाचे भेटीस गेला. ता. ७ मार्च रोजीं नर्मदापार होऊन सिंदे-होळकरांसह माळवा बुंदेलखंडांतून चालला असतां नारोशंकर लिहितो," सांप्रत आम्ही यजमानासमागमें माळवे प्रांतास आलों. आपांची वार्ता ऐकोन इकडील सरदारांच्या नजरा विच्छिन्न झाल्या. आम्ही लोक परम निराश्रित झालों. प्रस्तुत नानासाहेबांचे पायांशीं आमचा दंडक नाहीं, याजकरितां चित्त उद्विग्न आहे. उभयतां श्रीमंत असते तरी आमचा गौरव करते. राणोजी सिंदे, रामचंद्र बावा व मल्हारबा यांसीं आमचेविशीं शिफारसपत्रें पाठवावीं. खामखा उपराळा करून श्रीमतांकडून पदरीं घेवविणें.†" यावरून सरदारांची आपसांत दांडगाई वाढत चाललेली पेशव्याच्या नजरेस आली, ती त्यानें दक्षतेनें तात्काळ मिटवून बुंदेलखंडचा कारभार नारोशंकरासच सांगितला; आणि सर्व व्यवहारांवर नजर ठेवीत तो पुढील उद्योगास लागला.

**४ जयसिंगाची भेट.**—एदलाबादेहून पुढें प्रयाण करून पेशवा नर्मदापार झाला, त्यापूर्वीच मल्हारराव होळकरानें ता. ५ जानेवारीस धारचें ठाणें हस्तगत केल्याचें वर्तमान पेशव्यास कळलें. तसेंच नेमाडांत हांडिया व त्याजवळचीं बडी देवरी व छोटी देवरी‡ अशीं ठाणीं होतीं तीं आवजी कवड्यानें व त्रिंबक हरीनें काबीज केलीं. मिळून बादशहाच्या सनदा हातीं पडण्यापूर्वीच पेशव्यानें माळव्यांत मराठ्यांचा अंमल प्रत्यक्ष बसविला. मार्च-एप्रिल महिने पेशव्यानें चहूंकडे अंमल बसवून खंडण्या वसूल करण्यांत काढले. ता. १६ फेब्रुवारीस त्यानें हिंगण्यास लिहिलें, " सवाईच्या प्रांतास उपद्रव न देण्याबद्दल मल्हाररावास लिहून पाठविलें. ते उपद्रव करणार नाहींत. तुम्ही सवाईजींशीं उत्तम प्रकारें बोलून सत्वर कार्य होयसें करणें. चाल ढकल करूं नये. आम्हांस सर्व प्रकारें सवाईजींचा भरंवसा. आम्हांस कर्जावेगळें करावें, पातशहांपासून साधेल तें साधून घ्यावें, हें त्यांचे

§ कां. सं. प. या. ३९. † पे. द. २३.५; २१.१. ‡ रा. श. पृ. ९०.

वडीलपणास विहित आहे. बहुमानावरच मजकूर असला तर तसेंच लिहून पाठविणें." †

या स्वारींत जें काय यश आलें त्याचें सर्व श्रेय कांहीं नानासाहेबास देतां येत नाहीं. त्याला संभाळून घेणारी पूर्वीची कर्ती व अनुभवी मंडळी, मुत्सद्दी, लढवय्ये बरोबर होते. सिंदे, होळकर, पवार, पिलाजी जाधव, रामचंद्र मल्हार, महादोबा पुरंदरे वगैरे मागें पुढें जाऊन अंमल बसविण्याचीं व खंडण्याचीं कामें करीत होते..

मराठ्यांनीं धार काबीज केल्याचें वर्तमान ऐकून बादशाहास मोठा संताप आला. त्यानें लगेच सर्व उमरावांस व जयसिंगास बोलावून खलबत केलें. त्याचा मतलब. 'मुक्काम धवलपूर चमेल उत्तरतीर, ता. १७ मे. गतवर्षीप्रमाणें यंदांही मराठ्यांच्या फौजा अंतर्वेदींत उतरून मुलूख खराब करतील याजकरितां पातशहांनीं लहान मोठ्या अमिरांस सामील करून सवाईजीस रवाना केलें. प्रयागचा सुभा व अयोध्येचा मनसूर अलीखान यांसही सवाईजींस सामील होण्याचे हुकूम गेले. मातबर जमावानिशीं सवाइजी आगऱ्यास आले. हें वर्तमान श्रीमंतांस कळतांच मल्हारजी व राणोजी यांस बोलावून अमीरखान व मनसूर अलीखान यांस पायबंद द्यावयाचा विचार करून आवजी कवडे, गोविंद हरि व आणिक कितेक पथक्यांस प्रयागपर्यंत पाठविलें. त्यावरून ते दोन मुगल सुभे तिकडेच राहिलेसें पाहून सवाईजींनीं आपणच कलह करावा तरी पुरे पडणार नाहीं हा विचार ध्यानांत आणून सलुखाचा पैगाम केला, आयामल यांस पैगामास पाठविलें. त्यावरून पेशवे पिलाजी जाधवांस बुनग्यांत ठेवून राणोजी, मल्हारजी व पवार हे समागमें घेऊन धवलपुरास आले. सवाईजीही आगऱ्याहून आले. छ ७ रबिलावलीं ( १२ मे ) सवाईजी आपल्या लष्कराबाहेर आले; श्रीमंतही येऊन भेटी जाहल्या. दुसरे दिवशीं सवाईजी श्रीमंतांच्या डेऱ्यास आले. सारांश, श्रीमंतांच्या दैवास उपमा नाहीं. विस्तार कोठवर लिहावा. भेटीनंतर कळेल. समस्त मंडळी सखारामपंत बोकीलसुद्धां सुखरूप आहेत.' ‡

भोपाळच्या संग्रामांत निजामानें केलेले करार अनेक कारणांनीं अपुरे राहिले. पुढें बाजीराव मृत्यु पावला तेव्हां ते करार उगवून घेण्यासाठींच मुख्यतः ही स्वारी नानासाहेबानें केली. त्याचा पहिला उद्देश थेट दिल्लीवर

† खं. ६.१५१. ‡ पु. द. १.१४९.

जाऊन बादशहास भेटून त्वरित निकाल लावून घ्यावा असा होता. ग्वालेर-पावेतों येतांच जयसिंगानें बादशहाच्या अनुमतीनें पेशव्याशीं सलुखाचें बोलणें चालू केलें. मराठ्यांचा प्रतिकार युद्धानें करणें अशक्य होय अशी खात्री दिल्ली दरबारची झाली होती. आग्रा ग्वालेरच्या दरम्यान दोन महिने वाटाघाट चालली. पेशव्यानें प्रथम चढाईची मोठी मागणी केली कीं समस्त हिंदुस्थानची चौथाई बादशहांनीं आपणास कबूल करून द्यावी म्हणजे आपण सर्व देशाच्या संरक्षणाची जबाबदारी घेऊं. त्यावर बोलणीं होऊन निष्कर्ष ठरला, कीं माळवा व गुजरात या दोन प्रांतांच्या सुभेगिरीचें फर्मान ताबडतोब दिल्यास, जास्त मागणी सोडून देऊन परत जाऊं. त्यावर बादशहांनीं आपली मान्यता दर्शविली आणि महादेवभट हिंगण्यांबरोबर फर्मान रवाना करूं असें कळविलें. मात्र तशा प्रकारची अर्जदास्त पेशव्यानें लिहून गुजरावी म्हणजे ती विनंति मान्य केल्याचें फर्मान बादशहा देतील. तशा प्रकारची अर्जी पेशव्यानें लिहून पाठविली आणि हा सर्व प्रकार प्रत्यक्ष खरा करून घेण्याकरितां पेशवा-जयसिंगाच्या समक्ष भेटीचा विचार ठरला.

चंबळच्या पलीकडे धवलपुर येथें जयसिंगानें यावें व इकडून पेशव्यानें जावें असें ठरून तदनुसार पेशवा आपल्या लष्करानिशीं चंबळ उतरून गेला. ता. १२ पासून १९ मे, स. १७४१ पावेतों उभयतांच्या भेटी व बोलणीं मनमुराद झालीं. महादेवभट हिंगणे जयसिंगापाशीं होता, त्यास पेशव्यानें लिहिलें, " उदईक सोमवारीं विसा घटका भेटी व्हावी लागते, यास्तव पहाटेस त्रिवर्गास घेऊन अलीकडे येणें. येथें मल्हारबाचा आग्रह, कीं आपले हातीं कोण ते देऊन जाणें. बिहारीदास भाईजी आमचे असतां फिकीर नाहीं. राजमलजी व हेमराज या उभयतांचे पुत्र घेऊन येणें, म्हणजे हे दोघे पुत्र व ताम्राकडील भला माणूस असे तिघे मल्हारबाजवळ येऊं. मुख्य गोष्ट सवाईजीशीं राजकारण केलें तें सिद्धीस न्यावें व उभयपक्षीं स्नेह करून द्यावा." भेटीच्या प्रसंगीं दगा वगैरे होऊं नये म्हणून प्रमुख माणसें ओलीस ठेवण्याची वरील खबरदारी घेतलेली दिसते. पुढें भेट झाली तिचें वृत्त पिलाजी जाधव ग्वालेरीस होता त्यास लिहिलें तें असें. "ता. १२ रोजीं सवाईजींची भेटी जाहली. तेच दिवशीं सायंकाळीं आम्ही त्यांच्या डेऱ्यास गेलों. आज गुरुवारीं ते आमच्या डेऱ्यास येतील. ता. २० रोजीं निरोप घेऊन येऊं."†

† पे. द. २१.२; रा. ख. ६.१५२.

भेटींत तहाचा निष्कर्ष ठरला त्याचा तपशील अनेक ठिकाणीं आढळतो. सर जदुनाथांनीं जयसिंगचरित्र लिहिलें आहे त्यांत उल्लेख आहे तो असा — ( १ ) परचक्र आलें असतां पेशवा व जयसिंग यांनीं एकमेकांचें साह्य करावें; ( २ ) बादशहांशीं बेइमानी करूं नये; ( ३ ) सहा महिन्यांचे आंत माळव्याची सनद जयसिंगानें बादशहाकडून मिळवून द्यावी. असे ठराव होऊन पेशवा धवलपुराहून ग्वालेरीस परत आला. बादशहाकडून पंधरा लाख रोख पेशव्यास मिळाले. शिवाय ठिकठिकाणच्या खंडण्या वगैरे मिळून या स्वारींत बरीच प्राप्ति त्यास झाली. पर्जन्यकाळ आल्यामुळें पुढील कामें पुरीं करून घेण्यासाठीं सिंदे–होळकरांस छावणीस ठेवून पेशवा परत निघाला तो ता. ७ जुलै, स. १७४१ रोजीं पुण्यास पोंचला.

**५ माळव्याचें फर्मान.**—पश्चात् जयसिंगानें आपलें वचन बिनचूक पाळलें. मराठ्यांचा जोर त्याच्या व बादशहाच्या प्रत्ययास चांगला आला. पेशव्याची अर्जदास्त स्वीकारून बादशहानें कळविलें,मागणीप्रमाणें माळव्याच्या सुभेगिरीच्या सनदा आम्ही हिंगण्यांबरोबर पाठवीत आहों. सनदा व फर्मान तयार होऊन ता. ४ जुलै, रोजीं बादशहाचें शिक्कामोर्तब झालें. त्याचा तपशील पुढें देण्यांत येईल. फर्मानांत कित्येक मुद्यांची स्पष्टता नव्हती, तिचा खल होऊन पुनः ता. ७ सेप्टेंबर, सै. १७४१ रोजीं दुसरें फर्मान माळव्याचा संपूर्ण कारभार दिवाणी फौजदारीचा देखील पेशव्याचे हवालीं केला अशी लेखी कबुली बादशहानें दिली, ती पुढें यथावकाश जयसिंगामार्फत पेशव्याकडे दाखल झाली. मात्र माळवा प्रांताच्या तेवढ्या सनदा आल्या. गुजरातच्या आल्या नाहींत. त्याचा प्रयत्न पुढें सारखा चालू होता. पण प्रत्यक्ष ताबा मराठ्यांचा गुजरातवर झाल्यामुळें पुढें सनदांची जरूरच उरली नाहीं.

सन १७२८ च्या कीलक संवत्सरांत जो उपक्रम चिमाजीनें केला त्याची सांगता स. १७४१ च्या दुर्मति संवत्सरांत झाली. बादशहाच्या दुर्मतिमुळेंच इतका घोळ पडला. सनदा हातीं येण्यापूर्वी प्रत्यक्ष अंमल मराठ्यांचा बसलाच होता. सनदा देऊन त्यानें आपली अब्रू बचावली इतकेंच. थोडीशी पळवाट म्हणून बादशहानें माळव्याचा सुभा शहाजादा अहंमद याचे नांवें दाखल करून त्याचे दुय्यम म्हणून पेशव्याची नेमणूक केली. सनदांत बाळाजीच्या नांवाबरोबर चिमाजीचें नांव होतें, म्हणजे त्या चिमाजीच्या हयातींतच तयार झाल्या होत्या. पुढें चिमाजीचें नांव कमी करून सरदारांची

जामीनगिरी दाखल करण्यांत आली. ' बादशहांनीं कृपावंत होऊन नोकर बाळाजीराव व चिमाजी आपा यांचा अर्ज विचारांत घ्यावा, कीं आम्ही खालीं लिहिल्याप्रमाणें नोकरी बजावण्यास तयार आहों. बादशहाचे हुजुरास आम्हांस पदवी प्राप्त होऊन आमची इभ्रत वाढावी. त्यावरून लिहिण्यांत येतें जे.' असा या फर्मानाचा आरंभ आहे.§

फर्मानाचा मुख्य मतलब खालीं लिहिल्याप्रमाणें —

१ मराठ्यांनीं माळवा प्रांत सोडून दुसऱ्या प्रांतावर स्वाऱ्या करूं नयेत.

२ इतर प्रांतांत मराठे सरदार गेल्यास त्यांचा बंदोबस्त पेशव्यांनीं करावा.

३ पेशव्यांनीं पांचशें स्वारांनिशीं आपला एक सरदार बादशहाचे चाकरीस ठेवावा.

४ बादशाहानें हल्लीं दिलेल्या ऐवजाबाहेर पुनः ज्यास्त मागणी पेशव्यानें करूं नये.

५ बादशहास जरूर लागेल तेव्हां चार हजार मराठी फौज त्याचे मदतीस पेशव्यांनीं पाठवावी. ज्यास्त फौज घेतल्यास त्याचा खर्च बादशाहींतून मिळावा.

६ बादशहांनीं दिलेलीं इनामें, जागिरी, धर्मादाय वगैरे पेशव्यांनीं दरोबस्त मुनासब चालविले पाहिजेत.

७ जमीनदार लोकांकडून कर वगैरे घेणें ते ठरलेल्या शिरस्त्याबाहेर घेऊं नयेत.

या शर्तींवर पेशव्यास माळव्याची नायब सुभेदारी देण्यांत येत आहे.

या करारास राणोजी सिंदे, मल्हारजी होळकर, यशवंतराव पवार व पिलाजी जाधव यांनीं जामीनदार म्हणून ता. २१ एप्रिल, १७४३ रोजीं कबुलायत लिहून दिली, कीं बाळाजीरावानें करार न पाळिल्यास आम्ही त्याची नोकरी सोडून देऊं. ही कबुलायत लिहून गेल्यावर मग बादशहानें सनदा तयार करून पाठवून दिल्या. एका चोरास जामीन दुसरा चोर अशा प्रकारची वरील जामीनकीची थट्टा डफनें केली आहे, पण हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्यासंबंधानें अशी टीका कोणी केली तर ती त्यांस रुचेल काय?

मराठ्यांना हें फर्मान मिळाल्याबरोबर माळवा बुंदेलखंड यांतील लहान मोठ्या सत्ताधीशांचे पूर्वीचे दिल्लीचे संबंध तुटून त्यांची पुनर्घटना पुण्यास

§ रा. खं. २, शकावली पृ. ९५, माल्कम सेंट्रल इंडिया १०; पे. द. ४०.५५.

होऊं लागली. त्यांच्या शेंड्या पेशव्याचे हातीं पडल्या, म्हणून नवीन घडी बसविण्यासाठीं पेशव्याचें लक्ष उत्तरेकडेच जास्त वेधलें गेलें. सिंदे, होळकर, पवार व जाधव यांनीं पेशव्याच्या सद्धेतूची जामीनगिरी लिहून दिल्यामुळें या सरदारांचें महत्त्व जितकें लौकिकांत वाढलें तितकाच खुद्द पेशव्यावरही त्यांचा शह वाढल्याशिवाय राहिला नाहीं. पुढील चार पांच वर्षांत जे संग्राम किंवा अन्य व्यवहार मराठ्यांनीं हातीं घेतले त्यांचें बीज या नवीन व्यवस्थेंतून निर्माण झालें असें दिसून येईल. भोपाळ व कोटा यांचीं उदाहरणें या संबंधांत समर्पक आहेत. दुसरा एक परिणाम सहज लक्षांत येतो तो असा, कीं सय्यदांच्या वेळेपासून सवाई जयसिंगाची मनीषा माळवा हस्तगत करून आपलें राज्य नर्मदेस भिडविण्याची होती ती उत्तरोत्तर विफल होऊन त्याला स्वसंरक्षणार्थ पेशव्यांच्याच तंत्रानें वागणें भाग पडलें. बाजीरावाशीं जो निकट स्नेह जयसिंगानें जोडला तो अंतीं त्यास बाधकच झाला. एवढेंच काय, पण माळव्याची सुभेगिरी मराठ्यांच्या पदरांत पडल्याबरोबर खुद्द जयपूरवाले मराठ्यांच्या छायेस आले. नशिबानेंही मराठ्यांस हात दिला. ता. २३ सेप्टेंबर, स. १७४३ रोजीं खुद्द जयसिंग मृत्यु पावला, तेणेंकरून राजपूत राजे कमकुवत होऊन त्यांस मराठ्यांच्या कच्छपीं जाणें भाग पडलें. मांडव-सरकारच्या वांटणीचा ठराव ना. रो. १.१८ पहातां वरील परिणामाची सत्यता नजरेस येईल.§

६ **बाबूजी नायकाचें पुण्यांतून उच्चाटन** (जुलै, स. १७४१).— पेशव्यांच्या विरुद्ध वागणारा एक पक्ष पुण्यांत व शाहूमहाराजांचे सन्निध साताऱ्यास होता. त्या वेळीं राज्याचा कारभार एकमुखी चालत असे. शाहूच्या अमदानींत पेशवे उत्तरोत्तर पराक्रमानें प्रमुख बनले. त्यांनीं जुनीं नवीं पुष्कळ कुटुंबें हाताशीं घेऊन त्यांस उदयास आणिलें. पुरंदरे, पटवर्धन, पेठे, वगैरे ब्राह्मण, चिटणीसादि प्रभु, शिंदे-होळकरादि मराठे, पेशव्यांच्या तंत्रानें वागून प्रसिद्धीस आले. पिलाजी जाधव, फत्तेसिंग भोसले असे कित्येक प्रतिष्ठित सरदार देखील काळवेळ ओळखून पेशव्यांचें तंत्र सांभाळून वागले. सुमंत, प्रतिनिधि, नारबावा मंत्री आढ्यतेनें पेशव्यांशीं थोडेबहुत फटकून वागत, त्यामुळें त्यांचें महत्त्व आपोआप मावळत गेलें. रघूजी भोसले, दाभाडे, गायकवाड हे स्वपराक्रमानें चमकत असल्यामुळें वेळीं अवेळीं

§ पहा 'Malwa-in-Transition'.

पेशव्यांस विरोध करीत. बाबूजी नाईक सावकारी पेशाचा मनुष्य; अंगीं पराक्रम नाहीं, पण घमेंड मोठी. पेशव्यांनीं त्याच्याशीं सोयरीक जोडून त्यास आत्मीय बनविलें तरी पेशव्यांचें तंत्र संभाळून वागण्याची हातोटी त्यास साधली नाहीं, म्हणून अखेरपर्यंत त्याचा व त्याच्या घराण्याचा पेशव्यांशीं कलह चालून राज्यसंवर्धनाचे कामीं तें कुटुंब निष्क्रिय बनलें. 'बाबूजी नाईक रुसवाच दाखवून येतात जातात' असा उल्लेख नोव्हेंबर, स. १७३९ चा आहे.§ मातुश्री राधाबाईनें त्यास बरेंच संभाळून घेतलें. बाबूजी नायकानें पेशव्यास सोडून रघूजीचा आश्रय केला. बाजीरावाच्या मृत्यूनंतर आपणास पेशवाई मिळावी अशी त्यानें खटपट केली ती त्याच्या गळयांत आली. रघूजीबरोबर कर्नाटकांत जाऊनही त्यास लभ्यांश झाला नाहीं. सिंदे, होळकर, रघूजीप्रमाणें आपण मुलूखगिरी करून एखादा मोठासा प्रांत हाताखालीं घालण्याची त्याची मोठी हाव होती, ती अर्थातच नानासाहेबानें चालूं दिली नाहीं. परंतु पेशव्यांनीं त्याचें कर्ज घेतलेलें असल्यामुळें तें शस्त्र दाखवून त्यानें पेशव्यास अडविलें. जुलैंत पेशवा परत येतांच त्यास कर्जाचा तगादा करून नायकानें भंडावून सोडलें. बाजीरावाचे पश्चात् अस्तनींतल्या निखाऱ्या-प्रमाणें नानासाहेबास आपल्या शनिवारवाड्याशेजारीं नायकाचें वास्तव्य दुःसह झालें. 'त्यानें तगादा करून पेशव्याच्या दारांत ब्राह्मण बसविला.'‡ याचा अर्थ ब्राह्मणानें उपास करून जीव देण्याचा धाक घातला. तेव्हां देण्याचा निकाल करून नायकास पुण्याच्या बाहेर घालवून दिलें. पेशवे यास बहुत संकट प्राप्त झालें तेव्हां महादाजी अंबाजीनें पैशाची तजवीज करून पेशव्याची मुक्तता केली. नाईक जाऊन शाहूमहाराजांचे पाठीशीं पडला आणि उघडपणें रघूजी भोसले व दमाजी गायकवाड यांस पेशव्यांच्या विरुद्ध सामील झाला. पुढील सालीं पेशव्यानें माळव्यांत स्वारी केली; त्याच वेळीं दमाजी व बाबूजी यांनीं गुजरातेंतून माळव्यांत शिरून लुटालूट केली. तो प्रकार पुढें सांगण्यांत येईल. रघूजी भोसल्याच्या नादास लागून बाबूजीनें आपलें नुकसान करून घेतलें. पेशव्याचा एक हस्तक लिहितो, ( स. १७४२ ),—

"सिदंभट व बराणजी मोहिते यांस रघूजी भोसले साताऱ्यास राणी सगुणाबाईकडे रवाना करणार. बाबूजी नायकाचीं पत्रें आलीं होतीं कीं तुमची

§ पु. द. १. १३२, १३३, १३५.

‡ भा. व. श. पृ. १८.

व·आमची जंगजोड व्हावी. तुम्ही व आम्ही एकत्र होऊन कर्नाटक व बंगाल यांचा बंदोबस्त करूं. बाईसाहेबांस रघूजींनीं लिहिलें, कीं आपण साह्यता करून नायकांची व आमची जंगजोड होय तें करावें." नायकाचें हें राजकारण हळूहळू बरेंच सिद्ध झालें. संकटसमयीं शाहूला नायकानें व त्याच्या वडिलांनीं द्रव्यसाह्य केलेलें होतें, तें शाहू कधीं विसरला नाहीं. त्यानें पेशव्यास न जुमानतां नायकास बारामती येथें जागीर देऊन त्याची व्यवस्था लावून दिली. तेथें स. १७४३ त वाडा बांधून तो आपल्या राजधानीप्रमाणें नांदूं लागला. पुण्यांतून हुसकून दिल्यामुळें त्याचें म्हणण्यासारखें नुकसान झालें नाहीं. शाहूच्या या पुरस्काराला अंगच्या धडाडीची जोड असती तर नायकाचें स्वतंत्र राज्य बनलें असतें. ता. १९ जून, स. १७४३ ची शाहूनें नायकास दिलेली सनद आहे, तींत तो लिहितो,—

"स्वामीस सर्व प्रकारें तुमचा अभिमान आहे. कर्नाटक प्रांत विजापुर व प्रांत भागानगर अहद तुंगभद्रा दक्षिण तीर तहद रामेश्वर हरदू सुभ्यांचा तालुका तुमचे स्वाधीन करून दरसाल सात लाख प्रमाणें पांच सालां मुक्रर केला आहे. सालमजकुरापासून वसूल घ्यावासा तह तुम्हीं मान्य केला आहे. ऐवज पाववून अंमल करणें. घालमेल होणार नाहीं येविशीं समाधान असों देणें. सेवा करून स्वामी संतोषी होत तें करणें."§ कर्नाटकचा हा मामला नायकास पचूं द्यावयाचा नाहीं असा जंग पेशव्यानें बांधला त्याचें बीज वरील घटनेंत आहे. शाहूच्या वार्धक्यांत कारभारावरील त्याचा दाब ढिला पडत गेला, म्हणूनच नायकाचा प्रयत्न साधला नाहीं; आणि पेशव्यांनीं आपल्या जन्माचें मातेरें केलें ही नायकाची भावना अखेर पावेतों कायम राहिली. उपासतापास विषप्राशनादि आसुरी उपायांचा अवलंब नायकास करावा लागला, त्याचें दिग्दर्शन यथावकाश पुढें येणार आहे.

§ पे. द. ४०.२८.

३

# मराठी सत्तेचा पूर्वेस फैलाव

## कालसूची

| | | | |
|---|---|---|---|
| १७२६ | | | अलिवर्दीखान नोकरींत दाखल. |
| १७२७ | जून | ३० | मुर्शीदकुलीखान मृ., शुजाखान दाखल. |
| १७३८ | | | शाहूनें बंगालची मुलुखगिरी रघूजीला सांगितली. |
| १७३९ | मार्च | १३ | शुजाखान मृ., सर्फराजखान दाखल. |
| १७४० | एप्रिल | १० | घेरियाची लढाई, सरफराजखान मृ., अलिवर्दीखान नबाब. |
| १७४१ | जाने० | ५ | सिंदे-होळकरांनीं धार काबीज केलें. |
| १७४१ | जून | २७ | शाहूनें रघूजीची स्वारीस पाठवणी केली. |
| ,, | डिसेंबर | | पेशवा उत्तरस्वारीस निघाला. |
| | ,, | | भास्कर राम बंगालस्वारीस निघाला. |
| १७४२ | फेब्रु० | २० | पेशव्याचा मुक्काम चांद्यावर; त्रिंबक विश्वनाथाची वऱ्हाडांत दंगल. |
| ,, | मार्च | | पेशव्यानें गढामंडळा काबीज केलें. |
| ,, | एप्रिल | | सिंदे-होळकरांची अभयसिंगावर चढाई. |
| ,, | ,, | | बाबूजी ना० व दमाजी गा० ची माळव्यावर चाल. |
| ,, | ,, | १५ | भास्कर रामानें अलिवर्दीस बरद्वान येथें वेढलें. |
| | मे | ६ | मराठ्यांनीं मुर्शिदाबाद लुटली. |
| | मे–सेप्टें० | | भास्कर रामानें पश्चिम बंगाल घेरला. |
| १७४२ | जून | २९ | पेशव्यानें ओर्छावर छावणी केली. |
| ,, | जुलै | | यशवंतराव पवाराची धारेस स्थापना. |
| ,, | सेप्टें० | २७ | खटवा येथें भास्कर रामावर अलिवर्दीचा छापा. |
| ,, | ,, | ३० | रघूजी भास्कर रामाचे साह्यास नागपुराहून निघाला. |

| | | |
|---|---|---|
| १७४२ नोव्हें० | ८ | पेशवा बुंदेलखंडांतून बंगाल्यावर निघाला. |
| १७४३ जाने-फेब्रु० | | पेशव्याची तीर्थयात्रा-प्रयाग, काशी, गया. |
| ,, मार्च | | पेशव्याचा मुक्काम गयेवर. |
| ,, ,, | २१ | पेशवा व अलिवर्दीखान यांची भेट. |
| ,, एप्रिल | | पेशवा व रघूजी यांची बेंडचे खिंडींत लढाई. |
| ,, मे | २० | पेशवा परत फिरून भागीरथीवर दाखल. |
| ,, ऑगस्ट | ३१ | सातारा येथें रघूजी व पेशवा यांचा समेट. |
| १७४४ जाने० | | भास्कर रामाचें बंगाल्यावर प्रयाण. |
| ,, मार्च | ३० | भागीरथीचे कांठीं मनकाराचे छावणींत भास्कर राम व २१ सरदार यांचे अमानुष खून. |
| १७४५ फेब्रु० | | रघूजी बंगालचे स्वारीस निघाला. |
| ,, मे | ६ | कटकचा किल्ला व ओरिसा प्रांत काबीज. |
| ,, डिसें० | २१ | रघूजीचा मुर्शिदाबादेवर पराभव व प्रत्यागमन. |
| १७४७ जाने० | | जानोजीचें बंगालस्वारीवर प्रयाण. |
| ,, ,, | | रघूजीची निजामास व शाहूस भेट. |
| १७४८ | | साबाजीची बंगालवर स्वारी. |
| १७५१ मार्च | | मीर जाफरचे मार्फत अलिवर्दीखानानें भोसल्याशीं चौथाईचा तह ठरवून युद्ध मिटविलें. |
| ,, जून | | वरील तहास रघूजीची मान्यता मिळाली. |
| १७५२ ऑग० | २४ | मीर हबीब मृ० |
| १७५५ फेब्रु० | १४ | रघूजी भोसले मृ० |
| १७५६ एप्रिल | १० | अलिवर्दीखान मृ० |

*

# ३
# मराठी सत्तेचा पूर्वेस फैलाव

१ रघूजी भोसल्याचें बीजारोपण
२ भास्कररामाचें आक्रमण
३ दुर्गापूजेचा विध्वंस
४ पेशवा–रघूजींची तेढ
५ अलिवर्दीखान-पेशवा भेट
६ पेशवा–रघूजींचा संग्राम
७ पेशवा–रघूजी समेट
८ अमानुष अत्याचार
९ सेवेची कदर
१० बंगाल मराठ्यांचा झाला

**१ रघूजी भोसल्याचें बीजारोपण.**— आतां पुढें सांगावयाची नानासाहेबाची स्वारी सर्वांत दीर्घ असून ती स. १७४१ च्या डिसेंबरपासून स. १७४३ च्या जूनपर्यंत झाली. तिला द्रव्यौघाची स्वारी असेंही म्हणतां येईल. स. १७४१ च्या उन्हाळ्यांत परत येण्यापूर्वीच पेशव्यानें उत्तरेंत वावरणाऱ्या सरदारांशीं पुढील उद्योगाची चर्चा करून बेत ठरविला, कीं बादशहा व त्याचे हस्तक यांना चहूंकडून जोराची चापती लावल्याशिवाय आपले राज्याचे मनोरथ सिद्धीस जावयाचे नाहींत. त्यासाठीं अंगांतील जोरावर स्वकीय किंवा परकीय विरोधकांस वठणीवर आणणें अत्यंत अवश्य आहे. या उद्योगाची वाटाघाट पेशव्यानें पावसाळ्याचे तीन महिने कुटुंबासह साताऱ्यास राहून शाहूशीं केली, त्यांतूनच बंगालचें राजकारण उद्भवलें.

पेशव्याला प्रथम माळवा बुंदेलखंडचा पाया मजबूद करावयाचा होता, कीं जेणें करून निजामाला दिल्लीकडील आश्रय दक्षिणेंत केंव्हांही मिळूं नये. सबब वरील दोनही प्रांतांत मराठे सरदार ठासून बसले. ताबा हातीं आला आणि बादशाही सनदेची मान्यताही मिळाली. अशा रीतीनें यमुनेपावेतों जम बसल्यामुळें पलीकडील काशीचा प्रदेश व बिहार-बंगाल प्रांत पेशव्याच्या कक्षेंत उतरले. कर्ज वारून द्रव्यबल वाढवायला बंगालपावेतों झडप मारण्याची आवश्यकता उत्पन्न झाली; आणि त्या कामीं नागपूरकर रघूजी भोसल्याशीं पेशव्याचा खटका उडाला.

बाजीराव व रघूजी यांचें रहस्य कधीं जुळलेंच नव्हतें. त्यांचा थोडाबहुत उघड सामना झाल्याचें वृत्त पूर्वी येऊन गेलें आहे. रघूजी पराक्रमी होता, पण बाजीरावही त्याला पुरेसा असल्यामुळें प्रसंग ओळखून रघूजीनें विकोप

दर्शविला नाहीं. नुकतीच कर्नाटकांत स्वारी करून त्यानें चांगलें यश मिळविलें. बाजीरावाच्या मृत्यूची खबर त्याला कळून बाबूजी नायकास पेशवाईपद मिळवून देण्याच्या उद्देशानें तो अल्पकाळ सातान्यास आला, पण शाहूनें तो प्रकार नामंजूर करून रघूजीला लगेच परत स्वारीच्या कामावर पाठविलें. मात्र या उपक्रमानें पेशव्याच्या मनांत रघूजीबद्दल तेढ उत्पन्न झाली. स. १७४१ च्या पावसाळ्यांत पेशवा उत्तर हिंदुस्थानांतून व रघूजी कर्नाटकांतून चंदासाहेबासह जवळ जवळ बरोबरच सातान्यास दाखल झाले. रघूजीनें शाहूची भेट घेऊन स्वारीचें वर्तमान निवेदन केलें आणि धन्याची शाबासकी मिळविली. "राजश्रींनीं बहुत खुषी मानून सेनासाहेबांस बहुमान वस्त्रें देऊन गौरव केला," (ता. २७ जून, स. १७४१ ).‡ लगेच नागपुरास जाऊन त्यानें भास्कर रामाची रवानगी बंगाल्यावर केली.

मोगल बादशाहींत बंगाल प्रांत संपन्न म्हणून महशूर होता. औरंगजेबाच्या युद्धास द्रव्याचा पुरवठा बंगालनें केला. त्याच्या पश्चात् देखील बंगालचा कारभार पुष्कळ वर्षें सुव्यस्थित चालल्यामुळें त्यांतून बादशहाची पैदास अविच्छिन्न चालू होती. पंजाब–दिल्लीकडचा प्रदेश नादीरशहानें धुऊन नेला, दक्षिणेंतून बादशहाची वसुली कधींच चालू नव्हती. माळवा-बुंदेलखंड प्रांत मराठ्यांनीं व्यापले. अशा स्थितींत बादशहाच्या खर्चास फक्त बंगाल तेवढा राहिला, पण त्याजवरही पेशवा व रघूजी या दोघांची दृष्टि वळल्यामुळें बादशहाला धास्ती पडली. त्याच वेळीं बंगालचा कारभार अलिवर्दीखानाचे हातीं जाऊन, त्याचाही वेध बादशहास लागला. ही अंतस्थ भानगड शाहूला कळत नव्हती. पेशवा व रघूजी दोघांनींही आपले बेत मनांत रचून शाहूची परवानगी मिळवून मुलूखगिरी स्वीकारिली. स. १७४१ च्या दसऱ्यास दोघे स्वारीस निघाले.

बंगाल, बिहार, ओरिसा या तीनही प्रांतांचा अंमल औरंगजेबाच्या वेळेपासून मुर्शीदकुलीखान या सुभेदाराकडे होता. तो ता. ३० जून, स. १७२७ रोजीं मरण पावला, तेव्हां त्याचा जावई शुजाखान यास सुभेदारी मिळाली. या दोघांनीं आपला कारभार नेकीनें करून बादशहाची सेवा यथायोग्य बजाविली. शुजाउद्दीन ता. १३ मार्च, स. १७३९ रोजीं म्हणजे नादीरशहा दिल्लीवर असतां मरण पावला तेव्हां लगेच बंगालची अव्यवस्था सुरू झाली.

‡ पु. रो. पृ. ४०, ४४

या वेळीं मोगल बादशाहींत वंशपरंपरागत कामें चालू झालीं, त्या प्रघातानुसार शुजाउद्दीनचा पुत्र सर्फराजखान कारभारावर आला. पण तो व्यसनी व गाफील असल्यामुळें अलिवर्दीखानानें जबरदस्तीवर सुभेगिरी बळकाविली, त्या भानगडींत मराठ्यांचा शिरकाव त्या प्रांतांत झाला.

अलिवर्दीखान हा जातीचा तुर्क स. १७२६ त बंगाल नबाबाच्या नोकरींत दाखल झाला. अंगच्या हुशारीनें त्याची बढती होत गेली. तो नबाबाचा मुख्य लष्करी अंमलदार बनून बिहार प्रांताचा कारभार त्याचे हातीं आला. बादशहाकडे त्याची वाहवा होऊन त्यास महाबतजंग किताब मिळाला, त्याच नांवानें तत्कालीन कागदांत त्याचा उल्लेख येतो. सर्फराजखान कारभारावर येतांच त्याच्या नालायकीमुळें जी अव्यव्यवस्था माजली तिचा फायदा आलिवर्दीखानानें लगोलग करून घेतला. पाटणाहून त्यानें मुर्शिदाबादेवर लष्करसह चाल केली, तेव्हां सर्फराजखानाशीं त्याची लढाई घेरिया § येथें ता. १० एप्रिल, स. १७४० रोजीं होऊन सर्फराजखान मारला गेला. त्याबरोबर अलिवर्दीखानानें मुख्य सुभेगिरीचा अधिकार धारण केला आणि मुर्शिदाबादची संपत्ति सर्व हरण करून बादशहाला दोन कोट रुपये भरून त्याजकडून तमाम प्रांताच्या सुभेगिरीची सनद मिळाविली. मिळून खान व बादशहा दोघे पैशावर खूष झाले.

अलिवर्दीखान हुशार, अनुभवी व खटपटी होता. परंतु पूर्वीच्या नबाबांचा हक्क बुडवून त्यानें अधिकार धारण केला हा प्रकार कोणासच रुचला नाहीं. त्या वेळीं इंग्रजांचें सामर्थ्य वाढत होतें, त्यांस खूष ठेवून अलिवर्दीखानानें त्यांचा पाठिंबा मिळविला. अर्थात् इंग्रज त्याची वाखाणणी करूं लागले. तथापि त्याच्या कारभारास नानाप्रकारचीं विघ्नें येऊन त्यांतूनच भोसल्यांच्या स्वाऱ्या निर्माण झाल्या. शाहूनें सरदारांस मुलूखगिरीचीं क्षेत्रें वांटून दिलीं, त्यांत देवगडचांदा व त्यापुढील पूर्वेकडचा प्रदेश भोसल्याच्या कक्षेंतला होता, पण सर्व सरदारांना एकसूत्रांत वागविण्याचें काम पेशव्याचें असल्यामुळें सरदारांचे पेशव्याशीं वारंवार खटके उडत. दाभाडे, आंगरे, रघूजी भोसले इत्यादींचा पेशव्यांशीं बेबनाव घडण्याचें मूळ छत्रपतीच्या कमकुवतपणांतून निघालें. एकहाती हुकमत असल्याशिवाय कोणताच व्यवहार यशस्वी होत नसतो. प्रस्तुतच्या स्वारींत रघूजी व पेशवा यांचा विरोध अनेक कारणांनीं अपरिहार्य बनत गेला.

§ घेरिया सांताळ परगण्यांत राजगड रेल्वे स्टेशनजवळ नलहाटीच्या उत्तरेस २० मैलांवर आहे.

स. १७३८ त शाहूनें रघूजीस मुलूखगिरीची सनद दिली, तींत ‘सुभा लखनौ, बेदर, मकसुदाबाद, बुंदेलखंड, अलाहाबाद, पाटणा व डाका’ अशी त्याच्या क्षेत्राची फोड आहे.§ पैकीं बुंदेलखंडावर पेशव्यानें आपला ताबा पूर्वीच बसविला होता आणि हल्लींच्या स्वारींत त्याच प्रांतांत पेशव्यानें आपलें मुख्य अधिष्ठान बनविलें. मुलूखगिरीस जाण्याचे दोघांचेही बेत साताऱ्यास ठरले. रघूजी महाराजांचा निरोप घेऊन लगोलग नागपुरास गेला. कारण बंगालच्या सुभेदाराचा एक अंमलदार मीर हबीब नांवाचा रघूजीकडून लष्करी मदत मागण्यासाठीं त्याची भेट घेण्यास नागपुरास तिष्ठत बसला होता. हा मीर हबीब इराणांत शिराज येथें राहणारा कैक वर्षांपासून मुर्शिदकुलीखानाचे पदरीं नोकरीस राहून अंगच्या गुणांनीं उदयास चढला. त्याला फारशी भाषा अवगत असून कारभाराच्या अंतःस्थितीची भरपूर माहिती होती. ओरिसाचा कारभार पुष्कळ वर्षे करून त्यानें प्रतिष्ठा मिळविली. अलिवर्दीखानाच्या हाताखालींही त्यानें काम केलें होतें. पुढें अलिवर्दीखानानें सर्फराजखानास मारून मुर्शिदकुलीखानाच्या कुटुंबाचा संहार केला हा प्रकार मीर हबीब यास दुःसह वाटून, त्याचा प्रतिकार करण्याचें जोखीम त्यानें अंगावर घेतलें. मीर हबीबला साफ काढून लावण्याचा अट्टाहास अलिवर्दीखानानें चालविला म्हणून प्रकरण चिडीस गेलें.

या वेळीं रघूजीच्या पराक्रमाची चहूंकडे मोठी कीर्ति पसरली होती. दमलचेरीच्या लढाईंत सफदरअलीस मारून त्यानें कर्नाटकचा नबाब धुळीस मिळविला आणि त्रिचनापल्ली हस्तगत करून चंदासाहेबास साताऱ्यास कैदी बनविलें हा प्रकार जाहीर झाला, तेव्हां त्याची मदत आणून अलिवर्दीखानाचा पाडाव करावा असें कारस्थान मीर हबीबनें गुप्तपणें रचिलें. त्यामुळें मीर हबीबचे हातून ओरिसा प्रांत काढण्यासाठीं अलिवर्दीखानानें त्याजवर स्वारी केली. सबब त्या कामीं रघूजीची मदत मागण्यासाठीं मीर हबीबचे दूत रघूजीस कर्नाटकांतच जाऊन भेटले. रघूजीनें त्यांस आश्वासन देऊन नागपुरास भास्कर रामाकडे पत्रें देऊन परत पाठविलें आणि आपणही मागोमाग साताऱ्यास जाऊन बंगालच्या स्वारीस महाराजांची आज्ञा घेऊन नागपुरास दाखल झाला. तेथें मीर हबीब, रघूजी व भास्कर राम यांनीं स्वारीची वाटाघाट करून पुढील बेत ठरविले. मीर हबीबसारखा कर्तृत्ववान व हुशार मोगल अधिकारी

§ ना. भो. ब० पृ. ५० (ब. आ.)

अलिवर्दीखानाचा कांटा काढण्यासाठीं साह्य मागण्यास आला ही गोष्ट रघूजीस इष्टच वाटली आणि त्यानें उत्साहपूर्वक त्याचा पुरस्कार स्वीकारला.

**२ भास्कररामाचें आक्रमण.**—दरम्यान अलिवर्दीखानानें ओरिसा प्रांत काबीज करून तेथील नायबसुभेगिरीवर आपल्यातर्फेचा सौलतजंग यास नेमिलें. या सौलतजंगानें त्या प्रांतांत भयंकर अत्याचार केले, तेणेंकरून लोक बंडें करून उठले आहेत अशी बातमी नागपुरास स्वारीची चर्चा चालू असतांच आली. या संधीचा उपयोग करून भास्कर राम स. १७४१ अखेर नागपुराहून निघाला तो खबरदारीनें ओरिसाकडे चाल करून गेला. दरम्यान अलिवर्दीखानानें स्वतः तेथें येऊन बंडें मोडिलीं आणि आतां सर्व निर्भय आहे असें पाहून तो परत मुर्शिदाबादेकडे जाऊं लागला. तों वाटेंतच भास्कर राम दाखल झाल्याची बातमी त्यास समजली. भास्कर रामाजवळ दहा हजार फौज होती पण ती चाळीस पन्नास हजार आहे असा पुकारा त्यानें मुद्दाम केला. रामगडच्या जंगलांतून उतरून त्यानें पंचेट† परगणा लुटला. जवळ आलेला पाहून अलिवर्दीखानानें एकदम भास्करपंतावर चाल केली. पण मराठ्यांपुढें त्याचा निभाव लागला नाहीं. खान हलके हलके मागें हटत ता. १५ एप्रिल रोजीं बरद्वानला पोंचला आणि शहराबाहेर राणीच्या तलावाच्या कांठीं बंदोबस्तानें छावणी करून राहिला. सकाळीं उठून पाहतो तों त्याची सर्व छावणी भास्करपंतानें वेढून घेतली.

बरद्वानच्या छावणींत भास्करपंतानें नबाबास कोंडून धरल्यामुळें मोगल फौजेचे अन्नपाण्याविणें अत्यंत हाल होऊं लागले. आठ दिवसांत त्यांजवर मरणप्राय प्रसंग आला. भास्करपंतानें आपली अर्धी फौज वेढ्याचे कामीं ठेवून बाकीच्यानें सभोवारचा प्रदेश बेचिराख केला. नाइलाजास्तव नबाबानें पंताकडे शरण जाऊन तहाची याचना केली. त्यावरून पंतानें दहा लाखांची रक्कम मागितली. नबाबाला त्याचे सैनिक बोलले, मराठ्यांस एवढी रक्कम देतां ती आम्हांसच द्या म्हणजे आम्ही त्यांचा पाडाव करितों. मराठे कांहीं एवढ्यावर संतुष्ट राहणार नाहींत, एकदां पैशाची चटक लागली कीं ते आपणास असाच त्रास सारखा देत राहतील. तें म्हणणें मान्य करून नबाबानें गुपचूपपणें रात्रीं कांहीं थोड्या लोकांनिशीं खटवा येथें पळून जाण्याचा विचार ठरविला.

† पंचेट रांचीच्या पू० ६० मैल.

बरद्वानच्या ईशान्येस ३५ मैल हें ठिकाण होतें. पण नबाबाचा प्रयोग गुप्त राहूं शकला नाहीं. जे लोक मागें ठेविले त्यांना आपल्या जिवाची धास्ती पडून ते गलगा करून नबाबाच्या मागोमाग निघाले आणि मराठ्यांना चाहूल लागून त्यांनीं नबाबास अडवून पुनः एका शेतीच्या मैदानावर कोंडून धरिलें, आणि लष्करोपयोगी त्याचें सामान मागून येत होतें तें लुटून घेतलें. पैकीं तंबू होते ते जाळून टाकिले. या योगानें नबाब केवळ सांपळ्यांत सापडल्यासारखा झाला आणि सुटकेसाठीं पंताच्या काकुळती करूं लागला. पूर्वी दहा लाखांवर तडजोड झालेली नबाबानें मोडली, सबब त्वेष येऊन आतां पंतानें एक कोट दंड रोख आणि हत्ती वगैरे सर्व अजबाब मागितला. नबाबाचा सेनापति मुस्ताफाखान म्हणून होता, त्यानें या मागण्या झिडकारून जवळ थोड्या बहुत तोफा होत्या त्यांच्या साह्यानें लढत लढत खटवा येथें पोंचण्याची शकल चालविली. जड सामान सर्व मराठ्यांनीं घेतलें. रस्त्यांत बरद्वानपासून २१ मैलांवर निगुणसराई येथें लढाई होऊन नबाबाचा सरदार मुसाहीबखान मारला गेला, स्वतः नबाब मात्र पडत झडत खटवा येथें पोंचला. या ठिकाणीं त्यास मुर्शिदाबादेहून धान्य व सामुग्री येऊन त्याचा पेंच वारला. खटवा व इतर आजूबाजूचा प्रदेश मराठ्यांनीं अगोदरच लुटला होता. दरम्यान मीर हबीब येऊन भास्करपंतास सामील झाला.

आतां मे महिना सुरू होऊन पावसाचीं चिन्हें दिसूं लागलीं. यास्तव तूर्त आपण नागपुरास परत जाऊन पुनः पावसाळ्यानंतर परत यावें असा पंताचा विचार होता, पण मीर हबीबनें त्यास कळविलें, तुम्ही असें घाबरून जाण्याचें कारण नाहीं. मुर्शिदाबाद नजीक आहे. तेथें बंदोबस्त कांहीं नाहीं. तें शहर आपणांस सहज लुटून घेतां येईल. असें सांगून हें काम स्वतः मीर हबीबनेंच सिद्धीस नेलें. सातशें चपळ मराठे स्वार निवडून घेऊन तो ता. ६ मे, स. १७४२ रोजीं मुर्शिदाबादेवर गेला. तेथें मीर हबीबचा भाऊ व बायकामुलें होतीं तीं त्यानें सोडवून जगत्‌शेट आलमचंद, मुरादअलीखान, राजा दुर्लभराय वगैरे लोकांच्या धनाढ्य पेढ्या लुटून अडीच कोटींची संपत्ति आणिली. अलिवर्दीखानाचा वडील भाऊ हाजी अहंमद मुर्शिदाबादचे बंदोबस्तास होता, त्यानें शहराचा बचाव कांहींच केला नाहीं. आपण मात्र जीव बचावण्यासाठीं किल्ल्याचे आश्रयास जाऊन लपून बसला. मीर हबीब लूट घेऊन पंताकडे खटवा येथें दाखल झाला.

मराठे मुर्शिदाबादेवर गेल्याचें ऐकून नबाबही त्यांच्या मागोमाग दुसऱ्या दिवशीं ता. ७ मे रोजीं खटव्याहून त्या राजधानीस पोंचला. भागीरथीस पूर आल्यामुळें पंताकडून त्याचा पाठलाग होऊं शकला नाहीं. अशा प्रकारें पंताचा उद्योग मीर हबीबच्या साह्यानें पूर्ण यशस्वी झाला आणि त्यानें खटवा येथेंच आपली छावणी बसविली. येथून त्यांनीं पश्चिम बंगालचा भागीरथीपर्यंतचा म्हणजे राजमहालपासून बरद्वान मेदिनीपुर व जाळेश्वरचा प्रदेश कबजांत आणिला, आणि त्यांत आपलीं ठाणीं बसवून बंदोबस्त केला. मोठमोठे लोक भागीरथीच्या पूर्वभागांत जाऊन राहिले. ओरिसाचें बंदर बालेश्वर मराठ्यांनीं घेतलें. या योगानें नदीच्या पश्चिम भागांत नबाबाचा अंमल कांहींच उरला नाहीं. बरद्वान–खटवाचा प्रदेश तर निर्जन व भयाण बनला. त्या वेळीं हुगळीचें ठाणें सधन व प्रसिद्ध असून त्याच्याच आटोक्यांत कलकत्ता, चंद्रनगर व चिनसुरा हीं इंग्रज, फ्रेंच व डच यांच्या व्यापारी वसाहतींचीं ठिकाणें होतीं, म्हणून त्यांजवर दहशत बसविण्यासाठीं भास्करपंतानें मीर हबीबच्या सल्यानें हुगळी स्थल जुलैचे आरंभीं काबीज केलें, त्यामुळें मराठ्यांच्या या आक्रमणाची दहशत इंग्रजांना देखील एवढी बसली कीं त्यांनीं कलकत्त्याच्या बळकटीसाठीं आपल्या वखारींच्या सभोंवार मोठा किल्ला बांधिला आणि सभोंवतीं एक मोठा खंदक खोदून त्यास 'मराठा डिच' नांव दिलें तें अद्यापि विद्यमान आहे.

अशा प्रकारें मे पासून सेप्टेंबर पावेतों पांच महिने भास्करपंत व मीर हबीब यांनीं एकंदर बंगाल प्रांतांत मोठी दंगल माजवून दिली. एवढ्या अवधींत मराठ्यांनीं तद्देशीय रहिवाश्यांवर अनिर्वाच्य अत्याचार केले असा महाराष्ट्र पुराणादि ग्रंथांच्या आधारें बंगालच्या लेखकांनीं जाहिराणा केलेला सुप्रसिद्ध आहे. भास्करपंताची ही स्वारी या पांच महिन्यांतच संपली असें नाहीं. मराठ्यांच्या अत्याचारांनीं उभयपक्ष अत्यंत संतप्त होऊन निकरावर आले, त्यामुळें त्यांजमधील द्वेषाचा अतिरेक होऊन त्याचें पर्यवसान भास्कर रामाचे खुनांत झालें. हा खून पुढें ३० मार्च, स. १७४४ रोजीं खटवा येथें झाला, त्या एकंदर प्रकरणाची बंगाली तर्फेची हकीकत गंगाराम नामक बंगाली लेखकानें ' महाराष्ट्र पुराण ' नांवानें प्रसिद्ध केली, त्याची सत्यासत्यता प्रत्यंतर पुराव्यानें निर्णीत होणें जरूर आहे.§

§ या महाराष्ट्र पुराणाचें इंग्रजी भाषांतर ' बंगाल पास्ट अँड प्रेझेंट ' या मासिकांत प्रो० समद्दार यांनीं प्रसिद्ध केलें आहे.

**३ दुर्गापूजेचा विध्वंस.**—अल्पावकाशांत भास्करपंतानें बंगालच्या नबाबास जर्जर करून मराठ्यांचा दरारा चहूंकडे बसविला, हा त्याचा पराक्रम वाखाणण्याजोगा म्हटला, तरी दिखाऊ विजयाच्या नादास लागून त्यानें आपली लहानशी फौज दूर दूर भागीं पांगून दिली त्यामुळें पुढें लवकरच तो डाव त्याचे अंगावर उलटला. चहूंकडे अंमल बसविण्यांत पंत गुंतला असतां, इकडे मुर्शिदाबादेस अलिवर्दीखानानें मराठ्यांवर सूड उगविण्याची जंगी तयारी केली. आश्विनांत दुर्गापूजेचा उत्सव तिकडे सर्वत्र फार मोठा होतो, तो या दसऱ्याचे प्रसंगीं आपणही साजरा करून तत्प्रांतीय लोकांचा सत्कार करावा असा बेत पंतानें ठरविला, आणि त्यासाठीं मोठी तयारी करून ठिकठिकाणचे विद्वान, शेटसावकार, जमीनदार व अधिकारी यांस आदरानें आमंत्रणें पाठविलीं. आश्विन शुद्ध प्रतिपदा, ता. १८ सेप्टेंबर रोजीं उत्सवास सुरुवात होऊन मुख्य दिवस दुर्गा अष्टमीचा ता. २६ रोजीं होता. उत्सवाच्या तयारीची गडबड चालू असतां नदीपलीकडे नबाबानें गुप्तपणें आपलें सैन्य आणून उतरिलें. होड्यांचा पूल करून मोठ्या साहसानें कांहीं लोक रात्रीं नदी उतरून गुपचूप अलीकडे आले, त्यांत नबाबाचा अफगाण सेनापति मुस्ताफाखान व मीरजाफर हे अग्रगण्य होते. दुर्गा अष्टमीच्या उत्तररात्रीं म्ह० ता. २७ रोजीं या लोकांनीं अकस्मात् पंताच्या छावणीवर हल्ला केला. त्याबरोबर मराठ्यांची त्रेधा उडून ते सैरावैरा पळत सुटले. त्या धांदलींतच मीर हबीबही पळून गेला. त्यानेंच मराठ्यांना वाट दाखवून थोडेंबहुत निभावलें. मागें मराठ्यांच्या छावणीची साफ वाताहत झाली. पंतानें रघूजीकडे खबर पाठवून निकडीनें फौजेची मागणी केली. रघूजीनें त्यापूर्वीच स्वतः बंगाल्यांत जाण्याचा विचार ठरवून चहूंकडे आपल्या हस्तकांस पत्रें पाठवून फौजेची सिद्धता केली होती. भास्कर रामास पुढें पाठविल्या पासूनच मागाहून आपणही त्वरेनें त्याचे साह्यास जाण्याचें त्यानें ठरविलें होतें. त्याच्याच आज्ञेनें भास्करपंत बंगालचे व्यवहार उलगडीत होता; आणि आपला पसारा फार वाढला आहे, थोड्या लोकांनीं निभाव लागणार नाहीं, अंगावर घेतलेलीं अवजड कामें निभावण्यास स्वतः रघूजीनें आलें पाहिजे, अशी निकड पंतानें त्यास अगोदरच कळविली होती. रघूजी २३ सेप्टेंबर रोजीं आपल्या मुजुमदारास लिहितो, " भास्करपंताकडून पत्रें आलीं तींच जिन्नस तुम्हांकडे रवाना केलीं आहेत त्यांवरून कळोन येईल. आम्हांस फौजेसहवर्तमान त्यांजकडे जाणें

जरूर. देखत पत्र लोकांचे पदरीं ऐवज घालून सत्वर त्यांची रवानगी करणें ; आमचें कूच दसऱ्यास आहे. भास्करपंतांनीं मकसुदाबादेस जाऊन कस्त मेहेनत केली आहे, त्याचें सार्थक इकडून फौज गेल्याविरहित होत नाहीं. सत्वर फौज त्यांजकडे जाऊन पोंचली पाहिजे. लोकांमध्यें कोणी हयगय करील याजकरितां फौजेचा गाहा होय, कोणी असामी मागें न राहे असें करून तिळतुल्य दिरंग न करणें." †

यानंतर चार दिवसांनीं पंतावर छापा पडला. खटवाच्या छावणीचा विध्वंस झाला, तरी भास्कररामानें बिलकुल न डगमगतां धैर्यानें धावपळीचें युद्ध खेळून नबाबाचा जोर थोपवून धरिला आणि रघूजी व फौज येईपर्यंत निभावणूक केली. हल्ला येतांच भास्करराम पंचेटच्या बाजूस पळून गेला. बरद्वान, हुगळी, हिजली हीं स्थळें मराठ्यांनीं सोडून दिलीं. पंचेटहून भास्करपंत दक्षिणेस मिदनापूरकडे वळला. राधानगर लुटून त्यानें एक टोळी कटकवर पाठविली. शेख मासूम म्हणून कटकचा अधिकारी नबाबाच्या तर्फेचा होता, त्यास ठार मारून तें ठिकाण पुनः मराठ्यांनीं काबीज केलें. इकडे पंताचा माग काढीत अलिवर्दीखान त्याच्या पाठीवर आला. उभयतांच्या ठिकठिकाणीं झटापटी पुष्कळ झाल्या. नबाबानें बहुतेक प्रांत सोडवून परत घेतला. कटक कबजांत आणून आणि तेथील बंदोबस्त करून अलिवर्दीखान ता० ९ फेब्रुवारी, स. १७४३ रोजीं परत मुर्शिदाबादेस पोंचला. तदुप्रांत त्याजवर रघूजी व पेशवा चालून आले, ती हकीकत पुढें कळून येईल. त्यासाठीं प्रथम पेशव्याच्या हालचाली समजून घेतल्या पाहिजेत.

**४ पेशवा रघूजींची तेढ.**—पेशव्याच्या मनांत रघूजीबद्दल चुरस असून त्याचाही बेत बंगालकडे जाण्याचा होता. मात्र स्वारींत गेल्यावर जसा बनाव बनेल तशी वर्तणूक करण्याचें त्यानें ठरविलें. स. १७४१ अखेर तो पुण्यांतून बाहेर पडला. फेब्रुवारींत त्याचा मुक्काम चांदे जिल्ह्यांत वैरागड येथें होता, म्हणजे भोसल्याच्या क्षेत्रांतच त्यानें संचार केला. "आम्ही श्रीमंतां-समागमें बंगाल प्रांतांत जावयासीं स्वार होऊन गेलों. बंगाल प्रांताहून फिरोन छावणीस आलों म्हणजे तुम्हास कळवूं. श्रीमंतांहीं कित्येक स्थळांचे करार करून दिल्हे." असा मजकूर ता० २० फेब्रुवारी, स. १७४२ च्या पत्रांत

† रा० खं. ३ ले० २०८, २२०, २२२ चीं हीं पत्रें ता. ३ ते २३ सेप्टें० चीं आहेत.

आढळतो. ‡ म्हणजे भास्करपंत व अलिवर्दीखान यांची झोंबाझोंबी बंगाल्यांत चालू असतांच पेशव्याचा बेतही त्याच प्रांताकडे जाण्याचा होता हें स्पष्ट होतें.

यानंतर पेशवा हंड्या, मकडाई, शिवनीवरून नर्मदा कांठानें गढा येथें पोंचला. मार्चांत गढा, मंडळा स्थळें घेऊन त्यानें बुंदेलखंडांत प्रवेश केला; आणि पावसाळयाची छावणी ओर्छा येथें करून दमो, सागर, ललितपुर, खेचीवाडा, अहीरवाडा, भदावर इत्यादि ठिकाणीं अंमल बसाविला. दरम्यान सिंदे-होळकरांस त्यानें चौथाईवसुलीसाठीं राजपुतान्यांत रवाना केलें. त्यांस ताकीद होती ती अशी : " अभयसिंगाचे मैत्रिकीची ममता बिलकूल न धरितां, जोधपुरावर शह देऊन दोन चार मातबर जागे जरबेखालें आणून द्रव्य साध्य करणें. निष्ठुरता केल्याखेरीज ते राजकारणावर येणार नाहींत. त्यांजकडील वकील येथें आले आहेत, परंतु ते ध्यानावर घेत नाहींत. राठोड बेइमान, त्यांची माया किमपि न धरितां साफ उत्तर करणें. " त्यावर ता० १२ एप्रिलचा सरदारांचा जबाब पेशव्यास आला, कीं " राजपूत साक्षात् बंधूंचें ऐकणार नव्हत, ते आमचें कोठून ऐकणार ! आम्ही स्वामिसेवेस चुकत नाहीं. प्रस्तुत जोधपुरासंनिध आलों आहों. प्रसंग दिसेल तसें करूं. कांहीं थोडी बहुत वसुली आली. मुलूख वैराण आहे. यादी पाठविल्या आहेत त्यांवरून विदित होईल. " §

ता. २९ जूनचें पेशव्याचें पत्र : ' मुलूखगिरीचे बहुत दिवस देशींच क्रमले. तदुत्तर नर्मदोत्तर तीरास आलियावर मंडळयाचा कार्यभाग विल्हेस लाविला. रजवाडियांत आठ आठ रोज लागले. दिवस निघोन गेले. देशीं परत यावें तर प्रजन्य लागोन नर्मदेस पाणी आलें. नांवा थोडक्या. पुढें तापी, लष्कर श्रमी होऊन नाश होईल, याजकरितां इकडेच छावणी केली." मल्हार कृष्ण अलगीवाले यास रामचंद्र मल्हारानें ओर्छावर पाठविलें, त्याचा कांहीं वसूल आला. ता० ३० जूनचा लेख : " दिल्लीचें वर्तमान व जयसिंगाच्या पुत्राची व अभयसिंगाची भेट झाल्याचें वर्तमान लिहिलें तें कळलें. होळकर-सिंद्यांकडील वर्तमान वाचून समाधान वाटलें. स्वामींचें तपोबल बहुत, या प्रभावें सेवकलोकांस उत्तम यश येतें. छावणीस राहिले उत्तम गोष्ट जाली. फौजांसह वर्तमान श्रीमंतांची छावणी माळवे प्रांतीं झाली, येणेंकरून वर्तमान

‡ अप्रकाशित वाईकर वैद्य दप्तर. पत्र विश्वनाथ भट वैद्यास हरि रघुनाथ जोग याचें.
§ पे. द. २७.२

यथास्थित असे." खुद्द पेशव्यानें ता० २० सेप्टेंबर रोजीं रामचंद्रबावास कळविलें, "या प्रांतींच्या मामलतदारांकडून कोणाचा ऐवज कसा उगवला, पुढें कोणापासून काय रसद घेतली पाहिजे, त्याचा अजमास आषाढापासून मागितला असतां दसरा समीप आला तरी हिशेब आला नाहीं. तरी ताबडतोब पाठविणें. फौजेचा खर्च तुम्ही जाणतच आहां."‡

बाबूजी नाईक पेशव्याचा विरोधी असून रघूजीच्या तंत्रानें चाले. पेशवा माळवा बुंदेलखंडांत गेलेला पाहून स. १७४२ च्या उन्हाळयांत बाबूजी नाईकानें गुजरातेंत जाऊन दमाजी गायकवाडास सामील करून रघूजीस साह्य करण्यासाठीं गुजरातेंतून माळव्यावर चाल केली. अशा रीतीनें हें त्रिकूट पेशव्यास पायबंद देण्यास उद्युक्त झालें. पेशवा सावध होता. पवार व होळकर यांस पाठवून त्यानें दमाजीस माळव्यांत उतरूं दिलें नाहीं; आणि ही आगळीक शाहूच्या कानांवर घातली. शाहूनें नायकाचा निषेध करून त्यास कर्नाटकच्या कामगिरीसाठीं साताऱ्यास बोलावून घेतलें. तथापि माळव्याचा विशिष्ट बंदोबस्त पेशव्यानें केला तो असा.—

स. १७४२ च्या पावसाळयांत पेशव्याचा मुक्काम बुंदेलखंडांत असतां यशवंतराव पवारानें धारचें ठाणें आपणास देण्याबद्दल विनंती केली. होळकरादि सरदारांनीं पेशव्यास जोराची शिफारस त्या बाबतींत केली. ती मान्य करून पेशव्यानें धारचा किल्ला व शहर पवाराच्या हवालीं केलें. मांडवगड व धार हीं ठिकाणें दया बहादुराच्या प्रसंगांत प्रथम मराठ्यांनीं घेतलेलीं पुढें मोगलांनीं परत मिळविलीं. मध्यंतरीं पवारांवर पेशव्यांचा रोष झाला. तदनंतर होळकरानें धारचें ठाणें ता. ५ जानेवारी, स. १७४१ रोजीं काबीज केलें, तें या वेळीं पवारांस मिळून त्यांचेंही कायम वास्तव्य माळव्यांत झालें. गुजरातेंतून गायकवाड वगैरेंनीं माळव्यावर हल्ला केल्यास त्याचा प्रतिकार करण्याची जबाबदारी पवारानें स्वीकारली. यशवंतराव पवार आतां चतुराईनें पेशव्याच्या आज्ञेंत वागून राज्याच्या कामीं खपूं लागला. अलीकडे त्यानें अभयसिंग व जयसिंग यांचें भांडण मिटवून राजपुतांचाही लोभ संपादिला.

याप्रमाणे बुंदेलखंडांत बसून पेशव्यानें काय कामें केलीं त्यांचें वृत्त थोडक्यांत सांगितलें. आतां पुढें त्याची चुरस बंगाल्यांत रघूजीशीं कशी बनून आली तें निश्चित ठरविण्याइतका पुरावा आज उपलब्ध नाहीं. या व पुढील कलमांत केवळ उतारे देऊन विषयाची मांडणी केली आहे.

‡ पे. द. २७.२; २१.५,६; २३.६; रा० खं. ६,१६४

पेशव्यानें आपल्या क्षेत्रावर आक्रमण करून गढा, मंडळा हीं स्थळें काबीज केलीं आणि पुढें बंगाल्याकडेही आपणास शह देणार हे प्रकार पाहून रघुजीचा मनस्ताप वाढत गेला. ता. ४ मे, स. १७४२ रोजीं त्यानें विश्वनाथभट वैद्यास पत्र लिहून महाराजांकडे तक्रार केली ती अशीः–" आम्ही मजल दरमजल वऱ्हाडांतून देवगड प्रांतें नागपुरचे मुक्कामीं आलों. ऐशीयास बाळाजी पंडित प्रधान फौजेसहवर्तमान आम्हांकडील सरंजामांत येऊन गढेमंडळे यासी मोर्चे लावून हल्ला करून किल्ला घेतला. तमाम मुलूख लुटला, जाळून खराब केला. देवगडप्रांताचे दोन तीन परगणे शिवणी, छपार वगैरे लुटून फन्ना केले. मंडळेकर राजा जोहार करून मृत्यु पावला. या रीतीनें मुलकाची खराबी कल्यावर कूच करून बघेलखंड प्रांतें गेले. आम्ही तों हा कालपर्यंत तिळतुल्य अंतर आपणाकडून पडों दिलें नाहीं. याउपरी आम्हांसही मुबदला करणें लागेल असें रा. स्वामींच्या कानावर घालावें. तसेंच त्रिंबक विश्वनाथ पेठे यांनीं वराडप्रांतें येऊन नानाप्रकारें मुलकास उपद्रव केला, तो पत्रीं काय लिहावा ! त्यांजकडे आमचे मामल्यापैकीं बाकीसाकीचा हिशेब येणें, त्याचा निर्गम न करितां उलटें प्रांतास उपद्रव केला, या निमित्य त्यांचें पारिपत्य करणें अगत्य जालें." † या त्रिंबकरावास रघूजीनें पुढें एक वर्ष अटकेंत ठेवल्यावर शाहूनें मुद्दाम हुजरे पाठवून सोडवून नेलें.

अशा प्रकारें पेशवा रघूजींची तेढ वाढत जाऊन दोघेही आपापल्या परी पुढील निकालाची तयारी करीत राहिले. उभयतांचे पक्षपाती शाहूजवळ होते तसेच बादशहाजवळही होते. केशवराव नांवाचा एक मराठ्यांचा स्नेही दिल्लीस होता, तो ता. ११ ऑगस्ट, स. १७४२ रोजीं रघूजीस लिहितो, " तुम्हांकडील वृत्त व्यंकाजी देवराव यांनीं निवेदन केलें, त्यावरून अवगत जालें. सार्वभौमाचा लोभ संपादून घेतला त्याचे अर्थ श्रुत जाले. इकडील वर्तमान व्यंकाजी देवराव सांगतां कळों येईल." बंगाल्यांत भास्कररामाचे हाताखालीं आनंदराव म्हणून कोणी गृहस्थ होता, त्यास रघूजी ता. ११ ऑगस्ट रोजीं लिहितो, " तुमचें वृत्त व्यंकाजी देवराव यांजकडून कळलें. मकसुदाबाद वगैरे तालुका तुमचा आहे ऐसें असोन तत्प्रांतींचें वर्तमान कांहींच लिहिलें नाहीं यावरून अपूर्व वाटलें. तरी पुढील विचार काय आहे, भास्कररामाची

† वैद्य दप्तर, अप्रकाशित.

छावणी तिकडे झाली आहे त्यांजकडील वृत्त वरचेवर लिहून पाठवावें. आम्हीही विजयादशमीचे मुहूर्तें तिकडे येत असों. " ¶

परंतु बंगाल्यांत जाण्यापूर्वी पेशव्याचा आशय समजून घ्यावा या उद्देशें रघूजीनें ता. ३० सेप्टेंबरच्या पत्रांत पेशव्यास विचारलें, "उंदरीहून कूच करून आम्ही देवगड प्रांतांत चाललों आहों. पुढें भास्कररामाकडे जाण्याचा इरादा आहे. आपण काय योजलें आहे तें आम्हांस कळवावें." ‡ याचें उत्तर पेशव्यानें काय दिलें तें कळत नाहीं, पण पेशव्याचा उच्छेद करण्याच्या तयारींत रघूजी असतां बंगाल्यांत भास्कररामाची वाताहत झाल्याची बातमी त्यास आली आणि तो लगोलग फौजेसह बंगालची वाट चालूं लागला.

**५ अलिवर्दीशीं पेशव्याची भेट.**—दरम्यान अलिवर्दीखान स्वस्थ बसला नव्हता. त्यानें स्वतः सैन्याची उभारणी तर केलीच, पण बादशाहकडे मदतीची याचना केली. दरसालची खंडणी नेण्यासाठीं बादशाहचे अंमलदार येऊन बसले होते त्यांच्या मार्फत त्यानें आपली करुण कहाणी निवेदन केली. ताबडतोब मदत न आल्यास बंगाल प्रांत कायमचा हातांतून गेला असें समजा असें त्यानें मुद्दाम त्या कामगारांस बजाविलें. इकडे पेशवा उत्तरेंत येऊन माळवा, बुंदेलखंड, अलाहबाद इत्यादि प्रांतांची चौथाईची मागणी बादशाहाकडे करीत होता; मोबदला म्हणून आम्ही बादशाहीस तोशीस लावून देणार नाहीं असें त्यानें बोलणें चालू केलें होतें. तें मान्य करून अलिवर्दीचें संरक्षण करण्याचें काम बादशाहानें ताबडतोब पेशव्याकडे सोपविलें आणि स्वारीखर्चाकरितां बंगालच्या उत्पन्नांतून त्यास रक्कम देण्याबद्दल अलिवर्दीखानास हुकूम दिला.

रघूजी व पेशवा हे एकसूत्रानें वागत नाहींत, आपसांत त्यांचा बेबनाव आहे हें अलिवर्दीनें जाणून रघूजीला आळा घालण्याविषयीं त्यानें परस्परें पेशव्यालाही कळविलें आणि खर्चासाठीं म्हणून कांहीं रक्कम पाठविली. मात्र ती पेशव्यास न मिळतां अयोध्येच्या नबाबानेंच मधच्यामध्यें लांबविली. दरम्यान बंगाल्यांत जाऊन रघूजीस हुसकून देण्याचा बादशाहाचा हुकूम पेशव्यास नोव्हेंबरांत बुंदेलखंडांत मिळाला.

एवंच भास्कररामाची दुरवस्था एका अर्थानें पेशव्याच्या पथ्यावर पडली. बादशाही मुलखाच्या संरक्षणाची हमी पतकरल्यामुळें पेशव्यास चौथाईच्या

¶ पे. द. २०.२४.२५ ‡ पे. द. २०. २७

सनदा देण्यास बादशहास कोणतीच हरकत उरली नाहीं. शिवाय नागपूरकर भोसल्यानें पेशव्यांशीं जो विरोध चालविला होता त्याला केव्हांना केव्हां आळा घालणें त्यास जरूर होतें. मराठमंडळाचा मुख्य चालक पेशवा हें तत्त्व मान्य करून त्याच्या इच्छेप्रमाणें आपलें धोरण आखण्यास रघूजी तयार नव्हता. खानदेश, वऱ्हाड, गढामंडला या भागांत त्यांचे खटके उडाल्याचें वर सांगितलेंच आहे. तेव्हां चालून आलेल्या संधीचा फायदा घेऊन बादशहाच्या हुकमानेंच बंगाल्यांत उतरून रघूजीला आळा घालण्याचें काम पेशव्यानें योजिलें. पेशव्याचा बंगाल्याकडे जाण्याचा उद्देश ता. ८ नोव्हेंबरच्या पत्रांत दाखल आहे तो असा. 'मुकाम अंतर्वेद नजीक दिल्ली, हिंडण नदी, इकडील वर्तमान तरी श्रीमंतांची स्वारी बंगाल्याकडे जावी असा विचार आहे.'§ त्यानंतर ता. १ फेब्रुवारी, स. १७४३ ची बातमी स्वारींतून पुण्यास लिहून गेली ती अशीः 'प्रयाग गंगा दक्षिणतीर. श्रीमंत ग्वाल्हेरप्रांतें आले. बंदोबस्त करून पटणे प्रांतीं जावें या उद्देशें बुंदेलखंडांत आले. पुढें पटणे प्रांतें न जातां प्रयाग काशी क्षेत्रें जवळ जाणोन येथें आले. त्रिवेणी संगमीं स्नानें झालीं. सकल विधि उत्तम रीतीनें जाहला. प्रयागच्या सुभांहीं आग्रहपूर्वक नावा दिल्या. बहुत लोक नावांत बसून किल्याजवळ स्नानें करून वटदर्शन करून आले. पाऊण लाख फौजेनिशीं जाऊन स्नान करणें हें कर्म पूर्वी जालें नाहीं, पुढें होणें दुरापास्त. अपारपुण्य तत्प्रभावें करून पुण्याच्या अपार राशी जाहल्या. येविशींचा विस्तार काय लिहावा! ईश्वरी कर्तृत्व विचित्र आहे.'

तथापि आपसांत वैर माजविणें अनुचित ही भावना उभयपक्षांत असून सामोपचारानें प्रकरण मिटविण्याचे प्रयत्न करण्यांत आले. इतकेंच नव्हे तर गयेपलीकडे चाळीस कोसांवर पेशव्यांचें लष्कर असतां रघूजी सडे स्वारीनें गयेस येऊन पेशव्यास भेटला. चार दिवस राहून प्रश्न निकालांत निघत नाहीं असें पाहून तो परत आपल्या सैन्यांत गेला. ¶

गयेहून पेशवा पुढें बंगाल्यांत अलिवर्दीखानाचे भेटीस गेला. त्यांच्या भेटी प्लासीनजीक ता. ३१ मार्च रोजीं झाल्या. पिलाजी जाधव स्वारींत मध्यस्थीस होता. अलिवर्दीनें आपला सेनापति मुस्ताफाखान यास पुढें पेशव्याकडे पाठवून भेटीची व्यवस्था ठरविली. पेशव्याचे वकील गंगाधरराव व अमृतराव यांसह

§ पे. द. २०.२८ ¶ पु. द. १. १५२.

पिलाजी प्रथम अलिवर्दीखानास जाऊन भेटला. कांहीं कपट न करण्याच्या उभयतांच्या आणाशपथा झाल्या. नंतर अलिवर्दीखान बऱ्हामपूर छावणीच्या दक्षिणेस सात मैल लावदा नांवाच्या गांवीं मुक्कामास राहिला. उभय लष्करांच्या दरम्यान पलाशीजवळ भागीरथीच्या पश्चिम कांठीं शामियाने उभारून त्यांत आठ दिवस पावेतों समारंभानें भेट सिद्धीस गेली. भेटीच्या प्रसंगीं मल्हारराव होळकर, पिलाजी जाधव व दुसरे कित्येक सरदार पेशव्याजवळ होते. नबाबानें पेशव्यास चार हत्ती, म्हशी, घोडे नजर केले. नबाबानें पेशव्यास २२ लाख रुपये स्वारीचा खर्च म्हणून द्यावे, बंगाल्याची चौथाई सालोसाल शाहूमहाराजांस द्यावी आणि उभयतांनीं मिळून रघूजीला काढून द्यावें असा ठराव झाला. रोख रक्कम देण्यासंबंधानें नबाबानें प्रथम नाखुषी दर्शविली, पण रघूजीचा बंदोबस्त न करतां आपण आलों तसे निघून जातों असा धाक पेशव्यानें घालतांच, नबाबानें रक्कम दिली. भेटी व बोलणीं सारखीं आठ दहा दिवस चाललीं होतीं. ‡

६ **पेशवा-रघूजींचा संग्राम.**—भेटी नंतर नबाब व पेशवा उभयतां रघूजीवर चालून गेले, त्याबरोबर रघूजी खटवा-बरद्वान येथील आपली छावणी मोडून बीरभूमच्या बाजूस वळला. रघूजीच्या चपळ घोडेस्वारांचा पाठलाग नबाबाकडून होणार नाहीं हें ओळखून, पेशव्यानें नबाबास सोडून दुसऱ्या रस्त्यानें जाऊन पंचेटजवळ बेंडूच्या बारींत ता. १० एप्रिल रोजीं रघूजीस गाठलें. भोसल्यांची मुख्य फौज पुढें निघून गेली होती, पण बाजार-बुणगे व सामानसुमान येत होतें तें पेशव्याच्या सैन्यानें लुटलें. पंचेटवरून पेशवा परत गयेस गेला व रघूजी नागपुरास परतला. ता. २० मे रोजीं पेशव्याचा मुक्काम भागीरथीतीरावर झाला. या प्रकरणासंबंधानें पेशवा रामचंद्रबावास लिहितो, "श्रीकृपें बंगालियास जाणें होऊन रकारनामकास हतवीर्य केलें. सर्वांवर दबाब विशिष्ट पडला; कां कीं हे म्हणतील तदनुरूप करतील. महाबतजंगापासून व सार्वभौपासून चार टके प्राप्त होणें ते जाहलेच. रकारपूर्वकांनीं बंगाल प्रांतें जाऊन छावणी केली. आपली शक्ति सामर्थ्य दाखविणें तें त्या लोकांस दाखविलें. आमच्या फौजेनें जावें, त्यास प्रतिकार करावा, हे सार्वभौमाची वासना आहे."† ता. २० जूनच्या पत्रांत राणोजी

‡ Sarkar's Fall of the Mughal Empire, vol. 1.

† रा. ब. पारसनीसकडून.

सिंदे लिहितो, 'आमची स्वारी मकसुदाबादेस गेली होती; तेथें रघूजी भोसल्याशीं गांठ घालून त्यांचा पराभव करून माघारे माळवे प्रांतें आलों.' §

पेशव्याशीं युद्धप्रसंग झाल्याची हकीकत रघूजीच्या पत्रांत आढळते ती अशीः "ता. ५ जून, स. १७४३, २२ रबिलाकर, राजश्री बाळंभट व राजश्री विश्वनाथभट गोसावी यांसी, अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. बहुतदिवस तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान श्रवण होत नाहीं याजकरितां चित सापेक्षित असे. तरी सविस्तरें कुशलवृत्तलेखन करून संतोषविलें पाहिजे. यानंतर इकडील वर्तमान तरी, गतवर्षी राजश्री भास्करराम फौजेसह वर्तमान मकसुदाबादेस जाऊन आलाबरदी खान यासी युद्धप्रसंग करून उप्रांत छावणी करून राहिले होते, त्याचे उपराळेयासी आम्ही फौजेसहवर्तमान मजल दरमजल श्रीगयेसंनिध गेलों तों राजश्री बाळाजी पंडित प्रधान फौजसुधां तत्प्रांतीं आले. त्यांणी आम्हांकडे भले माणूस पाठविले त्याजवरून आम्ही त्यांचे भेटीस जाऊन कितेक बोलणे चालणें परस्परें जाहालें. उप्रांत आम्ही राजश्री प्रधान यांचा निरोप घेऊन मकसुदाबादेस ताम्रांचे पारिपत्यानिमित्य मजल दरमजल चालिलों, ते कटवागंज या मुकामी श्रीभागीरथी तीरास मकसुदाबाद बाहेर ते जागीं मुकाम केला. तों मोगलांकडील राजकारण आलें, जे आम्ही सलूक करितों, वाजबी अंमल देतों. ऐसें राजकारण लागलें. इतके यांत राजश्री पंत प्रधान फौजेसहवर्तमान मागाहून मकसुदाबादेनजीक येऊन संदर्भ लाविला आणि सांगोन पाठविलें कीं आपण तुमचे कुमकेस आलों. येविशीं पातशाहीचा हुकूम आपणांस आहे. तुम्ही आम्ही येकत्र होऊन गनिमास मुलकांतून बाहेर काढून देऊं. ऐसा संदर्भ करून मोगलासीं सलूख संपादून मोगल व आपण एकत्र होऊन आम्हांवर चालोन आले. हें वर्तमान सविस्तर आपणास पेसजी लिहून पाठविलें होतें, त्यावरून श्रवण जाहलेंच असेल. त्यानंतर आम्ही फौजेसहवर्तमान रामगड बदामीचे नजीक आलों. राजश्री पंतप्रधान यांणीं मोगलांस मकसुदाबादेस जावयास निरोप देऊन आपण पंचेटचे रोखे गयेचे मार्गे चालिले. त्यास (निजामा) कडील वकील मातबर माणूस राजश्री शेषराव आलाबरदीनखान याजपाशीं आहे, त्याचीं पत्रें आलीं जे मोगलाचे चितात तुम्हासी सलूख करावयाचा आहे, याजकरितां राजश्री

§ कोटा द० १.८

भास्करराम फौज समागमें देऊन माघारे पाठविणें आणि तुम्ही देशास जाणें. असें लिहिलें आलें. त्याजवरून सडी फौज राजश्री भास्करराम याजसमागमें देऊन माघारे रवाना केले आणि आम्ही फौजेसहवर्तमान बुलगेसुधां बेंङ्गचे घाटानजीक आलों. दुसरे दिवशीं कूच करून बारी अडचण याजकरिता आघाडीस होऊन घाट चढोन चार पाच कोस पुढें आलों. बुलग्याची रव कांहीं घाट चढोन आली, कांहीं येत आहे तों अगोधर राजश्री पंतप्रधान यांणीं रात्रीस लांब मजल करून बारी नजीक येऊन बुलगे याचे पछाडीवर घातले. ते समयीं आम्हांकडील लोक बारीमध्यें होते त्यांची यांची कटकट जाहाली. सेदानसें घोडे माणूस जायां केलें. हें वर्तमान आम्हांस पोहोचतांच माघारे फिरोन बारीपर्यंत आलों तों त्यांची व आपले लोकांची झटपट होऊन त्यांस बारीखाले मारून घातलें. तों दिवस थोडका राहिला, तेव्हां माघारे फिरोन लष्कराचा मुकाम होता ते जागा आलों. या प्रकारें त्याणीं ( दंगा ? ) आरंभिला होता हें सविस्तर वर्तमान राजश्री स्वामीचे सेनेसी लिहिलें आहे, त्यावरून कळों येईल. प्रस्तुत आम्ही फौजेसहवर्तमान मजल दरमजल नागपुरास आलों तुम्हांस कळावें याजकरितां लिहिलें असे. रा छ २२ माहे रबिलाकर. बहुतकाय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती. मोर्तबसुद. " §

शाहूमहाराजांच्या चिटणिसी चरित्रांत या प्रकरणाचा संक्षिप्त गोषवारा खालीं दिलेला आहे तो बिनचूक दिसतो.

' रघूजी भोसले यांनीं कटक जगंनाथ घेऊन पुढें हिंदुस्थान अयोध्येपर्यंत स्वारी करितात, खंडण्या घेतात, हें पाहून हिंदुस्थानप्रांत आपणाकडे स्वारीस महाराजांनीं नेमून दिला आहे, म्हणून त्या प्रांतीं पेशवे निघून गेले. भोसल्यांचें म्हणणें कीं ' तुम्हांस जेथपर्यंत साधेल, घ्याल तें तुम्हीं घ्यावें, आम्हांस जेथपर्यंत साधेल तें आम्ही घेऊं.' ऐशीं बोलणीं पडलीं; उभयतांही त्या प्रांतें चालोन गेले. त्यांत कटकट वाढली, लढाई जाली. ते समान होऊन उभयतां सरोन राहिले. आपसांत कलह करणें नीट नव्हे, उभयतांनीं महाराजांस लिहावें, तेथून आज्ञा होईल त्याप्रमाणें चालावें, ऐसें ठरोन पत्रें लिहिलीं. त्यावरून महाराजांनीं लिहिलें जे, तुम्हीं आपणांतच कलह वाढविला ही गोष्ट

§ वाईकर वैद्यसंग्रहांतील हें व दुसरीं अप्रकाशित पत्रें रा. शं. ल. वैद्य यांनीं कृपापूर्वक दिली, त्याबद्दल आभारी आहें. वैद्यांचे पूर्वज बाळंभट व विश्वनाथभट हे बंधु. सातान्यास महाराजांपाशीं होते. दुसरीकडे प्रसिद्ध नसल्यामुळें येथें संपूर्ण पत्र दिलें आहे.

चांगली केली नाहीं. उभयतांही हुजूर यावें. उभयतांचीं बोलणीं ऐकून घेऊन प्रांत व हद्द नेमून देऊं त्याप्रमाणें हद्दीनें खंडण्या घेत जाव्या. यावरून प्रधानपंत निघोन आले.'

रघूजी व पेशवा यांच्या संबंधानें दिल्ली येथें काय प्रकार घडला त्याचें वर्णन महादेव गोविंद हिंगण्यानें पुत्र बापूजीस ता. २७ एप्रिल, स. १७४३ रोजीं लिहिलें त्यांत खालील मजकूर आहे.

'इतके दिवस तों रघोजीच्या भेटीकरितां व गयेहून स्वार जाल्यावर पेशव्यांनीं कितीका शहरों शहरींच्या जागा मारिल्या, व खांडण्या घेतल्या. कितीका भल्या माणसांनीं कबिले मुद्धां जोहार केले. वेगळिया गढींशीं झुंज केलें. यास्तव जनामध्यें विरुद्धताच भासली, सार्वभौमासही लोकांनीं नानाप्रकारें विरुद्धच जाणविलें. इतक्यांत समाचार आला कीं, महाब्रतजंगाशीं व श्रीमंत स्वामींशीं भेटी झाल्या. स्नेह शपथपूर्वक झाला. श्रीमंतांहीं खजिन्याचीही ताकीद केली; व रघूजी भोसल्याचे पारिपत्यासही सिद्धता केली आहे. ऐसें वर्तमान आल्यावर पातशहास व वजिरास कांहींक भरांसा आला आहे कीं, बाळाजीराव एकनिष्ठ आहेत, रघूजीस तंबी करतील. जे कोणी अन्य विचार भासवीत होते, ते फजित पावले. ईश्वरइच्छेनें रघूजीचें पारिपत्य जालें असेल, इतकेंच वर्तमान आलें.'†

ता. १७ जुलै रोजीं खुद्द रघूजीनें कोन्हेररामास लिहिलें, "आम्ही बंगालियाहून नागपुरास आलों. त्यावर तुमचें पत्र व महाराजांची आज्ञा सादर जाली कीं दर्शनास येणें. त्यास भास्कर रामाचा मार्ग लक्षीत होतों. ते फौजे-सहवर्तमान पेशव्याची फौज आली त्याच मार्गें एकदों मजलीचे अंतरें आले. भेटी जाल्या. आतां गुंता नाहीं. अविलंबे स्वामींचे सेवेसीं येऊन पोंचतों"

**७ समेट.**—रघूजीला समजून चुकलें कीं मराठे सरदारांमध्यें पेशवे प्रमुख असून पेशव्यासी विरोध केल्यास आपण एकाकी पडतों, असहाय बनतों, आपणांस दुसऱ्याचा पाठिंबा मिळणें दुरापास्त होऊन आपल्या शत्रूचें फावतें. बंगालमध्यें आपला चढाईचा कार्यक्रम यशस्वी व्हावयाचा असेल तर शत्रूस बाहेरून येणारी कुमक बंद केली पाहिजे हें त्याला पक्कें कळून चुकलें. अलिवर्दीला बादशाकडून काय मदत मिळणार हें दिसतच होतें. येऊन जाऊन आपल्यामधील व पेशव्यामधील जी चुरस आहे तिचा फायदा नबाब घेऊन

† रा. खं. ६ ले. १६९-१ व खं. ३ ले. २१७

आपल्यावर डाव उलटवणार, तर आपणच पेशव्याशीं समेट करून नबाबाच डाव हाणून पाडला पाहिजे, असें त्यानें ठरविलें.

मनांतील तेढ सोडून रघूजी भोसले पेशव्याचें वर्चस्व कबूल करण्यास तयार झाल्यामुळें वादाचा मुख्य मुद्दाच निकालांत निघाला. नानासाहेबही समेटास उत्सुक होताच. मुळांत त्याचा स्वभाव आपल्या बापाप्रमाणें करडा किंवा कठोर नव्हता; आणि त्याचें वयही लहान असल्यामुळें छत्रपतीच्या या जवळच्या नातलगाशीं ज्यास्त विरोध करणें त्यास श्रेयस्कर वाटलें नाहीं. स्वारींतून परत साताऱ्यास आल्यावर दोघेही आपापसांतील वैरभाव विसरण्यास तयार असल्यामुळें मध्यस्थांमार्फत समेटाचें बोलणें सुरू झालें. लवकरच बातमी पसरली कीं, 'रघूजीचा व श्रीमंतांचा सलूख पटण्याच्या सरदेशमुखीचा जाहला. अतःपर नबाबांहीं ( सफदरजंगानें ) महाबतजंगास म्हणजे अलिवर्दीस लिहून सलूख रघूजीचा करवावा; श्रीमंतास ( पेशव्यास ) बंगाल्याची जरूर नाहीं, प्रयागचा हासील महसूल जो येईल तो पेशव्यास द्यावा.'

साताऱ्यास स्वारीचे सर्व तपशील आगाऊच कळले होते. मुख्य मुद्दा पेशवा व रघूजी यांनीं मान्य करतांच तडजोड बनण्यास विलंब लागला नाहीं. महाराजांनी दोघांस जवळ बोलावून समेट करून दिला आणि दोघांचीं कार्यक्षेत्रें आखून दिलीं. वऱ्हाडपासून कटक प्रांतापर्यंतचा सर्व मुलूख व बंगाल, बिहार व लखनौ एवढ्या भागांत पेशव्यानें ढवळाढवळ करूं नये व अजमीर, आग्रा, प्रयाग व माळवा हे प्रांत पेशव्याचे म्हणून ठरवून दिले, (ता. ३१ ऑगस्ट, १७४३). याप्रमाणें रघूजीनें बंगाल्यांतील आपल्या चढाईस पेशव्याची संमति मिळविली आणि पुढील आठ वर्षांत अलिवर्दीखानाशीं निकरानें युद्ध चालवून बंगालवर आपले हक्क लागू केले.

चिटणीस सांगतो, " उभयतांचें सख्य करून मेजवान्या करविल्या. विकल्प ठेवूं नये असे पायांवर हात ठेवून घेतले. उभयतांनीं सरकारांत मेजवान्या केल्या. ठरावाचे ऐवज दिले. महाराजांनीं उभयतांस मेजवानी बहुमान देऊन निरोप दिला." † समेटाची जास्त स्पष्टता पुढील प्रकरणांत येईल.

**८ अमानुष अत्याचार.**—वरप्रमाणें स. १७४३ च्या दसऱ्यापूर्वी शाहूनें पेशवा व सेनासाहेब सुभा यांची दिलजमाई करून दिल्यावर पूर्वेकडील बंगालच्या क्षेत्रांत पेशव्यानें लक्ष घातलें नाहीं. तो कार्यभाग रघूजीनें स्वतंत्रपणें

† ऐ. प. ३५.

सांभाळिला. लगेच तो नागपुरास गेला आणि पूर्वीचा अपूर्ण कार्यभाग पुरा करण्यासाठीं भास्कररामाची सिद्धता करून दिली. पंतानें बंगाल्यांतून पुष्कळ लूट आणिली असून खटवा येथील दंग्याचा वचपा भरून काढण्याची त्यास उत्कंठा लागली होती. स. १७४४ च्या आरंभीं पंतानें नागपुराहून प्रयाण केलें. बरोबर भरपूर सामान व निवडक सरदार रघूजीनें दिले.

प्रचंड तयारीनें भास्करपंडित पुनः चालून येतो ही खबर अलिवर्दीखानास पोंचतांच तो अत्यंत हताश झाला. अगोदरच तो वृद्ध, प्रकृतीनें क्षीण व अंतर्बाह्य शत्रूंनीं ग्रासलेला असल्यामुळें आतां मराठ्यांचा प्रतिकार कसा करावा याची त्यास मोठी चिंता लागली. नबाबगिरीचा अभिलाष धरल्यापासून गेल्या चार पांच वर्षांत बंडें, लढाया, काकुळती इत्यादींनीं त्रस्त होऊन त्यास जिणें दुःसह झालें. मराठ्यांनीं तर त्यास पुरतेंच भंडावून सोडलें. मीर हबीब हात धुऊन त्याच्या पाठीस लागला. भास्कररामानें त्यास सांगून पाठविलें, आमची चौथाई बऱ्या बोलानें पदरांत टाका, नाहीं तर जबरदस्तीचे इलाज करावे लागतील.

अशा गोंधळलेल्या मनःस्थितींत नबाबाला एकच भीषण उपाय सुचला, कीं कपटविद्येनें पंतास नाहींसें करावें. त्यासंबंधानें आपल्या सुपीक बुद्धींतून एक गुप्त योजना त्यानें मनांत ठरविली कीं मोगली कावा करून पंताचा नाश करावा; खटपट करून त्यास व त्याच्या साथीदारांस आपल्या छावणींत भेटीस आणून त्यांस दगा करावा. नबाबाचे पदरीं अफगाण सरदार मुस्ताफाखान व मुख्य कारभारी जानकीराम हे दोन प्रमुख गृहस्थ मराठ्यांचे द्वेषी होते. त्यांच्याशीं एकान्तांत वाटाघाट करून प्रथम त्यांस या कटांत सामील केलें आणि मग जो व्यूह करावयाचा त्याचे तपशील त्यांच्या विचारानें ठरविले. हे गृहस्थ त्यास आरंभीं अनुकूल होईनात, म्हणून त्यांस बक्षिसें देण्याचें कबूल करून आणा-शपथांनीं त्यांस वश करून घेतलें. मुस्ताफाखानास त्यानें पाटणाच्या सुभेदारीवर नेमण्याची शपथक्रिया करून दिली. अशा रीतीनें सर्व सिद्धता झाली.

भास्करपंताची छावणी खटवा येथें व तेथून उत्तरेस वीस एक मैलांवर अमानीगंज येथें नबाबाची छावणी झाली. अगोदरपासूनच मुस्ताफाखानानें आपलीं माणसें पंताचे भेटीस पाठवून त्यास कळविलें, 'आपल्याशीं लढण्याची आमची ताकद नाहीं व इच्छाही नाहीं; नबाबांची आपली भेट सन्मानपूर्वक घ्हावी, समक्ष बोलणीं होऊन तह ठरावा, तदनुसार चौथाईची रक्कम देण्यांत

येईल.' युद्धसंग्रामावांचून अनायासें आपला कार्यभाग सिद्धीस जातो हें पाहून पंतानें भेटीच्या योजनेस आनंदानें कबुली दिली. यांत कांहीं कपट असेल असा यत्किंचित् संशय त्यास किंवा त्याच्या अनेक साथीदारांस आला नाहीं हें आश्चर्य होय. नबाबाच्या छावणींत भेटीस जाण्याचें पंतानें निष्कपटपणें मान्य केलें. अशा प्रसंगास सामान्य सावधगिरी ठेवणें जरूर असतें तितकेंही त्यानें केलें नाहीं. गाफीलपणानें तो नबाबाच्या भीषण जाळ्यांत सांपडला.

मुस्ताफाखान व जानकीराम यांनीं आगाऊ सर्व तपशील पंताच्या वकिलांशीं बोलून मुक्रर केले. भेट कोठें केव्हां व्हायची, कोणी किती सामोरे जायचें, नजराणे पोषाख केव्हां काय द्यायचे असे सर्व प्रकार,कपटाचा सुगावा यत्किंचित् बाहेर लागूं न देतां या दोघांनीं बेमालूम सिद्ध केले. कुराण, गंगाजल इत्यादिकांच्या पवित्र शपथा उभयतांनीं भरपूर दिल्या. या शपथांवर विश्वास बिलकुल ठेवूं नका असें मीर हबीब भास्करपंतास सांगत असतां पंतानें तें मानलें नाहीं. त्यास एवढी भुरळ पडली कीं त्यानें बिनदिक्कत सर्व गोष्टी विश्वासानें कबूल केल्या. खटवा व अमानीगंज यांचे दरम्यान गंगेच्या कांठीं 'मनकारा'च्या मैदानांत भव्य तंबू उभारून भेटीची जागा शृंगारून सज्ज करण्यांत आली. सभोंवार उंच कनाती उभ्या करून मोठें आवार बनविलें. चैत्र व. १३ शके १६६६ शुक्रवार छ २६ सफर ता. ३० मार्च, स. १७४४ चा दिवस मुक्रर होऊन नबाब अलिवर्दीखान आपल्या विश्वस्तांसह भेटीच्या जागीं येऊन बसला. तंबूला सभोंवार खांब व दरवाजे होते त्यांस लागून पन्नास सशस्त्र सैनिक पहारेकरी म्हणून उभे करण्यांत आले, त्यांनीं इशारत मिळतांच एकदम मराठ्यांची कापाकापी सुरू करावी अशी सूचना त्यांस थोडी अगोदर देण्यांत आली. पन्नास-पाऊणशें माणसांना कळलेला हा प्रकार शेवटपर्यंत इतका गुप्त राहिला हेंच आश्चर्य होय. अफझलखान–शिवाजी यांच्या भेटीचा प्रसंग यापुढें अगदीं क्षुल्लक म्हटला पाहिजे.

ठरलेल्या वेळीं भास्करपंत पालखींत बसून भेटीच्या जागीं आला. खालीं उतरतांच मुस्ताफाखान व जानकीराम या दोघांनीं पुढें येऊन पंताचे हात आपल्या हातांत धरून स्वागताचीं बोलणीं बोलत त्यास आंत नबाबाचे भेटीस नेलें. नबाबानें उभें राहून विचारलें, "शूर वीर भास्करपंत ते कोणते?" त्यावरून पंताची नबाबाशीं ओळख करून देण्यांत आली. पंत कोणता याची खात्री पटतांच नबाब एकदम मोठ्यानें ओरडला, "या सर्व लुटारूंना कापून काढा."

पुढें प्रसिद्धीस आलेले मीर जाफरखान व मीर कासीमखान वगैरेंनीं या कत्तलींत प्रमुख भाग घेतला. नबाबाचे शब्द ऐकतांच कनातीच्या आंत लपून बसलेले सैनिक आपापल्या जागांवरून धावून मराठ्यांवर तुटून पडले. मराठ्यांजवळ हत्यारें होतीं पण असा कांहीं विपरीत प्रकार होईल याची कल्पना नसल्यानें कोणी सावध नव्हते. मीर कासीमनें भास्करपंतास जागच्याजागीं तोडून काढिलें. तोच प्रकार अल्पावकाशांत इतरांनीं केला. पंताबरोबर आणखी एकवीस सरदार होते त्यांनीं आपल्याकडून मुसलमानांची कापाकापी केली. तंबू सर्व प्रेतांच्या ढिगांनीं व रक्ताच्या चिखलानें भरून गेला. अलिवर्दीखान हा प्रकार आपल्या मुख्य आसनावरून निमूटपणें पाहत होता. मुसलमानांनीं कनातीच्या दोऱ्या कापून बाहेरचा प्रवेश बंद केला आणि त्यांची संख्या मोठी असल्यामुळें आंत आलेले बावीस मराठे गृहस्थ सर्व कापले गेले. त्यांची नांवनिशी दिलेली आहे ती पाहतां त्यांत २० हिंदु व २ मुसलमान दिसतात. हिंदूंपैकीं तीन ब्राह्मण व बाकीचे मराठे होते.

रघूजी गायकवाड म्हणून भोसल्यांचा सरदार मागें तळावर होता, भेटीच्या प्रसंगास गेला नाहीं, तो मात्र वांचला. त्यानें बातमी कळतांच मोठें प्रसंगावधान संभाळून छावणींतील सामान व लोक सर्व बाहेर काढून दिले; आणि पाठलागास आलेल्या नबाबाच्या सैनिकांस चुकवीत तो तावडतोब नागपुरास येऊन दाखल झाला.

याप्रमाणें मराठ्यांना बंगाल्यांतून हाकून दिल्याबद्दल जयघोषपूर्वक मुर्शिदाबादेस जाऊन नबाबानें आनंदोत्सव केला; पण त्यांतच पुढील सूडाचें बीजारोपण त्यानें करून ठेविलें. महाराष्ट्रांत हीं वर्तमानें येऊन हाहाकार उडाला आणि या कृत्याचा पूर्ण वचपा घेण्याची उत्कंठा सर्वत्र निर्माण झाली. मुख्यतः रघूजी, त्याचे पुत्र व सैनिक आणि कोन्हेररामाचे पुत्र व पंताचे आप्त हे सर्व संतप्त होऊन पुढील उद्योगास लागले.

**९ सेवेची कदर.**—‘भास्करपंतास अलीवर्दीनें दगा देऊन ठार मारिलें, तेव्हां त्याची स्त्री ताईबाई गर्भिणी होती. तिजला धरावें तों ईश्वरकृपेनें एका पठाणाचे बायकोनें बाईला डोली देऊन कोणास न समजतां काशीस रवाना केलें. तेथें पोंचल्यावर तीस पुत्र झाला, म्हणून नांव काशीराव भास्कर ठेविलें. भास्करपंताचे मृत्यूचें वर्तमान रघूजी बाबांस कळतांच बंधु कोन्हेरपंत यांस जाऊन मजकूर निवेदन केला. रोज दर्शनास जात. बंधूचे दुःखांत कोन्हेरपंत

मग्न, हें मुधोजी बाबांनीं जाणून दरसाल पंचवीस हजार रुपयांची सनद वंशपरंपरेची, शिवाय स्वारी शिकारी लग्नकार्य वगैरेचे खर्चास सरकारांतून मदत देणेची, शपथपूर्वक करून दिली. याशिवाय कर्नाटकांतील भोसल्यांच्या सुभ्याबद्दल कोन्हेरपंतास दहा लक्षांचें उत्पन्न अर्काटचे नबाबानें सेप्टेंबर, ता. ३ स. १७४८ चें करार करून दिलें, यावरून कोन्हेरपंताची प्रतिष्ठा दिसून येते. भास्करपंताची स्त्री ताईबाई, तिचे नांवें वऱ्हाडांतील बंदोबस्त सुभा बाईचे नांवानें बाबासाहेबांनीं करून वहिवाटीस कोन्हेररामाचे विद्यमानें कृष्णाजी गोविंद मुक्रर करून ठेविले. कोन्हेररामनीं शोकाक्रांत फार होऊन देशीं जाण्याची आज्ञा मागितली. बाबासाहेबीं बहुतांप्रकारें समाधान करून पाहिलें, परंतु उदासीनता दूर होईना, हें पाहून त्यांचे विनंतीवरून देशीं जाण्याची आज्ञा देऊन रवाना केलें. नंतर बाबासाहेबांनीं कोन्हेरपंताचे सहा पुत्र, त्यांत चवघांचे नांवें पत्र पाठवून बोलावून घेऊन बहुतशी खात्री करून चवघांचे नांवें सनद करून दिली; आणि बाबूराव कोन्हेर यांजला कुल दौलतीचा कारभार देऊन संनिध ठेविलें.'

बाबासाहेबांची मर्जी पंतावर बहुत संतोषभरित असे ही गोष्ट खालील रघूजीच्या स्वदस्तुरचे पत्रावरून व्यक्त होतेः 'आमचाही वृद्धापकाळ व तुमचाही वृद्धापकाळ ऐशा प्रसंगामधीं तुम्ही व आम्ही विभक्त असावें, हें विश्वरास मानत नाहीं. याउपर कित्येक गोष्टी तुम्हांस व आम्हांस सांगितल्या त्या उभयतांनीं चित्तांत आणाव्या. पूर्ववत्प्रमाणें एकचित्त असलियाणें सर्व उत्तम आहे. ऐसें चित्तात असून, हें पत्र लक्ष पत्रांचे जागां म्हणून तुम्हीं चिरंजीव बाबूरायांस घेऊन यावें. इकडील सर्वार्थ विसोबा सांगतां कळूं येईल. तुम्ही यावयास अनमान कराल तर तुम्हाला आमच्या गळ्याची आन असे' (ता. ३० सेप्टेंबर, स. १७५२). या पत्रावरून भोसले व कोल्हटकर या दोन कुटुंबांचा किती एकजीव होता, आणि हिंदुस्थानच्या ईशान्य बाजूकडील मराठशाहीची ही प्रचंड दौलत उभारण्यांत या दोन कुटुंबांचे श्रम कसे कारण झाले, ह्याची कल्पना होते. राजकारण व युद्धप्रसंग अंगावर घेतल्यानें प्रसंगीं पराक्रमी पुरुषांस जिवानिशीं जावें लागतें, याचा प्रत्यय भास्करपंताच्या मृत्यूनें आला. दौलत म्हणजे माणसें, तीं किती जपून सांभाळावीं लागतात हें वरील रघूजीच्या वागणुकींत दिसून येतें.‡

‡ रा. खं. ३ ले. ५५५ व १८४

**१० बंगाल मराठ्यांचा झाला.**—भास्कररामाची हकीकत कळून पुनः तयारी करण्यांत स. १७४४ साल संपलें. लोक, माणसें, पैसा, सरदार, सामान इत्यादींचा भरपूर पुरवठा असल्याशिवाय शत्रूचा नाश होणार नाहीं याची जाणीव रघूजीस भरपूर होती. नुसत्या संतापाच्या भरांत उतावळेपणाचें धाडस त्यानें केलें नाहीं. स. १७४५ च्या आरंभीं सर्व सिद्धता झाली आणि माघ मासांत त्यानें नागपुर सोडलें. मीर हबीबचें साह्य त्यास होतेंच. शिवाय अलिवर्दीखानाचा मुख्य लष्करी सरदार मुस्ताफाखान यास कबूल केलेली बिहारची सुभेगिरी मिळाली नाहीं त्यामुळें तो अलिवर्दीखानावर उठला आणि त्यानें रघूजीस पत्रें पाठवून त्याचें साह्य निकडीनें मागविलें. हा प्रकार रघूजीच्या चांगला पथ्यावर पडला. मीर जाफर देखील सुभेदारावर उठला, तेणें करून बंगाल्यांत पुनः सर्व अस्वस्थता माजली. जातांक्षणीं रघूजीनें कटकचा किल्ला काबीज केला त्याची हकीकत त्यानेंच लिहून कळविली ती अशीः—"आम्ही वराडप्रांतीं फौजेचा गाहा करून मजल दरमजल बंगालेयासीं चालिलों. फाल्गुनमासापासून झाडीचे मुलखांत दाणापाण्याचें अनुकूल पाहोन फाल्गुन व० १२ स कटकावर येऊन दाखल झालों. लगेच मोर्चे बंदी केली. दोन मासपर्यंत किल्ला भांडला. स्वामींच्या पुण्यप्रतापें छ १४ रबिलाकरीं (६ मे, १७४५) फत्ते जाला. टाणें बसवून मजल दरमजल मकसुदाबादेस जात असों. अलाबिरदीचा दिवाण जानकीराम याचा पुत्र दुर्लभराम सांपडला आहे." § दुर्लभरामास रघूजीनें नागपुरास आणून बंदींत ठेविलें. नंतर तीन लाख रुपये दंड देऊन स. १७४७ च्या जानेवारींत तो सुटून परत गेला.

मुस्ताफाखानाच्या मदतीसाठीं रघूजी बिहारकडे चालून गेला आणि मुंडकटाईबद्दल त्यानें तीन कोटींची मागणी अलिवर्दीखानाकडे केली. अलिवर्दीखानाचें व मुस्ताफाचें युद्ध निकरावर आलें. स. १७४५ च्या जून महिन्यांत आरानजीक जगदीशपुर येथें लढाई होऊन मुस्ताफाखान मारला गेला, त्यामुळें अलिवर्दीखानाचा एक शत्रु कमी झाला. रघूजीनें पावसाळ्याची छावणी जुलैंत बीरभूम येथें केली. पावसाळा संपल्यावर धावपळीचें युद्ध चालू झालें. रघूजीनें मुर्शिदाबादेवर चाल केली. जवळ येतांच ता. २१ डिसेंबर, स. १७४५ रोजीं अलिवर्दीखानाकडून त्याचा पराभव होऊन रघूजी त्वरेनें परत नागपुरास आला. मागें मीर हबीबचे मदतीस त्यानें आपले तीन हजार

§ अप्र० वैद्य संग्रह.

लोक ठेवून दिले. " रघूजी भोसले खराब होऊन नागपुरास आले. कर्जदार, वोढ जाली. त्यांस आणावयास राजश्री स्वामींनीं विश्वनाथ वैद्य पाठविले आहेत. बहुतकरून राजदर्शनास येतील."† असें पेशवा लिहितो.

ओरिसा प्रांत मराठ्यांनीं जिंकून त्याजवर मीर हबीबची स्थापना केली, त्यामुळें शेजारीं कायम शत्रु उभा होऊन नबाबाची हीनावस्था होत चालली. दरम्यान त्याजकडे पटण्याची चौथाई मागण्यास पेशव्याचे वकील आले. " पातशहांनीं फर्मान नबाबास पाठविला कीं चौथाईचा मामला श्रीमंतांस करार केला आहे. श्रीमंतांकडे खलिते पाठविले आहेत. आतां पटणा बंगाला त्यांचेकडे आहे. " येणें करून नबाबास पूर्वी रघूजीचा एक शह होता, त्यास आतां आणखी पेशव्याचा उत्पन्न झाला.§ मीर हबीबनें रघूजीकडे फौजेची मागणी निकडीनें केली, पण पैशाच्या अडचणीमुळें त्यास स. १७४६ त फौज पाठवितां आली नाहीं. त्या सालअखेर रघूजीनें पुत्र जानोजीस नागपुराहून रवाना केलें. तो स. १७४७ च्या जानेवारींत कटक येथें पोंचला. जानोजी व मीर हबीब यांनीं फेब्रुवारी महिन्यांत बरद्वानजवळ नबाबाच्या सैन्याचा पराभव केला. पण लगेच पुढील महिन्यांत नबाबानें जानोजीचा पराभव केल्यामुळें तो परत ओरिसांत येऊन छावणीस राहिला.

अशा रीतीनें उभयपक्षांचा लढा लांबत गेला आणि कोणा एका पक्षास निकाली विजय मिळेना. त्यांतल्या त्यांत नबाबाची हीनदशा वाढत गेली. त्यास ठार मारण्याचा गुप्त कट मीर जाफर वगैरेंनीं केला, तो सिद्धीस गेला नाहीं. घरांतलीं भांडणें, अंमलदार सर्व नाराज व रयत दुःखी, अशा रीतीनें गांजलेलें त्याचें वार्धक्य संकटमय बनलें. इकडे रघूजीलाही स्वस्थता मिळाली नाहीं. स. १७४७ त शाहूनें त्यास भेटीस बोलाविलें.¶ निजामुल्मुल्क व पेशवा यांचा शह त्यास होताच. जानोजी बंगालस्वारीवर होता, त्याची मातुःश्री वारल्यामुळें तो परत नागपुरास आला, तेव्हां तिसरा पुत्र साबाजी यास रघूजीनें बंगाल्यांत पाठविलें. साबाजी व मीर हबीब यांनीं एक विचारानें वागून नबाबाचा पिच्छा पुरविला. अशाखालीं दोन तीन वर्षे गेलीं. पुढें अलिवर्दीखानाची बेगम होती, तिनें मराठ्यांशीं तह करून युद्ध मिटविण्याची शिकस्त नवऱ्याकडे चालविली, तेव्हां नबाबानें मीर जाफर यास

† पे. द. २०.२६ § पे. द. २०.२९,४९. ¶ पे. द. २०. ४८.

आज्ञा केली कीं मीर हबीब व. जानोजी भोसले यांस भेटून तह ठरवावा. तदनुसार भेटी व वाटाघाटी होऊन स. १७५१ च्या मार्चात तह कायम झाला. तो नागपुरास रघूजीनें पुढील जून महिन्यांत मंजूर करून दिला. त्याचीं कलमें—

१ मीर हबीबनें नबाबाचा नायब म्हणून ओरिसाचा कारभार करावा आणि उत्पन्न येईल तें भोसल्यास द्यावें.

२ बंगाल व बिहार या दोन प्रांतांच्या चौथाईबद्दल दरसाल बारा लाख नबाबानें अविच्छिन्न भोसल्यांस पोंचवावे.

३ मराठ्यांनीं बंगाल प्रांतावर पुनः स्वाऱ्या करूं नयेत.

४ कटक प्रांत म्हणजे सुवर्णरेखा नदीपर्यंतचा प्रदेश मराठ्यांचा समजावा.

मागील बाकीचे बत्तीस लक्ष रुपये नबाबानें मराठ्यांस दिले. हा तह जानोजीनें घडवून आणिला आणि मराठ्यांच्या फौजा परत आल्या. कटक प्रांताच्या कारभारावर जानोजीनें शिवभट साठे याची नेमणूक केली, त्यानें आपलें काम दक्षतेनें केलें.† या तहानें अलिवर्दीखानास शांति मिळून त्याच्या पाठीमागची दगदग संपली. पुढें तो स. १७५६ त ता. १० एप्रिल रोजीं मरण पावला. मीर हबीब मात्र एवढ्या हट्टानें मिळविलेलें काम भोगण्यास फार दिवस वांचला नाहीं. स. १७५२ त जानोजी कटक प्रांतांत गेला असतां देण्याघेण्यावरून मराठे चौकीदारांचा व त्याचा तंटा होऊन ता. २४ ऑगस्ट, स. १७५२ रोजीं तो मारला गेला. जानोजीनेंच त्याचा शिरच्छेद करविला अशीही हकीकत सांपडते.

मिळून बंगाल प्रांतावर मराठ्यांचा शह बसण्यास दहा वर्षें लागलीं. मुंडकटाईबद्दल त्यांस कांहीं मिळालें नाहीं. मीर हबीबसारख्या अनुभवी व कर्तृत्ववान् गृहस्थाशीं अलिवर्दीनें वैर बांधलें त्यामुळें त्याचा नाश होऊन मराठ्यांचा शह त्या प्रांतावर बसला. एकंदरींत संकटांनीं हताश न होतां रघूजीनें चिकाटी दाखविली ती प्रशंसनीय मानली पाहिजे.

† रा. खं. ३ ले. ४३३–४५०

# ४

# उत्तर-दक्षिण व्यवधानें

## का ल सू ची

| | | | |
|---|---|---|---|
| १७३६ | | | भोपाळकर दोस्त महंमदखान मृ०, यार महंमद दाखल. |
| १७३८ | | | छत्रसाल पुत्र हिरदेसाचा मृ० |
| १७४२ | जाने. | १२ | संभाजी आंगरे सरखेल मृ० |
| ,, | ,, | १९ | गोपिकाबाई खानदेशांतून परत. |
| ,, | एप्रिल | २० | मानाजी आंगरे याची साताऱ्यास शाहूशीं भेट. |
| ,, | मे | २८ | काशीबाई रामेश्वरयात्रेहून परत, नंतर काशीयात्रेस गेली. |
| ,, | नोव्हें. | | ओर्छेकर वीरसिंह देवाचा बंडावा; जोतिबा शिंदे व इतर मराठे ठार. |
| ,, | डिसें. | | नारोशंकरानें ओर्छाचा सूड घेतला; झाशीची स्थापना. |
| ,, | ,, | २६ | सुवर्णनदीचें पेशव्याचें प्रसिद्ध पत्र बुंदेलखंडांतून. |
| १७४३ | जाने. | | तुळाजी आंगऱ्यास सरखेली झाली. |
| ,, | मे १३–जून ३० | | शाहूची प्रकृति चिंताजनक. |
| ,, | जुलै | ३० | पेशवा स्वारींतून परत. |
| ,, | ऑगस्ट | | पेशवा व राणी सगुणाबाई यांची गोडी. |
| ,, | सेप्टेंबर | २७ | सवाई जयसिंग मृ० |
| ,, | ऑक्टो. | | पेशवा व रघूजी यांचा समेट साताऱ्यास. |
| १७४३–१७४६ | | | अर्जुनसिंग धंधेरे याचें पुण्यास वास्तव्य, पेशव्याचें साह्य मागण्यासाठीं. |
| १७४४ | जाने. | १६ | पेशव्यानें छत्रपतीस हातेबंदी करार करून दिला. |
| ,, | फेब्रु. | १ | महादेवभट हिंगणे याचा खून दिल्लीस. |
| ,, | मार्च | ३१ | भास्करराम कोल्हटकराचा व २१ सरदारांचा बंगाल्यांत खून. |
| ,, | जून | ११ | खुबसुरत हिंदु कुमारिकांची पेशव्याची मागणी. |
| ,, | नोव्हें. | २० | पेशवा भेलशाचे स्वारीस निघाला. |
| १७४५ | जाने. | २३ | तुळाजीनें गोवळकोट व अंजनवेल काबीज केलीं. |

| | | | |
|---|---|---|---|
| १७४५ | मार्च | २ | भोपाळकरानें मराठ्यांस खंडणी देण्याचा करार केला. |
| ,, | ,, | ११ | भोपाळकराचें ठाणें भेलसा राणोजीनें काबीज केलें. |
| ,, | जुलै | ३ | राणोजी सिंदे मृ० |
| ,, | ऑगस्ट | १ | पेशवा भेलसा स्वारींतून परत. |
| १७४५-१७४६ | | | दतिया, चंदेरी, कालिंजर, चुरखी वगैरे बुंदेल्यांचीं ठाणीं मराठ्यांनीं काबीज केलीं. |
| १७४६ | मे | | जैतपुर सिंदेहोळकरांनीं काबीज केलें. |
| ,, | ऑक्टो. | २८ | अर्जुनसिंगाची स्थापना करण्याचा पेशव्याचा करार. |
| ११ | डिसें. | २५ | अमीरखानाचा खून. |
| १७४७ | जाने. | २४ | अंत्रीचें ठाणें काबीज. |
| ,, | ,, | | जयाप्पा व रामचंद्रबावा यांची समजूत. |
| ,, | मार्च | | काशीबाई उत्तर यात्रेहून परत. |
| ,, | मे | ३ | साताऱ्यास शाहूनें तुळाजीचा गौरव केला. |
| ,, | ,, | २८ | मानाजीचा माणिकगड किल्ला पेशव्यानें काबीज केला. |
| ,, | डिसें. | १० | पेशवा नेवाईचे स्वारीस निघाला. |
| ,, | ,, | ,, | पेशव्याचा मुडागड किल्ला तुळाजीनें काबीज केला. |
| १७४८ | जाने. | १५ | चेऊलचा राजकोट पेशव्यानें काबीज केला. |
| ,, | फेब्रु.-मार्च | | मुडागडावर प्रतिनिधि वगैरेंचें तुळाजीशीं युद्ध. |
| ,, | फेब्रु. | | पेशवा व बादशहा यांची भेट दिल्लीस. |
| ,, | मार्च | ३ | सरहिंद येथें अब्दालीचा शहाजाद्याकडून पराभव. |
| ,, | मार्च | १९ | तुळाजी आंगरे व शाहू यांची भेट साताऱ्यास. |
| ,, | एप्रिल | १ | मुडागडावर तुळाजीचा पराभव करून किल्ला नारो रायाजी ठाकूर यानें काबीज केला. |
| ,, | ,, | १४ | बादशहा महंमदशहाचा मृत्यु. |
| ,, | ,, | ३० | माधोसिंग व पेशवा यांची भेट नेवाई येथें. |
| ,, | जुलै | ९ | नेवाई स्वारींतून पेशवा परत. |
| ,, | ऑगस्ट | १० | होळकरानें ईश्वरसिंगाचा पराभव केला. |
| ,, | जुलै | २४ | पेशव्यानें मानाजीस माणिकगड परत दिला. |
| १७५३ | | | भोपाळकर यारमहंमदखान मृ., फैजमहंमद दाखल. |
| ,, | ऑक्टो. | १८ | काशीताईचा मृ० |
| १७५८ | | | जगत् राज बुंदेला मृ० |

# ४

# उत्तर--दक्षिण व्यवधानें

१ ओर्छेकराचा दगा, झाशीची स्थापना २ पेशव्याचें अपूर्व यश
३ भेलसा काबीज ४ बुंदेल्यांशीं प्रखर संग्राम
५ महादेवभट व राणोजी, मृत्यु ६ नेवाईची स्वारी
७ महाराष्ट्रीय जीवनावर परिणाम ८ मातुःश्रीची काशीयात्रा
९ आंग्रेबंधूंचा विकोप

**१ ओर्छेकराचा दगा, झाशीची स्थापना.**—बुंदेलखंडांत मराठी सत्तेचा पाया भरभक्कम करणें हें नानासाहेबाचें उद्दिष्ट होतें. मराठशाहीचा फैलाव उत्तरहिंदच्या भागांत करण्याचा उद्योग शाहूच्या आज्ञेनें बाजीरावानें स्वीकारला, त्यांत प्रथम माळव्यांत त्यानें सिंदे-होळकर-पवारांची स्थापना केली. पुढें छत्रसालाच्या मार्फत त्याचा पहिला प्रवेश बुंदेलखंडांत झाला. मराठ्यांची सत्ता सार्वभौम बनवायची तर चहूंकडे शह ठेवण्यासाठीं माळव्यापेक्षांही बुंदेलखंडचा पाया मराठ्यांस विशेष सोयीचा होता. तेथून पश्चिमेस राजपुताना, दिल्ली, उत्तरेस दुआब, प्रयाग, अयोध्या व पूर्वेस काशी, पटणा, बंगालपावेतोंचा प्रदेश, इतक्या टापूवर नजर ठेवण्यास बुंदेलखंडाइतका दुसरा सोयीचा आश्रय मराठ्यांस नव्हता. तेथून जरूर त्या ठिकाणीं लष्करी मदत लगोलग पोंचविणें सुलभ होतें. हाच विचार सर्वांनीं ठरवून स. १७४२ च्या स्वारींत खुद्द पेशव्यानें आपला मुक्काम बुंदेलखंडांत ठेविला आणि तेथें आपली सत्ता मजबूद करण्याची पहिली मूर्त योजना ठरविली. यापूर्वीच्या अशा प्रयत्नांस संघटित स्वरूप आलें नव्हतें. बुंदेलखंडाचा मध्यबिंदु झाशी, ओर्छा हीं स्थलें होत. ओर्छा हें स्थल झाशीच्या पूर्वेस सहा मैलांवर बांदा रेल्वेवर स्टेशन आहे. त्याच्या नैर्ऋत्येस तीस मैलांवर चंदेरी, उत्तरेस पन्नास मैलांवर ग्वाल्हेर, पूर्वेस साठ मैलांवर जैतपुर व जवळच कालिंजर अशीं तत्कालीन नाक्याचीं ठिकाणें असून तीं मराठ्यांनीं यथावकाश कबजांत आणिलीं. बुंदेलखंडांत उतरण्यास उज्जेन-सिरोंज-भेलसा हा मार्ग किंवा आग्नेयीकडून गढामंडळा-वरचा नर्मदोगमाचा मार्ग. हे मार्ग यापूर्वीच पेशव्यांनीं कबजांत घेतले होते. ओर्छावरून चहूंकडे दृष्टिक्षेप कसा करावयाचा त्याचा प्रत्यक्ष प्रयोग खुद्द पेशव्यानें आपल्या दीड वर्षाच्या या स्वारींत स्वतः हिंडून दाखविला.

छत्रसाल व त्याचे पुत्र यांनीं जरी असहाय स्थितींत मराठ्यांचा आश्रय केला, तरी आणखी अनेक लहान मोठे बुंदेले राजे ठिकठिकाणीं नांदत होते, त्यांस मराठ्यांचा अंमल नको होता. छत्रसालाच्या वेळेपासून या बुंदेले राजांवर चौथाई लागू करून त्यांस आपल्या सत्तेखालीं आणण्याचा मराठ्यांचा प्रयत्न सारखा चालू झाला. या कामीं गोविंदपंत खेर याची नेमणूक बाजीरावानें केली. त्यानें सागर येथें वास्तव्य करून लष्करी जोरावर सालोसाल चौथाईची खंडणी वसूल करण्याचा प्रघात घातला. ही खंडणी वसूल करण्यास मराठ्यांचे दुसरेही सरदार सवडीप्रमाणें येत. ओर्छा येथें वीरसिंहदेव नांवाचा बुंदेला राजा राज्य करीत होता. पश्चिमेस सहा मैलांवर डोंगर असून त्यास लागून बळवंत नगर नांवाचें लहानसें गांव होतें. ती जागा सोयीची पाहून वीरसिंहदेवानें त्या डोंगरावर किल्ला बांधिला, तोच पुढें झांशीचा किल्ला म्हणून प्रसिद्धीस आला.

स. १७४२ च्या पावसाळ्यांत पेशव्याचा मुक्काम ओर्छाजवळ झाला. राजा वीरसिंहदेवाकडून खंडणी यावयाची होती ती वसूल करण्यास पेशव्यानें राणोजी सिंद्याचा पुत्र ज्योतिबा व त्याचा हिशेबनीस मल्हार कृष्ण क्षीरसागर यांस रवाना केलें. " त्यांनीं झाशीस मुक्काम केला. रात्रौ ओर्छेकरांनीं एकदम छापा घालून त्या उभयतांचीं डोचकीं कापून नेलीं. याप्रमाणें ओर्छेकरानें मल्हार कृष्णास व जोतिबास दगा करून मारलें. शिवाय महादेव कृष्ण व अंताजी कृष्ण वगैरे दहा पांच ब्राह्मण व शें-सवाशें माणूस पोरगे च्याकर नफर कुल कापून काढिले. घोडीं मालमत्ता लुटली. झाशीस वेढा घातला आहे. पर्वतावर धोंडो दत्ताजी आहे. मल्हार पंताचा पुत्र व जावई दोघे ओर्छांत होते त्यांसही जिवें मारिलें. मोठा घात जाहला. कोणाही राजानें असा घात श्रीमंतांचे लोकांशीं केला नव्हता. पारिपत्य करणार श्रीमंत आहेत. "

" नंतर श्रीमंतांकडून नारोशंकर राजे बहादूर यांची रवानगी फौजे सुद्धां झाली. ते ओर्छावर चालून गेले. त्यांनीं राजास कैद करून ओर्छांत गाढवाचा हल फिरवून खोदून टाकिलें. ओर्छा उजाड जालें. राजास शृंखळाबंधन करून किल्ल्याच्या बुरुजावर कैद करून ठेविलें. सर्वत्र श्रीमंतांचा अंमल झाला; बदअंमली राहिली. नंतर राजाशीं एक विभाग ठरला त्यांत झाशीची जागा मराठ्यांस आली. डोकी कापणीबद्दल मल्हार कृष्णास बरवासागर, § खेरीज

§ हें गांव ओर्छाजवळ आहे. या ठिकाणीं जोतिबा सिंदे यास दगा झाला असें कोटा दप्तर भा. १, पृ. ३ वंशावळ यांत नमूद आहे.

राणोजी सिंद्यांस गांवें ओर्छा राज्यांतून दिलीं. नारोशंकरचा कारभार स. १७५६ पर्यंत चालला. ”

ओर्छेकरानें दगा केला त्याची निश्चित तारीख उपलब्ध कागदांत नमूद नाहीं. ता. ३० डिसेंबर, स. १७४२ च्या पत्रांत गोविंदपंत बुंदेले त्या बनावाचा उल्लेख करितो, ‘ वोडशाचे जमीदारांनीं दगा केला, यंदांचा अंमल त्यांनीं भक्षिला, गांव ठाणीं मारिलीं. कांहीं नवी शिबंदी प्यादे नारोपंतीं ठेविले. वोडसेवाल्याचे भाऊबंद चुरखी येथें राहत होते त्याजवर नारोपंत चालून गेले, झुंज जालें. दोहींकडील माणसें पडलीं. त्याजवर ते येऊन भेटले. सल्ला जाहली. इतर ठाण्यांस लागले आहेत. ’ § यावरून स. १७४२ च्या नोव्हेंबरांत ओर्छेकरानें सिंद्यास दगा केला हें निश्चित होतें.

ओर्छा शहर नारोशंकरनें धुळीस मिळविल्यावर तेथील राजानें दक्षिणेस ५० मैलांवर तेहरी येथें नवीन राजधानी केली, तें राज्य विद्यमान आहे. नारोशंकरनें झाशीचा किल्ला ताब्यांत घेऊन खालीं शहर वसविलें, त्यांत ओर्छाचे लोकांस आणून शहराची वसती केली, तें हल्लींचें झाशी शहर होय. दक्षिणेतूनही त्यानें पुष्कळ कुटुंबें तेथें नेलीं. गंगायमुनांच्या मधील दुआबांत जाण्याचा हमरस्ता झाशीवरून असल्यामुळें तेथील व्यापार वाढून शहर संपन्न बनलें. राणी लक्ष्मीबाईच्या पराक्रमानें झाशीचें नांव इतिहासांत चिरस्मरणीय झालें आहे.†

**२ पेशव्याचें अपूर्व यश.**—स. १७४१ चा दसरा नाना साहेब पेशव्याचा पहिला उच्चतम विजय दाखवितो. या सालच्या विजयादशमीस छत्रपति व मातुःश्री यांचे आशीर्वाद घेऊन नानासा०नें स्वारीचें प्रस्थान ठेविलें. पुढील सबंध वर्ष त्यानें उत्तरेंत काढिलें. जयसिंगास भेटून माळव्याच्या सनदा

§ पे. द. २७. ७

† नारोशंकराच्या पश्चात् झाशीस मराठ्यांचे अमलदार झाले त्यांची नांवनिशी येथेंच सांगणें उचित होईल. १ महादाजी गोविंद (काकिर्डे ?) स. १७५६ पासून स. १७६०; २ बाबूराव कोन्हेर स. १७६१–१७६५; ३ विश्वासराव लक्ष्मण स. १७६६–१७६९; ४ नंतर रघुनाथ हरि नेवाळकर पराक्रमी तलवार बहादर सुभे झाले, त्यांनीं ओर्छाच्या राजास कैद करून झाशीच्या किल्ल्यावर ठेविलें. ओर्छा उजाड जाहलें. रघुनाथ हरीच्या वंशाकडे कारभार चालला. झाशीसंबंधानें खालील साधनें स्मरणीय आहेत. भा. व. १ झाशीची माहिती; बुंदेलखंड प्रकरण, पारसनीसकृत; Holcomb's History of Jhansi इ०

बादशहाकडून पैदा केल्या, हिसकून घेतल्या असेंही म्हणतां येईल. पूर्व समुद्रापर्यंत भरारी मारून बंगाल्यांत रघूजीची नांदणूक करून दिली. काशी, प्रयाग, गया येथील यात्रा समस्त सेनेसह पुऱ्या करून तो परत फिरला. बुंदेलखंडची व्यवस्था व दुसरे उरले सुरले कार्यभाग संपवून मग परत यावें असा त्याचा मनोदय होता. परंतु साताऱ्यास महाराजांची प्रकृति अत्यंत बिघडून तांबडतोब परत येण्याविषयीं त्यास पाचारण आलें. रघूजी भोसल्याचें प्रकरण दाभाड्यासारखें विकोपास जातें कीं काय अशी भीति शाहूस होती, म्हणून रघूजीलाही शाहूनें तशाच त्वरेनें आपल्या जवळ बोलावून आणिलें. शाहूची भीति अनाठायीं होती. बाजीराव लष्करी जोरावर पोसणारा, तर नानासाहेब त्याच्या उलट मुत्सद्देगिरीची छाप प्रतिपक्षावर बसवून कार्यसिद्धि करणारा, कोणत्याही विकोपास आळा घालणारा होता. ह्यास्तव या दीर्घ स्वारींत माळव्याच्या सनदांचें अपूर्व यश संपादन करून जूनअखेर पुण्यांत मातुःश्रीचें दर्शन घेऊन लगेच तो साताऱ्यास महाराजांच्या दर्शनास गेला. तेथें पेशव्याचें व रघूजीचें शाहूनें रहस्य जमवून मराठी राज्याचें संकल्पित राजकारण पुरें केलें. महाराजांची प्रकृतिही दरम्यान चांगली सुधारली.

नानासाहेबाबरोबर पिलाजी जाधवही साताऱ्यास गेला. ता. २ ऑगस्ट, स. १७४३ रोजीं तो रामचंद्रबावास कळवितो. "श्रीमंतांची व दरुणी महालची समाजावीस जाली. वस्त्रें होणें राहिलीं आहेत, तीं आठ दहा रोजांत जालीं म्हणजे सत्वरीच पुण्यास जाऊं. सांप्रत आपण कोणे ठिकाणीं आहेत, काय मनसबा, छावणी करणार कीं देशास येणार तें लेखन करावें." दरुणी महालची ही समजावीस म्हणजे राणी सगुणाबाईची रघूजी भोसल्यासंबंधानें पेशव्यावर गैरमर्जी झाली होती, तिची निवृत्ति होय. ‡

अर्थात् सिंदे होळकर माळव्यांत छावणीस राहिले त्या संबंधानें परत येते वेळीं पेशव्यास महादोबाची सूचना गेली होती ती अशी. 'प्रतिवर्षी नर्मदा उतरतांच सैनिकांस निरोप देण्यांत येतो. यंदा स्वामींनीं फौजांस निरोप देऊं नये. सिंदे होळकरांस आश्विनमास पावेतों माळव्यांत ठेवावे, स्वामींनीं हा विचार केलाच असेल, परंतु सूचना लिहिली आहे. ¶ यावरून सिंदे होळकरांची पहिली छावणी स. १७४३ त उत्तरेंत झाली.

‡ पे. द. २३.९ ¶ पे. द. २१.९

पेशवा व रघूजी भोसले यांच्या भांडणाचा बोभाटा पूर्वीच्या दाभाडे प्रकरणा-प्रमाणें बाहेर फारच गाजला. शाहूला तर अत्यंत धास्ती पडली कीं हे दोघे बलिष्ठ सरदार आपसांत लढून राज्याची इभ्रत बुडवितात. पण या लढ्याचे जे कागद उपलब्ध आहेत, त्यांवरून अटकळ होते कीं उभयपक्षीं हा एक देखाव्याचा खेळ मुद्दाम बादशहा व अलिवर्दीखान यांच्या प्रत्ययासाठीं उभा केलेला होता. उभयतांचे चार दोन युद्धप्रसंग झाले आणि एक ग्वाल्हेरजवळ व दुसरी गया येथें अशा पेशवे रघूजींच्या दोन भेटी गुप्तस्वरूपाच्या झाल्या. सर्व हिंदुस्थानांत मराठी सत्ता स्थापणें हा पेशव्याचा मुख्य उद्देश, चौथाई लागू करणें हें त्या उद्योगाचें प्रतीक. लष्करी जोराशिवाय सुखासुखीच्या बोलाचालीनें मोगल अंमल-दार मराठ्यांच्या मागण्या देईनात, म्हणूनच तर पेशवा व रघूजी यांनीं कार्यक्षेत्रें वांटून तदनुसार त्यांनीं आपले उद्योग चालविले, त्यांत एकमेकांवर आक्रमण करण्याचेही प्रसंग उद्भवले, त्यांवरून उभयतांची खात्री पटली कीं विरोध करण्यांत नुकसान फार व फायदा कांहींच नाहीं, आपसांत मिटतें घेण्यांतच दोघांची व राज्याची निभावणूक आहे. उभयपक्षांकडे मध्यस्थ मंडळी होती त्यांनीं हीच समजूत त्यांची घातली. शाहूनें दोघांसही निकडीनें जवळ आणून शिष्टाई केली. रघूजीचा वकील कोन्हेरराम कोल्हटकर साताऱ्यास होता, त्यास रघूजीनें नागपूराहून ता० १७ जुलै, स. १७४३ रोजीं लिहिले, ‘ आम्ही बंगालियाहून नागपुरास आलियाबरोबर सविस्तर वर्तमान लेहून पत्रें रवाना केलीं आहेत. त्यावर तुमचें पत्र व महाराजांचीं आज्ञापत्रें सादर जालीं. तेथें आज्ञा कीं दर्शनास येणें. त्यास आम्ही तत्समयींच स्वार व्हावयाचा विचार केला होता; परंतु भास्करराम यांस बंगाल्यांत ठेविलें होतें, त्यांचा मार्ग लक्षीत होतों. प्रस्तुत फौजेसहवर्तमान, ज्या मार्गें पेशव्यांची फौज आली, त्याच मार्गें एक दों मजलींचे अंतरें आले. त्यांची फौज माळव्यांतून आलियावर मशारनिल्हे मजल दरमजल शिवनीछपारियावरून आम्हांपाशीं आले. भेटी जाल्या. याउपरी गुंता नाहीं. मजल दरमजल स्वामींचे सेवेसीं येऊन पोचतों.’[१]

साताऱ्यास आल्यावर पेशवे-रघूजींचा समेट घडून येण्यास विलंब लागला नाहीं. शाहूनें तंटा तोडून उभयतांचीं क्षेत्रें व व्यवस्था ठरवून दिली, तिचा संदर्भ मागील प्रकरणांत दिलेला येथें लक्षांत आणावा.

१. पेशव्यांनीं पूर्वी संपादिलेला मोकासा व जहागिरी; कोंकण व माळवा प्रांताचा कारभार; आगरा, प्रयाग व अजमीर प्रांतांची खंडणी, पाटणाप्रांतांतील

---

१. रा. खं. ३.२१७

तीन तालुके, कर्नाटकाच्या जमेपैकीं वीस हजारांचे वर रघूजीच्या हद्दींत पेशव्यास दिलेले इनाम गांव, इतक्या बाबती पेशव्याच्या समजाव्या, त्यास इतरांनीं हरकत करूं नये.

२. लखनौ, बहार व पैनबंगाल, तसेंच वऱ्हाडपासून कटकपर्यंतचा प्रदेश एवढ्या भागांतील खंडणीचे वगैरे सर्व हक्क रघूजीनें घ्यावे, त्यास पेशव्यानें किंवा इतरांनीं हरकत करूं नये.

याप्रमाणें हद्दीनें राहून, कोणी कोणाशीं खटला करूं नये. त्या प्रांतीं सरकारांत पेशकशी घेण्याचे मुद्दां ठराव करून दिले; आणि उभयतांचें सख्य करून एकमेकांस मेजवान्या करविल्या; उभयतांनीं विकल्प ठेवूं नये, ऐसे पायांवर हात ठेवून घेतले; सरकारांत उभयतांनीं मेजवान्या केल्या; ठरावाचे ऐवज दिले; आणि महाराजांनीं उभयतांस मेजवानी बहुमान देऊन निरोप दिला. पेशव्यानेंही गढा मंडळासंबंधानें निराळा ठराव केला. शिवाय या बाबतींत पेशव्याशीं स्वतंत्र ठराव शाहूनें ता. १६ जानेवारी, स. १७४४ चा केला तोही लक्षांत ठेवणें जरूर आहे.§

**३ भेलसा काबीज** ( स. १७४४–४५ ).—स. १७४३ त मोठ्या स्वारींतून परत आल्यावर उत्तरेंतील अपुरीं कामें पुरीं करण्यासाठीं लगेच सालअखेर पुनः त्या बाजूस जाण्याचा पेशव्याचा निश्चय होता, पण अनेक कारणांनीं त्यास एक वर्ष पावेतों बाहेर जाणें शक्य झालें नाहीं. ता. ११ डिसेंबर, स. १७४४ रोजीं तो शिंदे होळकरांस लिहितो, "कोंकण प्रांतीचा बंदोबस्त अवकाशानुरूप होईल, इकडे बुंदेल्यांशीं कटकट चालते, दसरा जाहला, दिवाली जाहली तरी आपलें कूच न केलें म्हणोन लिहिलें तें कळलें. तुम्हीं लिहिला अर्थ यथार्थच आहे. आमच्याही चित्तांत तिकडे जलदीनें यावें असें होतें. परंतु दरबारचा पेंच होता, निजामन्मुलुकाशीं कलहास्पद भासलें, कोंकणचा गाडा चालता करीतच आहों. नबाबांचे चित्ताची स्वस्थता करीत आहों. त्यांजकडून सय्यद लष्करखान आले, त्यांची आमची भेट घोड-नदीजवळ मलठणापुढें जाली. गुंता उलगडून तिकडे येतों. नंतर बुंदेल्यांकडील कामें सुधारणें तुमच्या मनोदयानुरूप केलीं जातील. येथील दरबारचा बंदोबस्त करावयासाठीं व निजामांचे पेचास्तव राहणें पडलें. नाहीं तर या

§ शा. च. पृ. ७९ ऐ. प. ३५-३९; रा. श. पृ. ९८–९९; ना. रो. १.१०

दिवसांत नर्मदेवर आलों असतों."§ या मजकुरावरून पेशव्याची दक्षिणेंतील विवंचना लक्षांत येते. शाहूची उत्तरावस्था, राण्यांचीं भांडणें, कोंकणांत आंगऱ्यांकडून होणारा उपद्रव व निजामाची कर्नाटकांत व बागलाणांत चढाई हीं प्रकरणें पेशव्यास चैन पडूं देत नव्हतीं. त्यांचा निर्देश यथास्थलीं कळून येईल.

बादशहा व जयसिंग यांजकडून पूर्वीचे करार पुरे करून घेण्याचें काम सिंदे होळकरांनीं महादेवभट हिंगण्याच्या मार्फत चालविलें, पण त्यास नेट लागला नाहीं.. उत्तर हिंदुस्थान कबजांत आणण्याचें काम वाटलें तितकें भुसभूशीत नव्हतें. माळव्यांत सिंदे होळकर स्वतः ठासून बसले, म्हणून तेथें मराठ्यांची सत्ता कायम झाली. पण बुंदेलखंडांत अंताजी माणकेश्वर व गोविंद बल्लाळ यांच्या हातून सालोमालच्या ठरलेल्या खंडण्या देखील वसूल होईनात. ओर्छाच्या राजानें राणोजीचा पुत्रही मारला, तेव्हां तेथें नारो शंकराची नेमणूक झाली. पुढें तीन चार वर्षे बुंदेलखंडांत निरनिराळ्य ठिकाणीं अव्यवस्था माजून कित्येक प्रचंड रणसंग्राम मराठ्यांना करावे लागले. पेशव्याचें लक्ष तिकडे वेधलेलें होतेंच. स. १७४४ च्या अखेरीस त्यानें उत्तर हिंदकडे प्रयाण केलें. या स्वारीस मुरंज भेलशाची स्वारी म्हणतात. तो माळव्यांत दाखल होण्यापूर्वी भेलशास सिंद्यांनीं मुरुंग लावले होते. १८ सफरीं सोमवारीं (११ मार्च, १७४५ रोजीं) श्रीमंतांचें निशाण चढलें. श्रीमंतांचा व त्यांचा तह अद्यापपर्यंत ठरला नाहीं.¶ भोपाळचा नबाब यारमहंमदखान याजपासून भेलसा हस्तगत केलें असावें. माळव्याची सुभेगिरी मराठ्यांस मिळाल्यावर भेलशाचें मध्यवर्ती ठाणें मोगलांच्या कबजांतून काढून घेणें ओघास आलें. भोपाळकर नबाबाचा वृत्तान्त संदर्भापुरता खालीं टीपेंत दिला आहे.‡

§ पे. द. २५.६ ¶ रा. ख. ६ ले. १६६-६७, पे. द. २१. ७

‡ बहादूरशहाच्या वेळेपासून भोपाळास दोस्त महंमदखान पठाण भोपाळच्या कारभारावर होता. मराठ्यांचें आक्रमण त्या बाजूस झालें तेव्हा तोही उत्तरोत्तर मराठ्यांच्या सत्तेखालीं आला. भोपाळकरांच्याच ताब्यांत भेलसा होतें. दोस्तमहंमदखान स. १७३६ त वारल्यावर त्याचा पुत्र यारमहंमदखान भोपाळचा नबाब बनला. तो स. १७५३ त वारल्यावर त्याचा पुत्र फैजमहंमदखान गादीवर येऊन त्यानेंही विशिष्ट करारानें मराठ्यांस खंडणी भरून त्यांचा आश्रय पत्करिला. यांचेच वंशज हल्लींचे भोपाळकर होत. पेशव्यानें पिलाजीरावामार्फत फैजमहंमदखानाशीं तह केला, तदनुसार भेलशाचे १५॥ महाल पेशव्यास मिळाले. भा. व. शा. पृ. २०. या वांटणीचा कागद रा. भालेराव यांजकडून मिळाला, त्याची तारीख २ मार्च, स. १७४५ आहे.

भेलसा येथें बराच मुक्काम करून पेशव्यानें बादशहा, राजपूत संस्थानें, माळवा व बुंदेलखंड इत्यादिकांचे व्यवहार उलगडले म्हणून या स्वारीस भेलशाची स्वारी असें नांव आहे. मुलूखगिरीच्या या उद्योगांत अनेक लहान मोठे कमी अधिक योग्यतेचे सरदार वावरत होते. मनुष्यप्रयत्न असा आहे कीं अत्यंत कमी श्रमांत होईल तितका अत्यंत मोठा फायदा पदरांत पाडून घ्यावा. यामुळें माळवा बुंदेलखंडच्या कामगिरींत उत्तरोत्तर मराठे सरदारांची आपसांतील धुसफूस वाढत चालली. वास्तव्य करून तिकडे कायम राहणारे मुख्य सरदार सिंदे, होळकर व पवार हे तिघेच होते, आणि या तिघांतच प्रदेशवांटणीचे कलह वारंवार उद्भवलेले दिसतात. दतिया, चंदेरी, जैतपुर, कालिंजर, पन्ना इत्यादि बुंदेले संस्थानिकांचे व्यवहार वर्षानुवर्ष चालू राहिले. मात्र भोपाळकर यार महंमदखान रोहिला व त्याचा कर्तबगार पुत्र फैजमहंमद यांची समजूत या वेळीं झाली.§

ओर्छेकर प्रीतिसिंगाचें निंमे राज्य सरकारांत घेतलें. चुरखीचें ठाणें लहानसेंच पण तेथें जयाजी सिंद्यास सडकून रणसंग्राम करावा लागला.† पुढील दोनतीन वर्षेपावेतों बुंदेल्यांचे संग्राम व व्यवहार चालू राहिले. ते आतां सांगतों.

**४ बुंदेल्यांशीं प्रखर संग्राम.**—छत्रसालाचे दोघे पुत्र हिरदेसा व जगत्‌राज यांस पेशव्याचा आश्रय मिळाल्यापासून ते इतरांवर वर्चस्व गाजवून आपली सत्ता वाढवूं लागले. हिरदेसा स. १७३८ त वारल्यावर त्याचा पुत्र सभासिंग बराच उपद्व्यापी निघाला. जगत्‌राज स. १७५८ पावेतों जिवंत असून मराठ्यांच्या तंत्रानें वागून आपला निभाव करी. त्याच्या प्रदेशाची कमाविसी पेशव्यानें गोविंद बल्लाळ यास दिली.¶ अर्जुनसिंग राजे धंधेरे म्हणून एक बुंदेला सरदार होता. त्याचा प्रांत सभासिंगानें बळकावला म्हणून पेशव्याची मदत मागण्यासाठीं तो पुण्यास येऊन बसला. स. १७४३ पासून स. १७४६ पावेतों तो पुण्यास पेशव्याच्या दाराशीं धरणें धरून राहिला. दरम्यान त्याच्या वडील पुत्रास सभासिंगानें आपल्याकडे वळवून कनिष्ठाशीं

§ ना. रो. भा. १. १८-२२, न. क्र. पृ. १२२, ना. रो. १.२७,२८ व २०२,२०५ इत्यादि संदर्भ पहावे.

† पे. द. २७ ले. १३-१५. चुरखीचें ठाणें जालौनजवळ आहे. काल्पीच्या दक्षिणेस २० मैलांवर उरई रे. स्टे. असून उरईच्या आसपास चुरखी जालौन वगैरे स्थळें आहेत.

¶ ना. रो. १. २८

झुंज केलें. दोन तीन महिने लढाई जाहली. नाइलाज देखोन कनिष्ठ पुत्र जोहार करून कटून मेला. असा कलह वाढतच गेला. अर्जुनसिंग तर पुण्यास असें धरणें धरून बसला कीं त्याची तोड काढल्याशिवाय पेशव्याचा परिणाम लागेना. एका बाजूस सभासिंग त्याचा हितकर्ता तर दुसऱ्या बाजूस हा अर्जुनसिंग त्याच्या पाठीशीं पडलेला. अशा पेंचांत पेशव्यास उमज पडेना कीं हा तंटा कसा मिटवावा. तेव्हां त्यानें सिंदे-होळकरांना आर्जवाचीं पत्रें लिहून निकाल करण्यास सांगितलें. "अर्जुनसिंग आमच्या आश्रयास आले. आज चार वर्षे जाहलीं. त्यांची दाद न घेणें योग्य नाहीं. तर पूर्वीं यांजकडे जे गाव गव्हा होते, ते त्यांचे त्यांजकडे चालवावे, अधिक उणें करूं नये, अशी तजवीज संभासिंगाचा तह होत आहे त्यांत करून द्यावी. आम्ही बंगाल्यास गेलों ते सालीं सभासिंगांनीं त्यांची जागा घेतली ती त्यांस परत देववावी. वडील पुत्र भेटीस येतील तर भेट न घेतां अर्जुनसिंगाची स्थापना करावी. आमचें वचन त्यांस गुंतलें आहे." ( ता. २८ ऑक्टोबर, स. १७४६ ). ‡ या प्रकरणाचा निकाल काय झाला तो कळत नाहीं.

अशीं किती तरी प्रकरणें एका बुंदेलखंडांतच उद्भवलीं. उत्तर हिंदच्या सुभेगिरीच्या सनदा पेशव्यास मिळाल्याबरोबर दिल्लीचें महत्त्व संपुष्टांत येऊन हिंदच्या राजकारणाचें केंद्र पुणें-सातारा येथें बनलें. स. १७४६ च्या मे महिन्यांत जैतपुरचा सुप्रसिद्ध व मजबूद किल्ला सिंदे-होळकरांनीं काबीज केल्याबद्दल महाराष्ट्रांत मोठी खुशाली होऊन मराठ्यांचा दरारा चहूंकडे वाढला. जैतपुरचें नांव बंगसाचे वेळेपासून इतिहासांत गाजलेलें असून त्याच्या आश्रयानें बुंदेले मराठ्यांस जुमानीनातसे झाले, म्हणून सिंदे-होळकरांनीं पेशव्याच्या हुकमानें तें स्थान शर्थ करून काबीज केलें. दोघे बुंदेले राजे डांगेमध्यें पळों लागले, सबब स. १७४६ च्या एप्रिलांत ठाण्यास मोर्चे लाविले. बुंदेले घाबरे झाले. ठाणें फत्ते झाल्याचें वर्तमान छ. २४ रबिलाखरचे पत्रांत म्हणजे ता. ५ मे रोजीं सिंदे-होळकरांनीं पेशव्यास कळविलें. "बुंदेल्यांनीं जैतपुरास जेजाला बर्कंदाज दारूगोळा बाजेसामान बहुत ठेविलें. आपले कडील हजार माणूस मेले, चार हजार जखमी जाले. आजीच किल्ला फत्ते केला म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. श्रवण होऊन संतोष जाहला. शाबास तुमची व लोकांची. तुम्हांसारखे उमदे सरदार इरेस पडल्यावर जैतपुरची कथा

‡ का. सं. प. या. ले. ५०, ५७, ५८.

काय !" असें उत्तर पाठवून पेशव्यांनीं सरदारांचा गौरव केला. हें पत्र ता. ७ जून, स. १७४६ चें आहे. मराठ्यांशीं लढणारे हे बुंदेले राजे कोण कोठचे त्याचा निर्देश आढळत नाहीं. बहुधा छत्रसालाचा नातू सभासिंग हाच त्यांत प्रमुख होता.§

दतियाच्या बुंदेले राजानेंही मराठ्यांस त्रास देण्याचा क्रम चालविला होता. खरें म्हटलें तर स्वतंत्र वृत्तीनें वागणारे बुंदेले मराठ्यांची सत्ता मानण्यास कबूल नव्हते आणि पेशव्यांनीं तर आपली सत्ता चहूंकडे बसविण्याचा उद्योग हातीं घेतला. अशा स्थितींत समस्त बुंदेल्यांची जूट बनूं न देतां, प्रत्येकास वेगळा गांठून त्याजवर शह बसविण्याचा प्रयोग सिंदे-होळकरांनीं चालविला. अशीं युद्धें वर्षोंगणति चालल्यास नवल नाहीं. ता. २० ऑक्टो०, स. १७४६ रोजीं पेशवा रामचंद्रबावास लिहितो, "किल्लेकऱ्हारा दतियेकरांनीं घेतला. झाशीप्रांतीं उपसर्ग करतात म्हणोन लिहिलें, त्यास विना दतियेकरास वोडसे करासारखाच नतीजा दिल्याखेरीज अंमल सुरळीत देतात असें नाहीं. तरी फौज मुद्धां नारोशंकरास सामील होऊन दबावानें काम होईल तें करावें.†" ता. २४ जानेवारी स. १७४७ रोजीं अंत्रीचें ठाणें हस्तगत झालें.

माळवा-बुंदेलखंडांत मराठ्यांचें आसन स्थिर करण्यांत त्यांचें शौर्यतेज जितकें परिणामास आलें, तितकेंच रामचंद्रबावा सुखटणकर याचें मुत्सद्दी शहाणपणही उपयोगास आलें यांत संशय नाहीं. त्या कामांत अनेक सरदार व मुत्सद्दी दहा-वीस वर्षे वापरत होते, परंतु त्या सर्वांत पेशव्यांची मुख्य भिस्त या रामचंद्रबावावर होती. बाजीरावाच्या वेळेपासून रामचंद्रबावा उत्तरेंत सर्व ठिकाणचीं तंत्रें सांभाळून सिंदे-होळकर व इतर सरदारांस ज्याची त्याची मर्जी ओळखून मुख्य धोरणांत वागवीत होता. पेशव्याच्या मुख्य कल्पना व ताकिदी रामचंद्रबावास दिलेल्या आढळतात. पत्रानें व वारंवार भेटून पेशवा त्यासच जोखमेचीं कामें सांगत असे. गोविंद बल्लाळ, अंताजी माणकेश्वर, दादो भीमसेन

§ जैतपुर हे रेल्वे स्टेशन झांशी–बांदा फाट्यावर झांशीपासून ६७ मैल आहे. रेल्वे स्टेशनचें नांव बेलाताल आहे. बेलातालच्या पुढें २० मैल महोबा हें स्थळ त्या वेळीं प्रसिद्ध होतें. पहा का. सं. प. या. ५१,५२,५३; ना. रो. १.२७; पे. द. २७.१७. ऐ. सं. सा. भा. १ पृ. ४० ले. ३६.

† का. सं. प. या. ५६; पे. द. २७.१६, २०, २२, २३; ना. रो. १ ले. २०७–२०८ इ०

वगैरे किती तरी माणसें पेशव्यांनीं उत्तरेच्या कामगिरींत ठेविलीं, पण संधि सांपडताच रामचंद्रबावाचें कल्पक डोकेंच मुख्यतः कामास आलें. तो समंजस, गमखाऊ व हिशेबी मनुष्य होता. दूरदृष्टि पोंचवून व अंतीं नफानुकसान कशांत आहे हें अचूक ओळखून सर्वांकडून सौम्योपचारांनीं त्यानें कामें करविलीं आणि मराठ्यांच्या अंमलास दृढता आणिली. जो प्रकार त्यानें उत्तरेंत निर्माण केला, तोच पुढें पुण्याच्या कारभारांत त्यानें सिद्ध करून नानासाहेब व भाऊसाहेब यांच्या द्वारा अनेक राज्योपयोगी गोष्टी सिद्धीस नेल्या. त्याच्याच तोडीचा होळकराजवळ पेशव्यांनीं नेमलेला कारभारी गंगाधर यशवंत होय. पण रामचंद्रबावाची सर गंगाधर यशवंतास आली नाहीं. मात्र गंगाधर यशवंताच्या ठिकाणीं रणांगणावरील युद्धचातुर्य होतें तें रामचंद्रबावास नव्हतें. दोघेही पेशव्यांनीं नेमून दिलेले कारभारी, म्हणजे एक प्रकारें ते पेशव्याच्या हातांतले लगाम होत. सरदार स्वार्थाचे किंवा हेकटपणाचे पायीं कार्यनाश करूं लागले तर त्यांस आळा घालून मर्यादेंत ठेवण्याचें काम हे पेशव्यांनीं नेमलेले कारभारी करीत. रामचंद्रबावाचाच शिष्य सखाराम बापू म्हणतां येईल. सखाराम बापू म्हणजे रघुनाथरावास घातलेला लगाम. रामचंद्रबावाचा दुसरा चेला भाऊसाहेब.

राणोजी व रामचंद्रबावा यांचें प्रेम व सख्य होतें, तें पुढें जयाप्पाच्या वेळीं बिघडलें आणि कार्यनाश होतोसें वाटतांच पेशव्यानें उभयतांस पुण्यास बोलावून त्यांची समजूत घातली. " जयाप्पास व रामचंद्रबावास निरोप झाला. शेवटीं दोघांच्या कांनीं बोलले कीं तुम्ही यांचे ठायीं यथास्थित वृत्तीनें राहवें व यांनीं तुमचे ठायीं योग्य वृत्तीनें राहवें. निरोप घेऊन गेल्यानंतर सखारामपंत, भाऊ, आम्ही, दादा, बाबा नाना इतकेच होतों. नाना दादासीं बोलले ' बादज खैर कीं ?' ( पुढें सर्व ठीक आहे ना ? ) उत्तर—खैरच आहे. भाव कीं दोघांसीं समजूत घालीत असतां एकानें मस्करी, एकानें खडसून बोलावें, असा भाव ते दिवशीं दिसून आला." अशा या पत्रांवरून केव्हां थट्टेनें, केव्हां धाकानें, कामें सिद्धीस नेण्याची नानासाहेबाची हातोटी दिसून येते.* वरील जयाप्पाच्या समजुतीचा प्रकार स. १७४६ किंवा ४७ चा असावा.

**५ हिंगणे व राणोजी यांचे मृत्यु.**—पेशवा भेलशावर असतां दिल्ली येथें महादेवभट हिंगणे याचा अल्प बोलाचाली वरून ता. १ फेब्रुवारी,

* पे. द. २७.२१.

स. १७४४ रोजीं खून झाला, तो प्रकार जरी मराठ्यांस कोणत्याही प्रकारें जाचक झाला नाहीं तरी इतिहासांत त्याचें महत्त्व विशेष आहे. ता. २९ फेब्रुवारीच्या पत्रांत सदाशिवरावभाऊ धोंडोबा आपा पुरंदरे यास लिहितो, "काल दिल्लीचें पत्र तेविसावे रोजीं आलें त्यांत लिहिलें आहे कीं महादेवभट मनसूरअलीखानाच्या दरबारीं गेले. बरोबर जमादार व प्यादे होते. बोली होत असतां महादेव भटांनीं शिवी दिली आणि आपले लोकांस बोलले कीं धरा. त्यावरून यांची त्यांची लटापटी होऊन महादेवभटास जखमा लागल्या, त्याच्या पुत्रासही जखम लागली. संध्याकाळीं घरास गेले. मध्यरात्रीं मृत्यु पावले. पुत्र मात्र वांचले. मोठी गोष्ट वाईट जाहली."

एवढ्या महत्त्वाचा हा प्रकार इतिहासास अज्ञात असावा हेंही एक आश्चर्यच होय. दिल्लीचीं पत्रें साताऱ्यास येण्यास तेवीस दिवस लागले, यावरून महादेवभटाचा वरील मृत्यु अंदाजीं १ फेब्रुवारीच्या आंत बाहेर धरतां येईल. महादेवभट बाळाजी विश्वनाथाबरोबर स. १७१८ त दिल्लीस गेला. पेशव्यानें त्यास मराठ्यांच्या वकिलातीवर तेथें ठेवून दिलें. तेव्हांपासून मृत्यूपर्यंत त्यानें हें जबाबदारीचें काम किती नेकीनें व दक्षतेनें सांभाळिलें तें मराठ्यांच्या शीघ्र राज्यविस्तारावरूनच सिद्ध होतें. दिल्लीचा बादशहा स. १८०३ सालीं इंग्रजांच्या कबजांत जाईपर्यंत या हिंगणे घराण्याची कामगिरी विशेष प्रशंसनीय झाली. राजकारण संभाळून त्यांनीं पेढ्या व सावकारी थाटून उत्तर हिंदुस्थानांत मोठा लौकिक संपादन केला. महादेवभट नासिकचा क्षेत्रोपाध्या दिल्लीच्या राजकारणांत प्रविष्ट होऊन आपलें बुद्धितेज प्रकट करूं शकला. मनसूर अलीखान बादशहाचा मीरबक्षी राज्याचा केवळ मुख्य आधारस्तंभ. अशा या उमरावच्या भेटीस मराठ्यांचा वकील जातो, तोंडावर त्यास शिवी देऊन जाब विचारतो, आणि त्या भानगडींत स्वराष्ट्रासाटीं प्राण वेचतो, हे प्रकार मराठशाहीचें सामर्थ्य दाखवितात आणि जगाच्या इतिहासांतही ते कांहीं अपरिचित नाहींत. शिवी देऊन वर्दळीस येणें अप्रयोजक म्हणतां येईल आणि या अप्रयोजकतेचें प्रायश्चितही महादेवभटास तत्क्षणीं मिळालें. तथापि जणूं काय कांहींच अपूर्व घडलें नाहीं अशा रीतीनें महादेवभटाचे पुत्र बापूजी व दामोदर कामावर रुजू झाले आणि बापाहून जास्त तेज उत्तरोत्तर प्रकट करूं शकले. पुरुषोत्तम व देवराव हेही त्याचे आणखी दोन पुत्र मराठशाहींत

पुढें नांवालौकिकास चढले. एकंदर मराठी राज्यांत अनेक घराणीं प्रसिद्धीस आलीं त्यात या हिंगण्यांची गणना प्रामुख्यानें केली पाहिजे.

दुसरा एक महत्त्वाचा मृत्यु याच वर्षी झाला तो राणोजी शिंद्याचा होय. त्या वेळीं पेशवा स्वारीं संपवून नुकताच परत गेला होता. जयाजी सिंदे लिहितो, "मौजे मीर्झापुर प्रांत सुजालपुर † येथें तीर्थरूपांस कैलासवास जाला, त्या स्थलावरी छत्री करावयासी दोघे सिलाट पाठविणें.' हें पत्र ता. २१ जुलै, स. १७४५ चें आहे. राणोजीची बायको मीनाबाई श्रीगोंदें येथें होती, तिला छ. २९ जमादिलाखरीं म्हणजे ता. १९ जुलैस पेशव्यांनीं दुखवटा पाठविला.$

राणोजीला मृत्यु कशानें व कोणत्या दिवशीं आला तें निश्चित सागतां येत नाहीं. पुत्र जयाप्पा जवळ होता त्यानें मीर्झापुर येथें वडिलांचें उत्तरकार्य करून रक्षा उज्जनीस तीर्थाच्या ठिकाणीं आणिल्या आणि क्षिप्रातीरीं टोलेजंग छत्री बांधिली. अंदाजानें राणोजीचा मृत्यु ता. ३ जुलै; स. १७४५ चा धरतां येईल. दहन झालें त्या गावास राणोगंज नांव ठेवून तें छत्रीकडे इनाम दिलें. राणोजी सिंदे व मल्हारराव होळकर हे बाजीरावाच्या अनेक सहायकांपैकीं प्रसिद्धीस आले, त्यांचीं संस्थानें अद्यापि विद्यमान आहेत. उत्तरंत मराठ्यांची सत्ता निर्माण करण्याचें श्रेय या दोघांस दिलें पाहिजे. दोघेही शूर, निग्रही व पेशव्यांशीं अनुरक्त होते. दोघेही बहुधा समवयी असावे. कदाचित् राणोजी मोठा असेल, पण अल्पायुषी दिसतो. मल्हारराव आणखी वीस वर्षे जगला. राणोजीचे पुत्र सर्व एकापेक्षां एक पराक्रमी निघाले. मल्हाररावास एकच पुत्र खंडेराव होता, तो तरुणपणीं वारला, पण त्याची वाण अहल्याबाईनें भरून काढिली. बादशाहींतील एक वजनदार उमराव अमीरखान उमेदतुल्मुल्क याचा ता. २५ डिसेंबर, स. १७४६ रोजीं दिल्ली येथें खून झाला. त्याचे परिणाम मराठी कागदांत नमूद आहेत.

पेशव्याच्या या स्वारीचा फलितार्थ दामोदरपंत हिंगण्यानें ता. २३ जून, स. १७४५ च्या पत्रांत आपल्या बंधूंस लिहून पाठविला तो असाः—
"चि० पुरुषोत्तमजी व दिवाकरजी यांस आशीर्वाद, मु० भेलसें, लष्कर पंतप्रधान. आम्ही पातशाही लष्करांतून सार्वभौमापासून रुकसत जाहलों, ते समयीं श्रीमंतांस हत्ती, घोडा, खिलत, जवाहीर व फर्मान इनायत केला, आणि

† भोपालच्या वायव्येस ३० मैल. $ को. द. ले. ३७; रा. शं. पृ. १०२

आम्हांस हत्ती, खिलत व मोत्यांचा चौकडा देऊन रुकसत केलें. तेथून दिल्लीस येऊन ती० बापूंची आज्ञा घेऊन लष्करांत आलों. श्रीमंतांची भेट बुंदेलखंडांत जाहली. फर्मानबाडी उभी करून पातशाही इनायत घेऊन बहुत खूष जाहले. तदुत्तर बुंदेल्यांची मामलत आटपून देशाकडे कूच केलें. आम्ही समागमेंच देशास येतों. ती० बापू पातशहापाशीं सुखरूप आहेत. येथेंही श्रीमंतांची व सरदारांची कृपा बहुत आहे."†

पुढील दोन सालांत साताऱ्यांतील भानगडींमुळें स्वतः पेशव्यास जरी बाहेर जातां आलें नाहीं तरी चहूंकडे धांदल व निकराचीं प्रकरणें चालू असून त्यांची उस्तवारी पेशव्यासच करावी लागत होती. बुंदेलखंडांतील सत्ताधीशांशीं झगडे चालू असून, राजपुतान्यांत सवाई जयसिंग स. १७४३ त मरण पावल्यावर ईश्वरसिंग व माधोसिंग या दोघां पुत्रांत कलह निर्माण झाले, तेणेंकरून पुढें मराठे-राजपुतांचें सख्य लयास गेलें. बंगाल्यांत भोसल्यांच्या स्वाऱ्यांचा मोठा विकोप बनला, तो शांत होण्यास सात वर्षे लागून त्यांत रघूजीचें सामर्थ्य वेचून गेलें. कर्नाटकांत निजामानें आक्रमण चालविलें त्यास आळा घालणें अपरिहार्य झालें. कोंकणांत आंगरे बंधूंचा बेबनाव होऊन त्याचा संपर्क खुद्द छत्रपतीस पोंचला. ठिकठिकाणचे हे व्यवहार ऐतिहासिक संगतीसाठीं लक्षांत ठेवणें जरूर आहे.

६ **नेवाईची स्वारी**.—पेशव्याचा हिंदुपदपातशाहीचा उद्योग उत्तरेंत फैलावण्यास अनुकूल परिस्थिति येत चालली तोंच शाहूछत्रपतींचें सामर्थ्य खता होत जाऊन पेशव्याचें मन अत्यंत व्यग्र बनलें. सवाई जयसिंग मृत्यु पावल्यानें राजपूत राजांना पोक्त व सामर्थ्यवान नेता राहिला नाहीं. जयसिंगाच्या मृत्यूनें बादशाहीचेंही सामर्थ्य लयास जाऊं लागलें. तो जिवंत असेपर्यंत मराठ्यांस मोठा आळा होता. त्याच्या पश्चात् निर्नायकी माजून सिंदे-होळकर उत्तरेंत बलवान बनले होते, त्यांजकडे राजकारणें येऊं लागलीं. जयपुरच्या गादीसंबंधीं जयसिंगाच्या पुत्रांत यादवी उत्पन्न होऊन तिचा निरास करण्याचें जोखीम मराठ्यांवर आलें. स. १७४६-४७ त बुंदेलखंडांत मराठ्यांची सत्ता मजबूद बनली; माळवा तर त्यांचा होताच; राहतां राहिला राजपुताना, तोही कबजांत आणण्याची संधि चालून आली. स. १७४७ च्या डिसेंबरांत शाहूनें पेशव्यास दिल्लीस बादशहाच्या भेटीस जाण्याची आज्ञा केली. बहुधा पठाण

† रा. खं. ६.१७४

अब्दाली चालून येतो तर धावत बादशहाचे साह्यास जावें, नादीरशहासारखा प्रसंग पुनः बादशाहीवर येऊं नये, यासाठीं रवानगी केली. पेशव्याच्या या स्वारीस नेवाईची स्वारी म्हणतात. ता. १० डिसेंबर रोजीं पुण्याहून निघून पेशवा स्वारींत गेला, तो ९ जुलै स. १७४८ रोजीं परत आला. एप्रिलांत नेवाईजवळ पेशव्यानें माधोसिंगाची भेट घेतली‡ हें पाहून ईश्वरसिंग तडजोडीस कबूल झाला आणि नेवाई वगैरे आपले चार महाल पेशव्यास देऊन त्यानें त्याची मर्जी राखली.

"बाबत नजर सवाई जयसिंहाचे कनिष्ठ पुत्र माधोसिंग यांस ईश्वरसिंगाकडून चार महाल देवविले, भाऊपणाचा हिस्सा द्यावयाचा करार केला. नजर करार रुपये दहा लाख. मल्हारजी होळकरांनीं ता. ३० एप्रिल, स. १७४८ चें पत्र लिहून निशा केली. दुसरे दिवशीं पेशव्यास ३ लाख रुपये व महादाजी अंबाजीस २५ हजार रुपये नजर करार केली." परंतु हा ठराव ईश्वरसिंगानें पाळला नाहीं. होळकराची जामीनगत होती. सबब त्यास लढाईंत नरम करून होळकरानें करार पुरे करून घेतले. ता. १० ऑगस्ट, स. १७४८.† राजपुतांच्या भांडणांत सिंदे-होळकरांनीं आपआपले मतलब साधण्याचा प्रयत्न केला तो प्रकार पुढें यथास्थलीं सांगण्यांत येईल.

ता. २१ मे, स. १७४८ चें वर्तमान. "श्रीमंत जयनगरप्रांतीं आहेत. माधवसिंग वगैरे संपूर्ण येऊन भेटले. फौज मातबर जमली आहे. ईश्वरसिंग अब्दालीचे झुंजांतून पळून आला, त्याचा लौकिक फटकाळ जाहला. श्रीमंतांसीं विनीत होऊन वर्तावें लागलें. श्रीमंतांचा पुण्यप्रताप आहे. श्रीमंत दिल्लीस जाऊन पोंचले नाहींत. खासा पठाण पराभव पावून निघून गेला." §

या वेळीं यशवंतराव पवाराचा पेशव्याशीं बेबनाव होऊन जून महिन्यांत धारेस येऊन पेशव्यानें त्याचीं स्थलें धार, मांडवगड व त्यानजीकचा सोनगड हीं आपल्या कबजांत घेतलीं. यशवंतराव रुष्ट होऊन कुटुंबसह बदनावरास जाऊन राहिला. कांहीं काल लोटल्यावर यशवंतरावानें पेशव्याची मर्जी संपादून घेतली. ता. १५ ऑगस्ट, स. १७५१ रोजीं तीं स्थलें पेशव्यानें यशवंतरावास परत दिलीं.¶

‡ नेवाई हें स्थल जयपुरच्या दाक्षिणेस ३९ मैलांवर, सवाई मधुपुर-सांगानेर दरम्यानच्या रेल्वेवर स्टेशन आहे. † ना. रो. १-२०८; खं. ६-१९०, १९१, ५८१.
§ पे. द. २७.२९,३०. ¶ पु. द. १.७२,७५; रा. खं. ६.१४१; को. द. ७४,१०४.

याच वेळीं अब्दाली दिल्लीवर चालून आल्यानें उत्तरेंत नवीनच परिस्थिति उत्पन्न झाली. ता. ३ मार्चपासून सरहिंद येथें बादशहा व अब्दाली यांची लढाई होऊन अब्दाली पराभव पावून परत गेला, पण वजीर कमरुद्दीनखान तोफेचा गोळा लागून मरण पावला. यानंतर पेशवा बादशहाच्या भेटीस दिल्लीस गेला. "पातशहाची मुलाजमत जाहाली. पातशहांनीं श्रीमंतांस पुसलें, तुमचे काय मुद्दे आहेत ते लिहून द्यावे, त्याजवरी श्रीमंतांनीं उत्तर केलें कीं हजरतीची फत्ते जाहल्यावर अर्ज करूं. आधीं ज्या कार्यास आलों तें फत्ते जालें म्हणजे आमचें कार्य होईल. त्यावरून बादशहा बहुत खुष झाले. सातान्यास महाराजांनीं वर्तमान श्रवण करून पेशव्याचा स्तव फारच केला. समाधान पावले. आम्ही सांगितल्याप्रमाणें दिल्लीस गेले, पातशहांस संतुष्ट केलें. उत्तम गोष्ट केली."‡ यावरून पेशवा-बादशहाची ही भेट फेब्रुवारींत झाली असली पाहिजे. अब्दाली चालून येतो अशी बातमी आल्यावरून शाहूनें पेशव्यास बादशहाच्या साह्यास रवाना केलें. पेशव्याच्या मदतीची जरूर बादशहास वाटली नाहीं, आणि बादशहानें अब्दालीस पिटाळून लाविलें, तेव्हां पेशवा दिल्लीहून परत जयपुरकडे आला आणि नेवाईस माधवसिंगाची भेट घेऊन परत फिरला. उत्तरेकडील व्यवहारांचा भार त्यानें रामचंद्र बावावर टाकिला. बादशहा व पेशवा यांची ही एकच भेट इतिहासांत नमूद आहे.

पेशवा बादशहाच्या भेटीस गेल्यामुळें वृद्ध निजामाचे पोटांत धास्ती उत्पन्न झाली. स. १७४८ च्या आरंभीं त्यानें सुरतेवर जाऊन गुजरात प्रांत काबीज करण्याची आवई घातली. पुढें ता. २१ मे, स. १७४८ रोजीं म्हणजे पेशवा उत्तरेंत असतां निजाम औरंगाबाद येथें मृत्यु पावला. त्यापूर्वी थोडे दिवस तो बऱ्हाणपुरास असतां तेथून पेशव्याच्या वकिलानें कळविलें, "सांप्रत वृद्धाचें सर्व लक्ष श्रीमंतांच्या उत्तरेच्या मनसब्यावर आहे. श्रीमंतांचें फौजेसहित दिल्ली जाणें जालें, हुजुरांस यांची भीड पडेल, हुजूर [ = बादशहा ] आपले द्वेषी आहेतच, ते श्रीमंतांस अनुकूल होतीलच; सांप्रत श्रीमंतांचे मनांतही आपणांविषयीं विषम आलेंच आहे. पठाण दिल्लीवर चालून आले आहेत, पातशाही फौज त्याजवर गेली आहे, जय पराजय कसा काय होतो, श्रीमंत

‡ पे. द. २.९

सामील होतात, कीं हे गेल्यापूर्वीच झुंज उरकतें हें निजाम पाहत आहेत. बहुतसे साशंक होऊन धास्तींत आहेत. "¶

**७ महाराष्ट्रीय जीवनावर परिणाम.**—उत्तर हिंदकडील पेशव्याच्या पहिल्या दीड दोन वर्षांच्या प्रचंड स्वारीचा व त्यानंतर केलेल्या एकंदर स्वाऱ्यांचा परिणाम अपेक्षेहून फारच अल्प पदरांत पडला. माळवा, गुजरातच्या सनदा हातीं आल्या होत्या, तरी बुंदेलखंडांत मराठ्यांची सत्ता कायम होण्यास अवधि लागला. रघूजी भोसल्याचें प्रकरण मिटलें नाहीं. पूर्वेस गंगासागरपावेतों सर्व पश्चिम बंग देश मराठ्यांच्या कक्षेंत उतरला, मात्र त्याची सांगता होण्यास आणखी पुष्कळ प्रयत्नांची व रक्तपाताची आवश्यकता राहिली. त्यांतल्या त्यांत समस्त उत्तर हिंदच्या राजकारणाचे धागे दोरे, अनेक व्यक्तींचे वर्तनोद्देश व उलाढाली, आणि एकंदर परिस्थितीची जाणीव या नवीन पेशव्यास प्रत्यक्ष उत्पन्न झाली हाच मोठा महत्त्वाचा परिणाम या स्वाऱ्यांचा होय. उलटपक्षीं मराठ्यांच्या कर्तृत्वाचें व सत्तेचें भरपूर प्रदर्शन औत्तरीय अधिकाऱ्यांस झालें, तेणेंकरून पुढील राजकारणाची घडी कशी बसवावी याची उमज उभय पक्षांस झाली, हा या स्वाऱ्यांचा मुख्य फलितार्थ दिसतो. येथून पुढें पेशव्यानें आपलें खरें कर्तृत्व दाखविण्यास सुरुवात केली. चाचपडत पाऊल टाकण्याचा क्रम सुटला. बाजीरावाच्या शौर्याचें व उद्योगाचें आत्यंतिक फळ मराठ्यांच्या पदरांत पडण्याची सोय झाली. रामचंद्रबावा, महादोबा पुरंदरे अशा अनेक व्यक्ति पुढील राज्यव्यवहार सांभाळण्यास समर्थ बनल्या. सखाराम बापू बोकील आयुष्याचा पहिला अनुभव मिळवूं लागला.

शक्य तोंवर कोणासही लढाईचा उपद्रव न देतां केवळ शिष्टाईच्या जोरावर पेशव्यानें आपले कार्यभाग कसे तडीस नेले तें वरील वर्णनावरून कळून येईल. तरी मराठ्यांना काढून देण्याचे प्रयोग प्रथमपासून चालूच होते. ता. २५ मे, स. १७४३ रोजीं जयपुरचा वकील सिंद्यांस लिहितो, " तुम्हास तंबी पोंहोंचावून, किलेजातीची बंदोबस्ती करून बुंदेल्यांसी सामील व्हावें, त्यांनीं यांनीं मिळोन तमाम बुंदेलखंड माळवा सुद्धां काबीज करून गनिमाचा नीर काढावा, ऐसा दिल्लीच्या दरबारांत करार करून विडा घेऊन गुलाबसिंग येथें आला आहे. भदावरच्या किलेदारानें नारोशंकरास ठीक केलें आहे.

¶ पे. द. २५.७५; २८.४३,५१.

सबब बंदोबस्तास न चुकावें, घेतलेलीं ठाणीं जतन करावीं." ‡ नारोशंकर सर्वांस वस्ताद भेटला. त्यानें व सिंद्यानें अल्पावकाशांत बुंदेल्यांस सुतासारखें नरम आणिलें. ज्योतिबाचा खून ओर्च्छेकरांनीं स. १७४२ च्या नोव्हेंबरांत केला, तदनंतर नारोशंकरनें त्याचें पारिपत्य स. १७४३ च्या आरंभीं केलें हे प्रकार वरील पत्रावरून सिद्ध होतात. परत फिरतांना पेशव्यानें मल्हारराव होळकरासही या संबंधानें बजावलें होतें. रजवाडे चालढकलेची गोष्ट सांगतात. चंदेरी, दतिया येथील कार्यें विचारानुरूप विल्हे लावावीं, असें पेशव्यानें त्यास कळविलें, तें मल्हाररावानें मान्य केलें.§ पेशवा दाक्षिणेंत आल्यावर मागें ता. २७ सेप्टेंबर, स. १७४३ रोजीं सवाई जयसिंग मृत्यु पावला; वय वर्षें पंचावन होतें. तेणेंकरून राजपूत-मराठ्यांचा स्नेह चाळीस वर्षें चाललेला उत्तरोत्तर भंग पावला.

पेशव्यानें उत्तर हिंदच्या या मोठ्या स्वारींतून पुष्कळसें द्रव्य आणून छत्रपतींचें कर्ज वारलें. इतउत्तर उत्तरेची द्रव्यनदी दक्षिणेकडे वाहूं लागली तत्संबंधीचें पेशव्याचें एक मनोरंजक पत्र राजवाड्यांच्या ६ व्या खंडांत ले. १६० वर छापलेलें अभ्यसनीय असल्यामुळें पुढें देतों. ता. २६ डिसेंबर, स. १७४२ रोजीं हें पत्र बुंदेलखंडांतून लिहिलेलें आहे, त्यांत पेशव्याचा रंगेल स्वभाव, रसिकता, विद्वत्ता व उमेद हे भाव चांगले व्यक्त होतात. "चि. रा. नाना ( पुरंदरे ) प्रति बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक आशीर्वाद उपरी. या प्रांतीं प्राचीन हिंदु राजे सर्व संस्कृतप्रवीण, वेश्यामद्यादिकांचा अति अनादर, सातां पिढ्यांचे श्रीमंत, नृत्यगीतवाद्यव्युत्पत्तिप्रवीण. स्वजातीय अनेक स्त्रिया प्रवीण त्यांसी रत; किंचित् जितेंद्रियही आहेत. नर्माची रीत§ देवब्राह्मणांची विशेष मर्यादा व शोभा; जिचे अवलोकनमात्रें अधर्मिष्ठास धर्मरति उत्पन्न होणार. गाणार कम्पतम स्वर, वर्ज्यावर्ज्यादिक शास्त्रप्रमाणरीतीनें गाणार; वेदशास्त्र किंचित् जाणतात; त्यांत जे मुख्य ते निरापेक्ष; सर्वर्द्धिसमृद्धि; त्यांचे शिष्यवर्ग अनेक; प्रयत्नें आणून विद्यादृष्टीनें पाहतां अतिश्रेष्ट स्वदेशज; स्थूलदृष्टीनें पाहतां मात्र अरमणीय; बाग, फुलें, कमळें इत्यादि शोभा जे महाप्रयत्नें लहानशी करावी त्याची तों गणना नाहीं. ज्यांचें तेज पाहतांना असें वाटतें कीं, यांची प्रार्थना करून स्वदेशास न्यावें.

‡ पे. द. २१. ८ § पे. द. २७. ५.

§ नर्म = क्रीडा, रंगेलपणा.

परंतु ते विदेशभूमि जाणून, प्रार्थना केली असतां न येत. इकडील नद्या अमृतोपम, बहुत जनास स्वजलप्रदानें समृद्धिवंत करितात; व पांथांस आनंद व राज्यास द्रव्यवृद्धि करितात. ज्यांचे सहचारें वोढ्याची उपमाही आमच्या राक्षसस्वभाव नद्यांस नये. उत्तर प्रांतांतील सर्व मनुष्य शुभ्र, त्यांत एक रामचंद्र व कृष्णजी श्याम त्यांचें वर्णन करितां तद्देशीय कवीश्वर श्रमयुक्त झाले. इकडील सर्वही नीलांबुदसंभ्रम; परंतु धर्मरूपें पाहतां जे हंसोपम; सर्वही मर्यादशील; आयापेक्षां व्यय थोडा; अधर्मापेक्षां धर्म फार; शैव-मध्व -लिंगधर्ते सर्वही स्वमताभिमानित. शौर्यधर्माविपर्या, नायमाराव्यातिरिक्त ¶ सर्वही युक्तियोद्धे. हें सर्व तुम्हांसहवर्तमान पाहवें उचित असतां अनेक शोभा टाकून, एक स्वल्पशोभा अंगीकारून गेलां, हें उत्तम न केलें! पुढें तरी स्वकीयागमनेंकरून या प्रांताचें अवलोकन करणें उचित असे. तुम्हांसहवर्तमान इकडे येणें झालिया, उर्वरित शृंगारसाधनें प्रयत्नपूर्वक पाहण्यांत येईल. राज्यकार्य प्रसंग विचार करितां भगीरथसमान कैलासवासीयांनीं उत्तरेहून दक्षणपावेतों सुवर्णनदीप्रवाह चोवीस वर्षें वाहविला. त्यांचे आशीर्वादें अलीकडेही निरंतर वर्धमान वाहत असतां, देशाधिकारी सेनामुख्य व अकृत्रिमास पूर्ण त्या नदीनें संतुष्ट केलें. एक तृष्णा मात्र त्या सुवर्णवोघानें वर्धमान केली. दक्षण देशांतून सुवर्णनदी मागें रघूजी फत्तेसिंग बावांनीं आणिली, परंतु जागां जागां जिरली. मध्यें बहुत दिवस दाक्षिण नदी न वाहिली. श्रीइच्छेनें या वर्षांही कालानुरूप द्रव्यनदी उत्तमच या सैन्यांत आहे, परंतु पुण्याकडे जातां रुक्ष देश फार आहे, याजमुळें सर्व जिरून जाईल. एकदां उत्तरेकडील सुवर्णनदी व दक्षिणेची नदी दोहींचा संगम सागरकूपसमान पुणें या स्थळीं, मध्यें न जिरतां, पूरयुक्त योग घडणें, तेव्हां ऋणोद्धार श्रमसार्थक इहलोक परलोकीं उत्तम होईल. भागीरथी सागरासाठीं उत्पन्न, परंतु विश्वातें उद्धार करिते; तशी या काळीं हे उत्तरदक्षणनदी वाहते, बहुत जनांस उपकारक होते. सर्वही नद्या जलौघें समुद्रास जातात, एक कावेरी मात्र बहुत लोकांनीं आपले उपयोगास आणिली. तशी हे द्रव्यनदी मुख्य कार्य थोडें व गौणजन-कार्य मात्र बहुत करते. हा न्याय अन्याय, हा विचार साक्षी दृष्टिवंत असतील त्यांनीं विचारून पुण्यांतील रुक्षता दूर होय, व मध्यें कार्याकारण जिरे ऐसें करणें, हें योग्य असे. बहुत काय लिहिणें? हे आशीर्वाद."

¶ नायमार=नायर: नायमारांव्यतिरिक्त=नायर तेवढे खेरीज करून.

पंचवीस वर्षांपूर्वी बाळाजी विश्वनाथानें दक्षिणच्या मराठ्यांस दिल्लीचें दर्शन करून दिलें तेव्हांपासून मराठ्यांचा व्याप व सत्ता कशीं विस्तारलीं तें आपल्या नजरेसमोर आहे. मनुष्यस्वभावच आहे कीं दोन व्यक्ति किंवा समाज एकत्र आले म्हणजे एकमेकांच्या साहचर्यानें त्यांच्या एकंदर जीवनावर नानातऱ्हेचे बरे वाईट परिणाम घडून येतात. मोगल बादशाहीचें ऐश्वर्य व महाराष्ट्राचें दारिद्र्य यांचा संयोग भरपूर होऊन मराठ्यांचे डोळे कसे दिपून गेले त्याचें चित्र खुद्द पेशव्याच्या पत्रांत उमटलेलें वर दाखविलेंच आहे. लष्करी पेशा म्हटला कीं त्यांत चांगल्या बरोबर वाइटाचाही प्रादुर्भाव होतो. बाजीरावानें एकच मस्तानी पटकावली, तर त्याचा पुत्र नानासाहेब जास्त रंगेल. दक्षिणेंतून त्यानें ता. ११ जून, स. १७४४ रोजीं दामोदरपंत हिंगण्यास खालील पत्रें लिहिलीं. "तुम्हांस दिल्लीस जावयास निरोप दिधला ते समयीं दोन पोरी खुबसुरत दहा दहा वर्षांच्या हिंदु खरेदी करून पाठवाव्या म्हणून आज्ञा केली असतां तुम्ही पाठविल्या नाहींत. या उपरी तरी स्मरणपुरःसर दोन चांगल्या खरेदी करून पाठविणें. हयगय न करणें. पाठविते समयीं अति लिबासानें (?) न पाठविणें." यापूर्वी हिंगणे दिल्लीहून पेशव्यास भेटण्यास पुण्यास आला होता. दिल्लीस ता. १ फेब्रुवारी स. १७४४ रोजीं महादेवभट हिंगण्याचा खून झाला, त्यासंबंधानें समक्ष विचारपूस करून दिल्लीच्या वकिलातीचा पुढील जम बसविण्याकरितां स. १७४४ च्या उन्हाळ्यांत हिंगणे पुण्यास आला असला पाहिजे. परत जातांना तो निजामास भेटून मग दिल्लीस गेला. † 'हिंदु' मुली दिल्लीकडून नानासाहेबानें मागविल्या, त्यांत मुसलमान मस्तानी घरांत आल्यामुळें बाजीरावास बाधा झाली तसा प्रकार आपला होऊं नये अशीही पेशव्याची खबरदारी दिसते. सामान्यतः विवाहित स्त्रियांखेरीज पुरुषानें रक्षा जवळ बाळगिणें त्या वेळीं समाजांत पापाचरण मानलें जात नसे. मुसलमानीण असणें मात्र पाप. नानासाहेबाचीं अशीं पत्रें वारंवार लिहिलेलीं पुष्कळ आहेत. इतरांनींही तोच कित्ता गिरविला असल्यास नवल नाहीं.

उत्तरेंतून दुसरेही कलाकौशल्याचे जिन्नस मागविल्याचे उल्लेख आहेत. वरील पत्राबरोबरच त्याच तारखेचें पेशव्याचें पत्र बाबूजी महादेवास गेलें तें असें. "फर्मासी जिन्नस पिशावरी अत्तर, लाहोरी लगाम, मुलतानी लांचोडी कमाना वगैरेविषयीं तुम्हांस लिहिलेंच आहे. पत्र पावतांच पाठवून देणें. त्या प्रांतींचा

† पे. द. २५. ९.

अपूर्व जिन्नस अवश्य पाठविणें. "¶ महाराष्ट्राचें जीवन कसें विस्तार पावत गेलें तें यावरून दिसून येतें.

महाराष्ट्रीय जीवनांतील रूपान्तराची कल्पना तत्कालीन काशीयात्रेच्या हकीकतींवरून चांगली होते. दक्षिणच्या लोकांस पूर्वी उत्तरेंतील यात्रा महादुर्घट वाटत. पेशव्यांच्या राज्यवृद्धीबरोबर ही यात्रा सुकर होऊं लागली. राजकारणावरही त्याचा परिणाम झाला. यात्रेंतील अडचणी, कर व दानधर्म, हिंदु-मुसलमानांच्या अपेक्षा इत्यादि प्रकार व्यक्त करणारी पेशव्याच्या मातुःश्रीची काशीयात्रा पुढें सांगितली आहे.

८ **मातुःश्रीची काशीयात्रा.**—बाजीरावाची बायको काशीबाई इला वैधव्यावस्थेत पुण्यांत राहणें दुःसह वाटूं लागलें. घरांत सासू राधाबाई इचा दरारा मोठा, तिच्याशीं इचें पटलें नसेल. प्रकृतिही सदा नादुरुस्त, त्यामुळें वैतागून अथवा पुत्राशीं भांडून तिनें रामेश्वर, काशी वगैरे ठिकाणीं पुष्कळ काळ कंठिला. काशींतून ती परतच येत नव्हती, तेथें कलागती वाढल्या, त्यांचा परिणाम राजकारणावर होऊं लागला. काशीताई रामेश्वरच्या यात्रेस बहुधा बाबूजी नाईक कर्नाटकांत असतां गेली ती ता. २८ मे, स. १७४२ रोजीं यात्रा करून पुण्यास परत आली. लगेच ती काशीयात्रेस गेली असें दिसतें. नानासाहेब स. १७४२ च्या पावसाळ्यांत बुंदेलखंडांत छावणीस असून पुढील सालारंभीं तो काशी, प्रयाग, गया या यात्रा करून आला, त्या वेळीं काशीताई बरोबर जाऊन ती दोन तीन वर्षें काशीसच राहिली. " मातुःश्री ताई वाराणसींत सुखरूप आहेत. गयेस गेली होती, आली असतील " असें वर्तमान ता. २४ फेब्रुवारी, स. १७४३ च्या पत्रांत आहे. " मातुःश्री गयाश्राद्ध करून श्रीप्रयागास आली. प्रयागीं मकरस्नान संपादिलें. शिमगी पूर्णिमा करून देशास चालणार " असें वर्तमान ता. २३ फेब्रु., १७४७ च्या हिंगण्याच्या पत्रांत आहे. या पत्रांत हिंगणे आणखी कळवितो कीं " सफदरजंगाचे दरबारी वर्तमान आलें कीं मातुःश्री पुत्राशीं अजुर्दा आहेत, म्हणून वाराणसीसच राहूं म्हणतात. हे गोष्ट नबाबांनीं आम्हांस पुसली. आम्हीं विनंती केली, गोष्ट फटकाळ आहे. हे स्थलें ऐसीं आहेत कीं हिंदु होऊन क्षेत्र सोडावें ऐसा हेत होत नाहीं. जागांजागां ऐसीं वर्तमानें आहेत." यावरून बाई पुत्राशीं भांडून बाहेर राहते असा प्रवाद त्या वेळीं उठला होता.

¶ रा. खं. ६. १७१.

हें खरें. ' मातुःश्री व चि० बया कार्तिकस्नानाकरितां श्रीकाशींत आहेत ' असा उल्लेख ता० ८ नोव्हें०, स. १७४२ च्या पत्रांत आहे. मिळून पांच वर्षे काशीबाई यात्रेंत होती असें दिसतें.

बाईचा भाऊ कृष्णराव बरोबर होता, तो गृहस्थ वाह्यात भलतींच कुलंगडीं करणारा असल्यामुळें यात्रेच्या कामांत विघ्नें उत्पन्न झालीं. हिंगणे पेशव्यास लिहितो, " वाराणसीहून बळवंत सिंगाचें लिहिलें आलें कीं दशाराम जमीनदारास मातुःश्री कबिल्या सुद्धां घेऊन चालली आणि आम्हांस सांगून पाठविलें कीं यास अर्धे राज्य देणें, नाहीं तर फौज उतरेल. बादशहांनीं बळवंतसिंगास कळविलें, माझीच मातुश्री जाणून त्यांचें साहित्य करणें. तुमचीं चार माणसें मारलीं तरी हरगीज न बोलणें. माझ्या म्हटलियावर माझे घरांत आली. त्यावर वर्तमान सफदरजंगास आलें कीं कृष्णराव यांणीं कागद गंगा प्रवाह केले आणि मन मानेसें बोलले. जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे." अशा या प्रकरणांवरून काशीताईची दीर्घकालीन काशीयात्रा बरीच भानगडीची झाली. वरच्यासारखाच मजकूर विश्वनाथनगरीहून लिहिलेला आढळतो तो असा. " मातुश्रीताई येथें येतांच त्यांस जागा राहावयास बळवंतसिंगानें राजमंदिरीं करून दिल्हा. पुढें घोडीं चोरीस गेलीं त्यावरून मातुश्री ताईची नालीस बळवंतसिंगानें मनसूरअलीखानास लिहून पाठविली जे फौजेकडून शहरांत लोकांशीं कजिया करितात. त्यावरून नबाबानें लिहून पाठविलें गयेस जावयास बिदा करणें." पुढें नोव्हेंबरांत " मातुःश्री ताई मजल दरमजल गयेस आली."

" गयेस जाऊन यात्रा तीस चाळीस हजार जमा जाली. सर्वांचें गयावर्जन होऊन प्रयागास येतों. मातुश्रींनीं विचार केला आहे कीं एक वर्षपर्यंत आपण श्रीमध्यें राहवें. मातुश्रींस बहुता प्रकारें आम्ही सांगतों परंतु चित्तांत येत नाहीं. इलाज करून प्रयागापावेतों आली तरी घेऊन येतों. तेथून देशास येतीलसें दिसत नाहीं. श्रीमध्यें राहणें तरी मनसूरअलीखानाचे सलुखाखेरीज राहणें कैसें होईल!" अशी अडचण विसाजी दादाजी बाईचा कारभारी यानें रामचंद्रबावास लिहिली. प्रयागास आल्यावर तेथून तर बाई पुढें निघेचना. " तेव्हां कृष्णरावांनीं आतिशय केला कीं तुम्ही जर यमुना उतरत नाहीं तरी आपण त्रिवेणींत जीव देतों. असें म्हणोन डेऱ्यांतून निघोन गंगातीरीं गेले. समागमें स्त्रीस घेऊन गेले. मातुश्रींनीं डेऱ्यास जाऊन राहविलें. निदान

काल्पीच्या घांटापावेतों चला इतकें ठरविलें. उद्यां कूच करून पुढें जाणार, असें पुढील पत्रांत लिहिलेलें आहे.

रामचंद्रबाबा व गंगोबातात्या बुंदेलखंडांत होते त्यांस खुद्द काशीबाई लिहिते, "मला संकट पडलें आहे, माझ्या चित्तांत काशींत दोनचार महिने राहावें, परंतु हे उभयतां मला बळेंच ओढून काढितात. तरी माझें जाणें काशीस होय ते गोष्ट करणें." कृष्णराव चासकर पेशव्यास लिहितो, "मातुःश्रीताईचें शरीर बहुत सूक्ष्म जालें आहे." शेवटीं ता. २८ मार्च, स. १७४७ चें काशीबाईचें पत्र सिरोंजहून आलें त्यांत मजकूर, "उदईक स्वार होऊन नर्मदातीरीं येतों." "मातुःश्रीस पायाच्या व्यथेनें फार बरें वाटत नाहीं," असा मजकूर दुसऱ्या पत्रांत आहे. ही पायाची व्यथा फार दिवस चालली. पुष्कळ ठिकाणचे वैद्यही बोलावण्यांत आले. ही बाई ता. १८ ऑक्टोबर, स. १७५३ रोजीं सासवेच्या पश्चात् सहा महिन्यांनीं पुण्यास मृत्यु पावली. असा या काशीताईच्या यात्रेचा प्रपंच अनेक पत्रांत विखुरलेला आढळतो.

काशीताई यात्रेंत असतांच खालील प्रकार घडलेला स्मरणीय आहे.

काशी-प्रयाग क्षेत्रांसंबंधानें पेशव्याचा अभिमान जाणून मुसलमानांनींही प्रत्यक्ष आपला ताबा न सोडतां शक्य तितकें यात्रेकरूंना प्रेमानें वागविण्याचा प्रघात ठेविला, तेणेंकरून हिंदूंना आग्रहास पेटण्याचें कारण उरलें नाहीं. ता. ११ फेब्रुवारी, स. १७४६ रोजीं नारायण दीक्षित पेशव्यास लिहितो, "यंदां आम्ही श्रीप्रयागास अनुष्ठान व ब्राह्मणसंतर्पणासाठीं गेलों होतों. समागमें श्रीकाशीचें दहा सहस्र मनुष्य आलें. तमाम माघमास मकरस्नानें जालीं. देशींची यात्राही बहुत आली. मीर्झा महंमद इसाक यांनीं सन्मान उत्तम प्रकारें केला. रघुराव नामें वकील बंगाल्यास जावयास बापूजी श्रीपत कडील बाबूराव प्रयागास आले, त्यांनीं लबाडी बहुत केली. यात्रेकरांजवळून चित्तास येईल तें घेतलें. प्रयागवळ रडतात, डोई फोडतात." हिंदूंचे हे उपद्व्याप आपण लक्षांत घ्यावे. राजकारणांत ढवळाढवळ करण्याइतकी ऐपत काशीबाईत नव्हती. परंतु पुण्यांत विशेष चहा होत नसल्यामुळें, बरीचशी यात्रा जमवून एक प्रकारची शिष्टाई मिरवावी एवढाच तिचा हेतु दिसतो. एकंदरींत या बाईचें कर्तृत्व विशेष झळकलें नाहीं.§

§ या काशीयात्रेचे आधार. रा. खं. ६. १६३,१६९।१; पे. द. २.१,२; पे. द. १८.१३४–१४०,१५२,१५८; पे. द. २०.२८; पे. द. २७.२७; पे. द. ४०. ३७–४२, ४४, ४७. ४९, ५०

उत्तरेंतील कारभाराची व्यवस्था लावीत असतां, पेशव्याला दक्षिणेकडे कसें व्यवधान उत्पन्न होत होतें हें आंगऱ्यांच्या प्रकरणावरून निदर्शनास येतें. आंगरे बंधूंचा हा प्रकार शेवटीं अपायकारक झाला, त्याचा उपक्रम पुढील कलमांत दाखविला आहे.

**९ आंगरे बंधूंचा विकोप.**—संभाजी आंगरे सरखेल ता. १२ जानेवारी, स. १७४२ रोजीं मरण पावला, तेव्हां सरखेल पद कोणास द्यावयाचें हा प्रश्न पडला. यापूर्वीच आंगऱ्यांच्या दौलतीचे दोन विभाग करून संभाजी वडील बंधु त्याची स्थापना सरखेल म्हणून विजयदुर्गास व मानाजी धाकटा त्याची स्थापना वजारतमाब म्हणून कुलाब्यास करण्यांत आली होती. अशा रीतीनें संस्थानाचे विभाग करणें श्रेयस्कर नव्हतें, पण पेशव्यांस आंगऱ्यांवर आपला शह बसविण्यास ही योजना सोइस्कर वाटली. संभाजीच्या मृत्यूनंतर आपण वडील, आपणास सरखेली मिळावी अशी खटपट करण्यासाठीं मानाजी साताऱ्यास महाराजांच्या भेटीस गेला. महाराजांनीं कळविलें, अंजनवेल व गोवळकोट हीं दोन महत्त्वाचीं स्थळें जो कोणी सीद्याचे कबजांतून सोडवून घेईल त्यास आम्ही सरखेली देऊं. आज इतकीं वर्षें तीं स्थळें सोडविण्याचा उद्योग चालला असून अद्यापि तीं सुटूं नयेत हें आम्हांस मोठें लांछन होय. मानाजीच्या बोलींत यमाजी शिवदेव मध्यस्थीस होता. पुढें तीं स्थळें सोडविण्याचें साहस तुळाजीनें पत्करिलें, यमाजी शिवदेवानें हमी घेतली, तेव्हां सरखेलीचें पद शाहूनें तुळाजीस दिलें. सन १७४३ त तुळाजीला सरखेल नांवानें संबोधिलेलें आढळतें.† साताऱ्यास असतां मानाजीनें पेशव्याच्या व रामाजी महादेवाच्या विरुद्ध आपल्या तक्रारी छत्रपतीकडे लेखी रुजू केल्या, त्यांत पालगड, मीरगड, उरण, हीं आपलीं स्थळें पेशव्यानें घेतलीं ही तक्रार

† रा. खं. ६.१५३, .१६८, पे. द. २८.४,५. तुळाजीस सरखेली कधीं मिळाली त्याचें गमक वाईकर वैद्य घराण्याच्या कागदांत आढळलें. त्याची मुद्रा पुढीलप्रमाणें आहे: "श्रीशाहूनृपहर्षेण, कान्होजी तनुजन्मनः तुलसिंहस्य मुद्रेयं प्रकर्षेण विराजते." या मुद्रेत तो आपणांस सरखेल म्हणत नाहीं, म्हणून ती मुद्रा असलेले कागद सरखेली मिळण्याच्या अगोदरचे होत. वरील मुद्रेंतील दुसऱ्या चरणाचे ऐवजीं, 'सरखेल-समुन्नतेः' असें वाक्य ता. ३१ जानेवारी, स. १७४३ व त्यापुढील कागदांत आढळतें, त्यावरून स. १७४३ च्या आरंभीं त्याची समुन्नति सरखेलीवर झाली हे सिद्ध होतें. म्हणजे संभाजीच्या पश्चात् एक वर्ष सरखेल पद रिकामें होतें.

मुख्य होती.§ पण या तक्रारींचें निराकरण शाहूकडून होऊं शकलें नाहीं. पुढें महाराजांनीं तुळाजीस सरखेल पद देऊन फत्तेसिंग भोसल्याचें पथक व जिवाजी खंडेराव चिटणीस यांस फौज, सामान व खजिना देऊन तुळाजीकडे रवाना केलें. ता. २३ जाने०, स. १७४५ रोजीं दोन्ही स्थळें तुळाजीनें काबीज केलीं, तें वर्तमान ता. २७ रोजीं त्यानेंच लिहून पाठविलें तें असें :—

" राजश्री बाळाजी रघुनाथ गोसावी यांसी अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य, स्नो. तुळाजी आंगरे सरखेल रामराम उपरी विशेष. अंजनवेलीस मोर्चेबंदी केली होती त्यास माघ शुध २ सौम्यवारीं आरमारावरी खासा चढोन व खुस्कीनें जमावसहवर्तमान हल्ला करून दोन तास दिवसा किला फते केला, हें तुम्हांस कळावें म्हणोन लिहिलें असे. अंजनवेली फते केली हें वर्तमान गोवळकोटास कळलियावरी सीदी याखुद गोवळकोटीं होता तो दाहा लोकानिशीं पळोन गेला. मागें कोटांतील लोक होते त्यांणीं चिपळूणकर गडीमध्यें होते त्यांसी मायावी विचार सांगोन त्यानें निशाण, लोक व बंधे कांहीं घेतले होते. आमचें आरमार लोक गोवळकोटास रवाना केले त्यांहीं एक भला माणूस पाठविला कीं तुम्हीं (नि) शाण चढविलें बरें उत्तम केलें. त्यास दोनशें माणूस आमचें वर घेणें म्हणून सांगोन पाठविलें. त्यांनीं वरून हाक मारून सांगितलें कीं तुम्ही किलाखालीं न येणें. आणि वरून भांडियांची मारगिरी व बंदुखांचा मार आमचे लोकांवरी केला, त्याणें आमचे लोक दाहापांच जखमी होतांच हला...दोन प्रहरीं करून केला. तेरा चौदाशें माणूस होतें तें पाणी भरवण केलें. भृगुवारीं गोवळकोटही दोन प्रहरां फते केला, हें संतोषाचें वर्तमान तुम्हांस कळावें म्हणून लिहिलें आहे. तुम्ही आमचे दरबारी आहां. तरी दरबारचें वर्तमान वरचेवरी लिहून पाठवीत असलें पाहिजे. येविशीं बहुत काय लिहिणें. लोभ असो दिल्हा पाहिजे. रा। छ. ४ माहे मोहरम (लेखनसीमा)†

वर्तमान ऐकून महाराज संतोषी झाले. किल्ल्यांचीं नांवें गोपाळगड व गोविंदगड ठेविलीं. पुढें ३ मे, स. १७४७ रोजीं तुळाजीनें साताऱ्यास जाऊन महाराजांची भेट घेतली. "प्रतिनिधींनीं सामोरे जाऊन तुळाजीस महाराजांकडे

§ इ. सं. पे. द. पृ. १५२

† शुक्रवार माघ शु० ४ शके १६६६ ता. २५ जानेवारी, १७४५ चें बाळाजी रघुनाथ वैद्य तुळाजीचा वकील शाहूजवळ साताऱ्यास होता त्यास हें पत्र. दुसरीकडे छापलें नसल्यानें येथें समग्र दिलें आहे. रा. शं. ल. वैद्य यांजकडून.

आणिलें. वाघाजवळ आलियावर राजश्री पुढें गेले. तुळाजीनें येऊन पायांवर डोकी ठेविली. मोहरा नजर केल्या. सोन्यारुप्याचीं फुलें उधळलीं. राजश्रींनीं चादर अंगावर घातली. नंतर वाड्यांत येऊन थोरल्या धनिनीचे देवडीवर जाऊन बसले. सांगून पाठविलें, मी रुबरू पायांवर डोकी ठेवणार. बाईस संतोष जाला. महाराजांची परवानगी आणिली. परंतु महाराज मनांत थोडकेसे चिडले. तुळाजींनीं रुबरू जाऊन बाईच्या पायांवर डोकी ठेविली. तदुत्तर धाकट्या देवडीस गेले. चादर व विडे धाडून दिधले. समक्ष भेट घेतली नाहीं." अशा रीतीनें तुळाजीचा बाह्य सत्कार भरपूर झाला, पण आंगरे बंधूंचा बंदोबस्त त्यांच्या मर्जीप्रमाणें घडून आला नाहीं.

तुळाजी आंगरे याची दर्पोक्ति त्याच्या पुढील उद्गारांत व्यक्त होते. "यमाजीपंत व अंताजी शिवदेव सातारां आले, खालीं धामधूम करावयाची खबर आहे म्हणोन लिहिलें तरी खालीं धामधूम करणें हीं कामें भले मर्दांचीं आहेत. ज्यांचे ज्यांचे मनोदय असतील त्यांनीं आपला निशा करून घ्यावा. येविशीं कोणास गणणेंतही आणीत नाहीं. तशाहीमध्ये या प्रांतीं प्रजा म्हणावी तरी भूदेव समोह, ‡ वरकड किल्ले कोटांचा विचार जगप्रसिद्ध आहे," (ता. १२.६.१७५५).

ता. ११.३.४५ च्या पत्रांत तुळाजी लिहितो,—"रा येसाजी भोसले जमाव करून महिमतगडच्या घांटेखालीं उतरोन उपद्व्याप करावयाचा योजिला होता, त्यास रा स्वामींनीं व सकलसौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेबांनीं येसाजी भोसले यास आणावयास रा घनबास पाठविले म्हणोन लिहिलें, त्यास त्यांनीं येऊन करणें काय ते कळतच आहे, व आल्यास परिणाम लागोन निभावणी होईल हा विचार येणारांनीं पाहवा होता. ऐसें असोन येते तर सहजच आदरास प्रतिआदर करावा लागता. स्वामींनीं जमाव फिराऊन नेला बहुत उत्तम. इकडेस वळवळेस प्रवर्तेल त्याचें पारिपत्य होईल." †

पेशव्याची वृत्ति आंगऱ्यचा पिच्छा पुरविण्याची कशी होती याचें प्रत्यंतर माणिकगडच्या प्रकरणांत दिसून आलें. पनवेलच्या नाक्यावरचा हा मानाजीचा किल्ला रामाजी महादेवानें भेद करून ता. २८ मे, स. १७४८ रोजीं हस्तगत केला. त्यामुळें चिडून मानाजी ताबडतोब महाराजांच्या भेटीस साताऱ्यास गेला. सगुणाबाईनें मानाजीचा पक्ष घेऊन पेशव्याविरुद्ध प्रचंड गिल्ला

‡ बामणांचा घोळका. † वैद्य दप्तर पो.

केला. मानाजीचा मुक्काम साताऱ्यास असतां त्याच्या साहसाची परीक्षा सहजगत्या घडून आली. महाराजांनीं त्यास हत्ती बक्षीस दिला. तो बेफाम होऊन ठाणावरून सुटून नाश करीत चालला. कोणासही आवरेना. मानाजीनें जाऊन त्यास पकडून ठाणावर आणिलें. मानाजीची मोठी वाहवा झाली, पण पेशव्याच्या माहुतांची व त्याची शिवीगाळ होऊन मारामारीपर्यंत पाळी आली.

माणिकगड पेशव्यास पचला नाहीं. किल्ला मानाजीस परत देण्याचा हुकूम ता. २४ जुलै, स. १७४८ रोजीं पेशव्यानें स्वहस्तानें रामाजी महादेवास लिहून पाठविला. यासंबंधाचे कागद अभ्यसनीय आहेत. §

मानाजीचें माणिकगड प्रकरण मिटण्यापूर्वींच तुळाजी अनावर झाला. स. १७४७ अखेर तुळाजी आंगऱ्यानें मुडागड किल्ला कबजांत घेऊन कोंकणांत व वरघांटी विशाळगडकर प्रतिनिधि, बावडेकर पंतअमात्य भगवंतराव, वाडीकर सावंत व पेशवे यांच्या मुलखांत मोठा प्रळय उडवून दिला. मुडागड किल्ला सह्याद्रीचे माथ्यावर काजिर्डा घांटाचे तोंडाशीं आहे. वरील सत्ताधीशांनीं आपापल्या फौजा जमा करून मुडागडावर चाल केली. नारो रायाजी ठाकूर गोंडे हा प्रतिनिधींचा सरदार या मोहिमेंत मुख्य असून त्यानें कसून मेहनत करून मुडागड काबीज केला. तुळाजीचा भाऊ येसाजी ऊर्फ आपाजी आंगरे हा वरील सत्ताधीशांस सामील होऊन तुळाजी विरुद्ध लढला. असा सर्वांनीं मिळून जोराचा प्रयत्न केल्यामुळेंच तुळाजीचा पाडाव होऊन तो शरण आला. स. १७४८ च्या जानेवारीपासून मार्चपर्यंत ही मोहीम व अनेक लहानमोठे संग्राम झाले. ता. १ एप्रिलच्या पत्रांत या संग्रामाची पेशव्यास लिहून आलेली हकीकत आहे ती अशी :–“ मुडागड स्वामींनीं वसविला होता, तो मागती पडला. त्यावर तुळाजी आंगरे यांणीं गड बांधोन वसाहत केली. तेथून स्वाऱ्या करून तमाम पन्हाळे प्रांताची जागा मारली. बहुतच धामधूम केली. प्रळय आरंभिला. त्याजवर बावडेवाले भगवंतराव, विशाळगडकर प्रतिनिधि, वाडीकर सावंत व आपाजी आंगरे सर्व एकत्र होऊन पांचशें स्वार व आठहजार पायदळानशीं मुडागडास जाऊन गड घेतला. राजापूरपासून संगमेश्वरपावेतों मुलख जाळून फस्त केला. अनायासें तुळाजीस जरब पोचली. आपाजी आंगरे

§ पे. द. २४. ४६—५२, ३९; ऐ. प. ८०; ना. रो. १.३४.

याचें उर्जित करणें स्वामीस अगत्य आहे. तुळाजी आंगरे वर्षप्रतिपदेस स्वामींचे भेटीस येणार होते.$

मुडागडावर तुळाजी आंगऱ्याचा युद्धप्रसंग चालू असतांच पेशव्याचा युद्धप्रसंग मानाजीशीं चौलच्या राजकोटावर झाला. चेऊलचें बंदर मूळचें पोर्तुगीझांचें, वसई पडल्यावर त्यांनीं तें इंग्रजांस दिलें, पण तें आपण हस्तगत करावें अशी इच्छा पेशव्यास झाली. मानाजी आंगऱ्याचीं स्थळें माणिकगड वगैरे पेशव्यांनीं घेतलीं तेव्हां तो पेशव्याशीं विरोध करून चौल येथें पोर्तुगीझांचे आश्रयास गेला. रामाजी महादेवानें पोर्तुगीझ व इंग्रज या दोघांशीं लढून "चेऊलचे राजकोटास मोर्चेबंदी केली. ता. १५ जानेवारी स. १७४८ रोजीं अस्तमानीं कोट व मशीद स्वामींचे प्रतापें करून फत्ते जाली. कोट व मशीद पाडून टाकावा. आतां मानाजी आंगरे वळवळ न करितां स्वस्थ राहून पुढें सुरतेवरी येतील." § राजकोटच्या लढाईतसुद्धां येसाजी ऊर्फ आपाजी आंगरे पेशव्याचे बाजूनें लढला. अशा रीतीनें मानाजी व तुळाजी यांचें वैर पेशव्यांशीं उत्तरोत्तर वाढत गेलें त्याचा परिणाम काय झाला तें पुढील भागांत कळून येईल.

---

$ पे. द. २४.२०, २५, २८, २६; Mr. Gode's paper on the Battle of Mudagad, Journ., Univ. of Bombay.

§ पे. द. २४.२१, १३३, १३४, १३५.

## ५

# कर्नाटक राजकारणाचा आरंभ

## कालसूची

| | | |
|---|---|---|
| १७३६ | | चंदासाहेबानें त्रिचनापल्ली घेतली. |
| १७३९ | | तंजावरास प्रतापसिंह राज्यारूढ. |
| १७४० | जाने. | मराठी फौजांचें प्रयाण कर्नाटकांत. |
| ,, | मे २० | दमलचेरीची लढाई, दोस्तअली मृ. |
| ,, | ,, २५ | सफदरअलीनें जनानखाना व खजिना पांदिचरीस पाठविला. |
| ,, | जून | रघूजी अल्पकाळ पेशवाईचे खटपटीसाठीं सातान्यास. |
| ,, | नोव्हें. १७ | रघूजीचा सफदरअलीशीं तह. |
| १७४१ | जाने. १६ | तंजावरकर प्रतापसिंह व रघूजी यांचा तह. |
| ,, | मार्च २६ | रघूजीनें त्रिचनापल्ली काबीज केली; मुराररावाचे ताब्यांत दिली; चंदासाहेब व त्याचा वडील पुत्र यांस सातान्यास रवाना केलें, तेथें स. १७४८ पावेतों कैदेंत राहिले. |
| ,, | जून २७ | रघूजी व फत्तेसिंग भोसले स्वारी आटपून सातान्यास परत आले; त्यांची व महाराजांची भेट. |
| १७४२ | आक्टोबर | मूर्तजाअलीनें सफदरअलीचा खून करून नबाबी स्वीकारली. |
| १७४३ | मार्च | निजामुल्मुल्क आरकाट येथें दाखल. |
| ,, | ऑगस्ट | इंग्रज-फ्रेंचांकडून निजामाचा सत्कार. |
| ,, | ,, | बाबूजीनायकास शाहूनें कर्नाटकचा मामला दिला. |
| ,, | ,, २३ | मुराररावानें त्रिचनापल्ली निजामाचे हवालीं केली. |
| १७४४ | मार्च ३१ | बंगाल्यांत भास्कर रामाचा खून. |
| ,, | साल अखेर | बाबूजी नाईक कर्नाटकावर चालून गेला. |

| | |
|---|---|
| १७४५ फेब्रु. | बसवापट्टणजवळ मुजफ्फरजंगानें बाबूजी नाइकाचा पराभव केला. नाईक अप्रतिष्ठेनें परत आला. |
| ,, मे २६ | साताऱ्यास बाबूजीनें महाराजांची भेट घेतली. |
| १७४६ जुलै २३ | बाबूजीनें निजामाची भेट घेतली. |
| ,, नोव्हें. १६ | निजामाची प्रकृति बिघडली. |
| ,, डिसें. ५ | पेशव्यानें सदाशिवरावास कर्नाटकांत रवाना केलें. |
| १७४७ | बाबूजी व आबाजी नाइकाचा त्रागा, विषप्राशन. |
| १७४८ मे २१ | निजामुल्मुल्क मृ. |

५

# कर्नाटक राजकारणाचा आरंभ

१ पूर्ववृत्तान्त — २ रघूजीची मोठी स्वारी — ३ निजामाचा मराठ्यांस शह — ४ बाबूजीचे पाय ओढले — ५ सदाशिवरावाची सावरासावर

१ **पूर्ववृत्तान्त.**—कर्नाटक शब्दाची व्युत्पत्ति अनेक प्रकारें लावितात. काळ्या मातीनें सुपीक बनलेला प्रदेश, किंवा सुगंधी पुष्पांचा प्रदेश असा त्या शब्दाचा अर्थ कानडी संशोधकांनीं प्रतिपादिला आहे. व्युत्पत्ति कांहींही असली तरी प्रस्तुत विषयाच्या विवेचनांत कर्नाटक म्हणजे कन्नड किंवा कानडी भाषेच्या व्याप्तीचा प्रदेश असा सामान्य अर्थ समजण्यास हरकत नाहीं. कृष्णानदीच्या दक्षिणेस या प्रदेशाची सुरुवात होते. हिंदुस्थानच्या द्वीपकल्पांत पूर्वेस व पश्चिमेस पर्वतांच्या रांगा असून, पश्चिम रांगेस सह्याद्रि व पूर्वेकडील रांगेस बालाघाट म्हणतात. बाला म्हणजे उंच व पाइन म्हणजे सखल या फारशी संज्ञा त्या वेळीं प्रचारांत होत्या, त्यांस अनुसरून बालाघाट व पाइनघाट हे शब्द पूर्व किनाऱ्याकडील प्रदेशास वापरीत.

मद्रास इलाख्यांत चार भाषा चालतात. उत्तरेस तैलंगी भाषेच्या प्रदेशास तैलंगण, दक्षिणेस तामील भाषेच्या प्रदेशास द्रवीड देश, आणि पश्चिमेस घांटाखालील प्रदेशास मलबार अशा संज्ञा आहेत. हे तीन प्रदेश सोडून मधला भाग तो कर्नाटक, अर्थात् बेळगांव, धारवाड, विजापुर आणि हैदराबाद पैकीं गुलबर्गा हे जिल्हेही कर्नाटकचेच भाग होत. प्राचीन काळीं दक्षिण हिंदुस्थानांत प्रबळ हिंदु राज्यें विद्यमान होतीं, त्या वेळीं जमाबंदीच्या कामावर ठिकठिकाणीं अंमलदार नेमण्यांत आले, ते, तीं राज्यें नष्ट झाल्यावरही आपलीं वंशपरंपरागत वतनें सांभाळून राहिले, आणि त्यांस पाळेगार म्हणजे संस्थानिक ही संज्ञा प्राप्त झाली. या पाळेगारांपैकींच कांहींना देसाई असें म्हणण्याचा प्रघात पडला. महाराष्ट्रांतही असे देसाई अगर देशमुख होतेच, परंतु शिवाजीचें राज्य स्थापन झाल्यापासून, इकडे या देशमुखांची सत्ता नष्ट होत गेली. कर्नाटकांतील पाळेगार व देसाई यांजबरोबर मराठ्यांचे वारंवार झगडे झाले; परंतु त्यांचा समूळ उच्छेद पुढें हैदर व टिपू

यांनीं केला. महाराष्ट्रांतच औरंगजेबास जबरदस्त आडकाठी झाल्यामुळें, मुसलमानांची सत्ता अखिल कर्नाटकावर कधींच स्थापली गेली नाहीं. हे पाळेगारच बहुतेक प्रदेशावर अंमल गाजवीत, आणि तसाच कोणी शत्रु चालून आला तर तेवढ्या वेळेपुरते ते त्यास शरण जाऊन खंडणी वगैरे देत. आपसांतही त्यांचे झगडे बहुधा सारखे चालू असत.

शहाजी व त्याचा पुत्र शिवाजी यांनीं कर्नाटकांत मराठ्यांची सत्ता प्रथम स्थापन केली. त्यांनीं जुन्या किल्ल्यांचा उद्धार करून कित्येक नवीन बांधिले. औरंगजेबानें कांहीं भागांवर आपली सत्ता बसविली. दक्षिणेंत मोगलांच्या सत्तेखालील प्रदेशाचे सहा सुभे पुष्कळ दिवसांपासून त्यांनीं पाडिलेले होते, ते १ खानदेश, २ वऱ्हाड, ३ औरंगाबाद, ४ बेदर, ५ हैदराबाद किंवा गोवळकोंडें व ६ विजापुर हे होते. पैकीं शेवटच्या दोन सुभ्यांचा विस्तार फार झाला. कारण मोगलांनीं कर्नाटकांत जितका नवीन प्रदेश जिंकिला, तितक्या सगळयाचा समावेश हैदराबाद व विजापुर या दोन सुभ्यांत ते करीत गेले; आणि एकास हैदराबाद कर्नाटक व दुसऱ्यास विजापुर कर्नाटक अशीं नांवें त्यांनीं दिलीं. निजामुल्मुल्कनें इकडे स्वतंत्र पंथ काढिला, तेव्हां या सहा सुभ्यांचें राज्य त्याच्या ताब्यांत गेलें. सुभ्यांचे हाताखालीं मुल्की व फौजदारी कामाकरितां बादशहानें ठिकठिकाणीं आपले अधिकारी नेमिले, तेच पुढें बलाढ्य होऊन वंशपरंपरागत नबाबी चालवूं लागले. कर्नाटकांत असे पांच नबाब अठराव्या शतकांत विशेष सामर्थ्यवान होतें, ते आरकाट, शिरें, कडपें, कर्नूळ व सावनूर या ठिकाणचे होत. आरकाटच्या नबाबाचें राज्य कर्नाटक बालेघांटावर होतें. विजापूरच्या सुलतानांकडून शहाजीस कर्नाटकांत जागीर होती, तिचा समावेश शिऱ्याचे हद्दींत होत होता. शिरें, होसकोटें, कोलार, बाळापुर व बंगळूर हे पांच परगणे शहाजीच्या जागिरीचे होते. सावनूरच्या नबाबाचें राज्य बरेंच विस्तृत असून, त्याचा अंमल बहुतेक कृष्णा व तुंगभद्रा या दोन नद्यांमधील टापूवर होता. यांशिवाय आणखी कित्येक लहान मोठीं संस्थानें कर्नाटकांत बहुधा स्वतंत्रसारखींच नांदत होतीं, तीं म्हैसूर बिदनूर, चित्रदुर्ग, हरपनहळ्ळी, अनागोंदी व रायदुर्ग हीं होत. पैकीं कर्नाटकाच्या दक्षिणार्धात म्हैसूरचें राज्य असून बाकीचीं उत्तरार्धांत होतीं. त्यांत बिदनूर हें पश्चिम घाटाच्या सरहद्दीवर बरेंच मोठें संस्थान होतें. घांटाच्या खालीं सोंधें संस्थान होतें, त्याचाही थोडा बहुत अंमल घांटावर

होता. निजाम स्वतंत्र झाला, त्या सुमारास तंजावरचें संस्थान व घोरपड्यांनीं स्थापिलेलें गुत्तीचें संस्थान हीं दोन मराठ्यांचीं संस्थानें कर्नाटकांत होतीं. गुत्तीकराच्याच ताब्यांत गजेंद्रगड व सोंडूर हे किल्ले होते. गुत्तीचा मुराररराव पराक्रमी निघाला. पंनास वर्षें पावेतों कर्नाटकांतील निरनिराळ्या सत्ताधीशांवर त्यानें दहशत बसाविली. सारांश, पेशवाईच्या वेळेस मुसलमान, मराठी व कानडी–अशा तीन निरनिराळ्या सत्ताधीशांचें प्राबल्य कर्नाटकांत असून, त्यांचे आपआपसांतही झगडे सुरू होते.

२ **रघूजीची मोठी स्वारी**—स. १७३७ त शाहूनें मिरजेवर स्वारी आरंभिली, त्याचे वेळीं त्यानें पुढें कर्नाटकांत स्वारी करण्याची आज्ञा रघूजी भोसल्यास केली. "त्रिचनापल्ली, चंदावर, आरकाट, श्रीरंगपट्टण, शिरें, अदवानी, कर्नूळ, कडपें व इतर फूटमहाल तुंगभद्रेपलीकडील यांच्या बंदोबस्ताविषयीं तुम्हांस आज्ञा केली आहे, यांच्या सरदेशमुखीचा व मोकासबाबेचा आकार होईल, त्यामध्यें निंमे तुमचे फौजेचे बेगमीस घेऊन निंमे ऐवज हुजूर पाठविणें. कुसाजी भोसले व तुम्ही एक विचारें वर्तोन शेवट लावणें. स्वामींस तुमचा सर्वस्वी भरंवसा असे." "चंदावरास फत्तेसिंग राजे भोसले यांची रवानगी आहे, त्यांज समागमें हमराह होऊन, तिकडे सरकारचे भाऊबंद आहेत त्यांजला चंदासाहेबाचा उपद्रव होऊन परागंदा झाले, याजकरितां त्यांचें पारिपत्य करावें." या आज्ञेनुसार रघूजी वऱ्हाडचा बंदोबस्त करून चंदावर येथें फत्तेसिंगास सामील झाला.†

कर्नाटकांत नबाब दोस्तअली कारभारावर असतां त्याचा जांवई हुसन दोस्तखान ऊ० चंदासाहेब या हुशार व हिकमती गृहस्थास स. १७३२ पासून प्राधान्य मिळालें. त्यानें लष्करची सुधारणा करून वसूल वाढविला आणि राज्यव्यवस्थेचा अनुभव पैदा केला. फ्रेंचांशीं सख्य जोडून प्रसंगीं त्यांचें साह्य मिळविण्याची तजवीज ठेविली. त्रिचनापल्ली येथें लहानसें हिंदुराज्य होतें, तेथील राणीशीं संधान बांधून स. १७३६ त त्यानें तें राज्य नाहींसें करून त्या धनाढ्य व मजबूद स्थलाचा ताबा घेतला.§ तदुत्तर

† ऐ. प. २६; ना० भो० ब०; रा. खं. ६. १४९

§ त्रिचनापल्ली काबीज करण्यांत चंदासाहेबानें कमालीचें कपट लढविलें. तेथें हिंदु राजा होता, तो स. १७३२ त मरण पावला. संतान नव्हतें. वडील राणी

पुढील पानावर समाप्त

तंजावर व मदुरा याही हिंदु राज्यांचा नाश करून इस्लामीधर्माची प्रतिष्ठा वाढविण्याची हांव त्यानें धारण केली. तंजावरचा राजा शाहूचा आप्त, त्यानें ही सर्व कहाणी शाहूचे कानावर घालून हिंदुधर्माचे संरक्षणाची याचना केली. त्या वेळीं शाहू व बाजीराव यांचा बोलबाला विशेष झाला असल्यामुळें लगेच शाहूनें कर्नाटकची स्वारी ठरवून त्या कामीं प्रथम स्वतः मिरजेवर चाल केली. कर्नाटकची नबाबी मिळविण्याचा घाट चंदासाहेबानें चालविला तेव्हां दोस्त-अलीच्या कुटुंबाचें व त्याचें वांकडें आलें. ही संधि साधून शाहूनें ताबडतोब रघूजी भोसले यास जंगी फौजेनिशीं कर्नाटकांत रवाना केलें; आणि त्रिचनापल्ली काबीज करून चंदासाहेबाचा कांटा काढून टाकावा अशी निक्षून आज्ञा केली. भोपाळ वसईचे संग्राम, नादीरशहाची स्वारी अशीं प्रकरणें बाजीरावा चेहातीं असल्यामुळें शाहूनें त्या वेळीं रघूजीची या कामीं योजना केली.

स. १७४० च्या एप्रिल महिन्यांत मराठ्यांची ही जंगी फौज आरकाट प्रांतांत येऊन दाखल झाली. कडाप्पा व आरकाट या जिल्ह्यांच्या दरम्यान दमलचेरीचा घांट आहे तेथें मराठ्यांस अडवून धरण्याकरितां नबाब दोस्त-अली आपल्या फौजेनिशीं चालून गेला. प्रथम मराठ्यांनीं सामोपचारानें बोलणीं केलीं, परंतु नबाबाकडून त्यांचीं उडवाउडवीचीं उत्तरें आलेलीं पाहून, मराठ्यांच्या दहा हजार स्वारांनीं ता. ९ मे १७४० रोजीं आडमार्गानें येऊन नबाबाच्या फौजेस वेढा घातला. तेव्हां पुढें उभयतांचा हळूहळू सामना होऊन मराठ्यांनीं उत्कृष्ट लगट केली. उभय पक्षांच्या बंदुका व तोफा यांचा सणसणाट चालला. अखेरीस युद्धांत खुद्द नबाब दोस्तअली, त्याचा धाकटा मुलगा हसनअली आणि कित्येक नामांकित सरदार पतन पावले, आणि दिवाण मीरआसद यास कैद करून घेतलें, तेणें करून नबाबाच्या फौजेची

मीनाक्षी कारभार पाहूं लागली, तिच्यावर दुसरे हक्कदार उठले. ही संधि साधून आरकाटचा नबाब दोस्तअली यानें जांवई चंदासाहेब यास फौज देऊन त्रिचना-पल्लीवर पाठविलें. त्यानें राणीचें मन वळवून मी तुमचा सर्व जम बसवून देतों असें आश्वासन दिलें.उभयतांचा स्नेह जमला. कुराणावर शपथा घेववून राणीनें चंदासाहेबास वाड्यांत आणिलें. पुढें हलके हलके त्यानें सर्व शहराचा कबजा घेतला. चंदासाहेबाच्या वचनभंगानें राणी खेद करून मरण पावली. त्याची ही पूर्व कहाणी रघूजी वगैरे मराठ्यांच्या प्रमुखांस पूर्ण अवगत होती. [ मद्रास – इन् – ओल्डन टाइम्स्, तंजावर इ० वाकसकर ]

दाणादाण होऊन मराठ्यांना मोठाच जय मिळाला. ही दमलचेरीची शेवटची लढाई ता. २० मे स. १७४० रोजीं झाली.

मराठ्यांच्या या विजयानें कर्नाटकासंबंधीं निरनिराळे मनोरथ बांधणाऱ्या व्यक्तींचे डोळे साफ उघडले. एकदम चहूंकडे मराठ्यांची छाप बसली. बाजीरावानें उत्तर हिंदुस्थान पादाक्रांत केलें, त्याचप्रमाणें रघूजी दक्षिण हिंदुस्थान काबीज करणार असा संभव लोकांस वाटूं लागला. नबाबाचा पुत्र सफदरअली बापाचे मदतीस त्वरेनें येत होता, तो वरील विपरीत वर्तमान ऐकून बचावासाठीं वेलोरच्या किल्ल्यांत जाऊन बसला. चंदासाहेब त्रिचनापल्लीस होता, तोही नबाबाचे मदतीस धांवून आला नाहीं. मात्र सफदरअली व चंदासाहेब यांनीं मयत नबाबाचें कुटुंब, आपलीं बायकामुलें व एकंदर जडजवाहीर मराठ्यांचे हातीं पडूं नये म्हणून पांदिचरीस फ्रेंचांचे ताब्यांत ठेवून दिलें, ( ता. २५ मे, स. १७४० ). तेथें फ्रेंच गव्हर्नर डुमा अधिकारावर होता, त्यालाही थोडा वेळ हें जोखीम सांभाळण्याचा विचारच पडला, पण लगेच निश्चय करून त्यानें ती सर्व मंडळी व संपत्ति आपल्या आश्रयाखालीं घेतली. मराठ्यांनीं त्वरा करून नबाबाची राजधानी आरकाट काबीज केली, पण तेथील सर्व द्रव्य पांदिचरीस गेल्याचें ऐकून त्यांची मोठी निराशा झाली. लगेच रघूजीनें डुमा यास धमकीवजा पत्र लिहिलें, त्यास डुमानें बाणेदार जबाब पाठवून कळविलें, आम्ही मराठ्यांच्या वल्गनांस भीक घालीत नाहीं. आपला बादशहा फ्रान्स देशांत आहे त्याच्याच आज्ञा आपण पाळूं. असें लिहून त्यानें रघूजीस कांहीं दारूच्या बाटल्या नजर पाठविल्या. हें होत आहे तों बाजीराव मरण पावल्याची बातमी रघूजीस कळून पुढें त्या प्रकरणास निराळें स्वरूप प्राप्त झालें. ‡

बाजीराव मरण पावल्याबरोबर पुढें पेशवाई कोणास मिळणार या चिंतेनें रघूजी ग्रासला जाऊन, पांदिचरीचा कार्यभाग तसाच सोडून तो लगभगीनें अल्पकाळ साताऱ्यास आला. नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें न देतां बाबूजी नायकास द्यावीं असा त्यानें प्रयत्न केला. तो सिद्धीस न जातां ता. २५ जूनला शाहूनें नानासाहेबास वस्त्रें दिली, तेव्हां रघूजी तसाच बाबूजी

‡ या बाबतीचें सविस्तर वर्णन ब्रि० रि० पूर्वार्ध पृ. ४७३–४७६ येथें आहे. दारूच्या बाटल्यांमुळें राजकारण बिघडलें त्यासंबंधाचे शाहूचे उद्गार ऐ. ले. सं. भा. ८ पृ. ४४३९ वरील पत्रांत पाहावे. पु. रो. तु स्वारीचे तपशील आहेत

नाइकासह परत कर्नाटकांत गेला. दरम्यान तिकडेही कांहीं थोड्या भानगडी झाल्या नाहींत. दोस्तअली मृत्यु पावतांच कर्नाटकची नबाबगिरी आपण मिळवावी अशी ईर्षा धरून चंदासाहेबानें स्वतः त्रिचनापल्ली कबजांत घेतली. तो डाव हाणून पाडण्यासाठीं सफदरअलीनें रघूजीचीं आर्जवें चालविलीं. त्याचा दिवाण मीरआसद रघूजीच्या कैदेंत होता, त्याच्या मार्फत वाटाघाट करून सफदरअलीनें रघूजीशीं गुप्त करार केला, (ता. १६ नोव्हें. स. १७४०), तो असा कीं (१) त्रिचनापल्ली काबीज करून मराठ्यांनीं चंदाखानास पकडावें, (२) नबाब सफदरअलीच्या शत्रूंचें निर्मूलन करावें (३) म्हणजे याबद्दल नबाबानें एक कोट रुपये हाप्त्याहाप्त्यांनीं मराठ्यांस द्यावे. शिवाय शाहूच्या आज्ञेप्रमाणें तंजावरच्या राजास निर्भय बनविण्याची सोय करण्यांत आली.¶

या गुप्त तहाची घटना चंदासाहेबास कळतांच भयभीत होऊन त्यानें डुमा यास ती हकीकत कळविली आणि मराठ्यांशीं लढण्याकरितां फ्रेंचांची मदत मिळविली. हिंदी राजकारणांत हात घालण्याचा पाश्चात्यांचा हा पहिला उपक्रम होय. रघूजीनेंही आपल्याकडून युद्धाची तयारी चांगली केली आणि तत्प्रांतीय राजे व पाळेगार यांचें साह्य मिळविलें. सुप्रसिद्ध मराठा वीर मुरारराव घोरपडे व तंजावरकर प्रतापसिंह मोठ्या ईर्षेनें येऊन रघूजीस सामील झाले. तंजावरचे दोन वकील तिमाजी रंगनाथ व गंगापा यांनीं रघूजीस भेटून ठराव केला कीं 'त्रिचनापल्ली घ्यावी, चंदाखानास काढावा, पंधरालक्ष रुपये प्रतापसिंगानें नजर द्यावे, तीन लक्ष राजश्रींस, दोन लक्ष मातुश्रींस, दोन लक्ष फत्तेसिंग व रघूजी भोसले यांस व आठ लक्ष फौजेचे खर्चास,' (१६ जाने. १७४१). तंजावरच्या राजाची सुव्यवस्था लावून देण्याची तळमळ शाहूस कैक वर्षें लागली होती, ती आतां अशा रीतीनें फळास आली. हिंदूंच्या उमेदी त्या भागांत अपूर्वतेनें उद्दीप्त झाल्या.

तंजावरची फौज मदतीस घेऊन रघूजीनें डिसेंबरांत त्रिचनापल्लीस वेढा घातला. हें प्राचीन पवित्र स्थल चंदासाहेबाचे हातून सोडविण्यासाठीं मोठमोठे हिंदु सरदार वीरश्रीस चढून युद्धांत सामील झाले. चंदासाहेबानें तितक्याच निकरानें बचाव केला, पण जवळची सामुग्री संपल्यामुळें अगतिक होऊन त्यानें तहाचें बोलणें सुरू केलें, दरम्यान त्यानें आपला भाऊ बडासाहेब यास

¶ इ. सं. तंजावर प्रकरण.

मदुरेहून निकडीनें मदतीस बोलाविलें. पण तो दाखल होण्यापूर्वीच त्यास मराठ्यांनीं गांठलें आणि त्यास ठार मारून त्याच्या फौजेचा फन्ना उडविला. तेव्हां चंदासाहेबाचा निरुपाय होऊन त्यानें २१ मार्च रोजीं किल्ला मराठ्यांचे हवालीं केला. तो सांभाळण्यास तिकडच्याच बाजूचा कोणी तरी खंबीर इसम पाहिजे हें जाणून रघूजीनें तेथें मुराररराव घोरपड्याची स्थापना केली. शाहूच्या पदरीं सेनापतिपद मिळविण्याची हाव मुरारराावास होती. दाभाडे तर नामशेष झाले होते, पण शाहूला अद्यापि त्यांचें अगत्य असल्यामुळें मुराररावाची मागणी त्यानें मान्य केली नाहीं.

चंदासाहेब वडील पुत्र आबीदअलीसह मराठ्यांचे हातीं पडला, पण त्याचीं बायकामुलें पांदिचरीस फ्रेंचांचे आश्रयास होतीं म्हणून बचावलीं. आपणास दंड घेऊन सोडावें अशी विनंति चंदासाहेबानें रघूजीला केली, पण यास मोकळा ठेवल्यानें केलेला सर्व उद्योग फुकट जाईल असें पाहून त्या उभयतांस रघूजीनें चांगल्या बंदोबस्तानें साताऱ्यास रवाना केलें. तेथें हे पितापुत्र सात वर्षें कैदेंत राहिले. डुप्लेनें स. १७४८ त त्यांस सोडविलें असा जो पुष्कळ लेखकांनीं जाहिराणा केला तो खरा नाहीं. वास्तविक पुष्कळांना हा चंदासाहेब म्हणजे राजकारणी डाव वाटत असून पेशवा व रघूजी यांना त्यासंबंधीं स्वार्थ होता, तसाच, निजाम, डुप्ले, अन्वरुद्दीन इत्यादींना त्याचें महत्त्व निराळें वाटत होतें. सातारा येथें चंदासाहेबाची बर्दास्त सर्व त्याच्या इतमामास शोभेसारखी ठेवलेली असून जाच म्हणून बिलकूल नव्हता. तेव्हां निरनिराळ्या पक्षांकडे संधानें बांधून कर्नाटकची नबाबगिरी पटकाविण्याचा अंतिम हेतु साधण्याकडेच त्याचें सर्व लक्ष होतें. म्हणून वरकरणीं शाहूची मर्जी सांभाळून मराठ्यांचीं धोरणें व कावे त्यानें चांगले समजून घेतले. कर्नाटकीय सत्ताधीशांचे व डुप्लेचे प्रयत्न चंदासाहेबास सोडविण्यासाठीं सारखे चालू झाले. चंदासाहेबानें साताऱ्याहून चहूंकडे राजकारणें खेळवून अंतस्थ संधानें बांधिलीं. रघूजी त्याचा दोस्त बनला. पेशव्यास तर त्यानें मोहिनीच घातली. निजामशाहींत कारस्थानें रचून तेथील परिस्थिति अनुकूल करून घेतली. शाहूला त्याचें इतकें अगत्य वाटलें कीं त्रिचनापल्लीचें प्राचीन हिंदुक्षेत्र कायमचें मराठ्यांचे हवालीं करण्याचें त्यानें लिहून दिलें, तेव्हां पेशव्यानेंच त्याला फौजेचें साह्य करून साताऱ्याहून त्याची रवानगी करून दिली. एवढें सगळें होण्यांत त्याचीं सात वर्षें साताऱ्यांत गेलीं. सुटकेचा दंड असा त्याला

विशेष भरावा लागला नाहीं आणि पैसा त्याजवळ नव्हताही. दोन लक्ष चाळीस हजार रकम त्यानें भरल्याचा उल्लेख आढळतो. स. १७४८च्या मे २१ रोजीं निजामुल्मुल्क मरण पावल्याची बातमी पोंचतांच तो साताऱ्याहून निघाला. डुप्लेकडून द्रव्यसाह्य त्यास मुळींच मिळालें नाहीं. बारा हजार फौजेनिशीं जून महिन्यांत तो कृष्णेवर दाखल झाल्याचा उल्लेख मिळतो. मुज्फरजंगामार्फत त्यानें विजापुर प्रांतांतून कांहीं रकमा पैदा केल्या.‡

बाजीरावाच्या मृत्यूनें मराठ्यांचा धीर खचला नाहीं, उलट त्यांचे पराक्रम पूर्ववत् चमकत राहिले हा प्रकार वरील प्रकरणांत सर्वत्र मशहूर होऊन त्यांची जरब वाढली. मुसलमान शत्रूस त्यांनीं ममतेनें वागवून त्याचा परामर्ष घेतला ही गोष्ट तितकीच व्यक्त झाली. मुसलमानांचे अत्याचार हिंदूंच्या अंगीं प्रगटले नाहींत हेंही विचारवंतांस कळून चुकलें. रघूजी व फत्तेसिंग यांचा सर्वत्र गौरव झाला. 'स्वारींत द्रव्याची पैदासही चांगली झाली. साताऱ्यास येऊन राजदर्शन घेतलें. वर्तमान सर्व निवेदन केलें. चंदावरकर परागंदा झाले होते, त्यांची स्वस्थळीं स्थापना केली याबद्दल बहुतखुषी मानून सेनासाहेबांस बहुमानवस्त्रें देऊन गौरव केला. वऱ्हाडपासून गोंडवण तहत कटकच्या सरदेशमुखीची व मोकाशाची सनद करून दिली.'

मुराररावाच्या हातीं त्रिचनापल्लीचा बंदोबस्त दिल्यानें तिकडचे मराठ्यांचे सहायक निर्धास्त झाले. तंजावरच्या प्रतापसिंहास स्वास्थ्य मिळून त्याचे नेहमींचे व्यवसाय पूर्ववत् चालूं लागले. शाहूच्या दरबारांत व बाह्य लौकिकांत रघूजीची प्रतिष्ठा वाढली. नूतन पेशवा नानासाहेब मात्र थोडासा दुश्चित्त बनला. तथापि मराठ्यांचा उत्कर्ष सहन न झालेली प्रमुख व्यक्ति निजामुल्मुल्क होय. भोपाळचा संग्राम व नादिरशाहाचें आक्रमण या दोन बनावांनीं या व्यक्तीचें अवसान पुष्कळसें खता झालें होतें. त्यांतून तो वर डोकें काढणार तों पुत्र नासिरजंगानें त्याज विरुद्ध बंडावा उभा करून मोठे विघ्न आणिलें, त्याची हकीकत या प्रसंगीं अभ्यासकांनीं लक्षांत आणिली पाहिजे. स. १७४१ त रघूजी चंदासाहेबास रगडीत असतांच निजाम नासिरजंगाचा बंडावा मोडण्यांत गुंतला होता. त्यासालच्या जुलईंत नासिरजंग पाडाव होऊन

‡ Dodwell's Dupleix and Clive, P. 32–36; शिवाय हि० रे० क० च्या त्रिवेंद्रम बैठकींत (स. १९४२) प्रो० श्रीनिवासाचारी यांचा चंदासाहेबावरील महत्त्वाचा लेख पहा.

कैदेंत पडला तेव्हांच निजामास इतर विषयांकडे लक्ष देण्यास फुरसत झाली; आणि रघूजी व पेशवा यांजमध्यें स. १७४२ पासून जी चुरस उत्तरेंत लागली, ती निजामाचे पथ्यावर पडून कर्नाटकांतील मराठ्यांचा उद्योग उखडून काढण्याचें बळ त्यास प्राप्त झालें. चंदासाहेबाची त्यास मोठीशी फिकीर वाटत नव्हती, उलटपक्षीं तो सातारा किल्ल्यावर अडकून पडल्यानें त्याचा एक प्रतिस्पर्धी अनायासें कमी झाला. पण तंजावरचा राजा नवीन उभा राहिला आणि मुरारराव घोरपडे त्याचा पाठीराखा बनला, या दोन गोष्टींनीं कर्नाटकांतील निजामाची सत्ता संपल्यासारखी झाली. औरंगजेबानें जिंकेलल्या या प्रदेशाचे मालक आपण अशा समजुतीनें निजाम आपली मालकी टिकविण्याची शिकस्त करीत होता. रघूजी व पेशवा यांजमध्यें वितुष्ट उत्पन्न करण्यास तो चुकला नाहीं. स. १७४३ च्या आरंभीं बंगाल प्रांतांत त्या दोघांचा बेबनाव झाला, तो त्याच्या पथ्यावर पडला आणि त्या संधीचा त्यानें उपयोग करून कर्नाटकांतील उद्योग हातीं घेतला.

**३ निजामाचा मराठ्यांस शह.**—कर्नाटकचे नबाब निजामाची सत्ता मानीत नव्हते. दोस्तअलीनें निजामास दरसालची खंडणी भरली नव्हती. या खंडणीची मागणी आतां निजामानें सफदरअलीकडे केली. ऑक्टोबर स. १७४२ त सफदरअलीचा चुलतभाऊ मूर्तजाअली यानें त्याचा खून करून आरकाटची नबाबगिरी स्वीकारली. हा बंडावा मोडून पूर्वींची तुंबलेली खंडणी वसूल करावी आणि रघूजीचा बंदोबस्त दूर करून आपला अंमल बसवावा या उद्देशानें निजामानें स. १७४३ च्या जानेवारींत गोवळकोंड्याहून मोठ्या फौजेनिशीं कर्नाटकांत प्रयाण केलें. या वेळीं पेशवा व रघूजी यांचा झगडा बंगाल्यांत चालू असल्यामुळें मुरारराव घोरपड्याच्या मदतीस साताऱ्च्या फौजा जाऊं शकल्या नाहींत. मार्च महिन्यांत निजाम आरकाटला पोंचला. ऐशीं हजार स्वार व दोन लाख पायदळ अशा त्याच्या प्रचंड फौजेपुढें नबाबाचा निभाव लागला नाहीं. आरकाटचा कबजा घेऊन तेथें निजामानें अन्वरुद्दीनची नेमणूक केली आणि त्रिचनापल्ली आमचे हवालीं करा असें आव्हान मुराररावास पाठविलें. संग्राम करून निभाव लागणार नाहीं अशी मुराररावाची खात्री झाली. पुढें चार पांच महिने राजकारण चालून उभयतांचा ठराव झाला कीं गुत्तीची जागीर घेऊन मुराररावानें त्रिचनापल्ली सोडून

द्यावी. अशा रीतीनें मुराररावास काढून निजामानें ता. २९ ऑगस्ट रोजीं त्रिचनापल्लीचा ताबा घेतला आणि तेथें बादशहाचा झेंडा लाविला. ‡ तेथून परत येऊन निजामानें कांहीं महिने आरकाट येथें मुक्काम केला. येथें असतां इंग्रज फ्रेंचांनीं त्याची मर्जी सांभाळण्याकरितां त्यास नजराणे वगैरे पाठविले. त्याच्या अवाढव्य फौजेनें चहूंकडे जरब बसविली. मुलखांतील अस्वस्थतेमुळें पाश्चात्यांचा व्यापार बसला. नातू मुजफ्फरजंग यास अदोनी येथें जागीर देऊन कर्नाटक बालाघाटच्या कारभारावर ठेविलें आणि स. १७४४ च्या फेब्रुवारींत निजाम गोवळकोंड्यास परत आला. दरम्यान मराठ्यांची फौज त्यास अडविण्यास चालून गेली, पण संग्राम घडला नाहीं.

मुरारराव घोरपडे सावध होता, पण निजामापुढें निभाव लागणें शक्य नसल्यामुळें त्यानें त्रिचनापल्ली सोडून दिली, याबद्दल शाहूला भारी खेद उत्पन्न झाला. फत्तेसिंग भोसले व बाबूजी नाईक एवढे दोनच कर्तृत्वहीन इसम या प्रसंगीं त्याजवळ होते, पण त्यांच्या हातून निजामाचा बंदोबस्त झाला नाहीं. बाबूजी नाईकाला रघूजीबरोबर राहून कर्नाटकचा अनुभव मिळाला होता, त्यानें या वेळीं शाहूला गळ घालून कर्नाटकचा उद्योग आपल्या नांवें करून घेतला. § पण आतां त्याला रघूजीचा पाठिंबा नसून उलट पेशव्याचा विरोध व निजामास आळा घालण्याचें सामर्थ्य अंगांत नाहीं, यामुळें त्याची चहूंकडे नाचक्की होऊं लागली. तरी आपल्याकडून त्यानें निजामावर चालून जाण्याची सिद्धता केली स. १७४४ च्या सेप्टेंबरांत साताऱ्यास कर्नाटकासंबंधानें काय प्रकार घाटले त्यांचें विस्तृत वर्णन पुरंदऱ्यानें पेशव्यास कळविलें, त्याचा मतलब असा. * "फतेसिंगबावांचा कारभार व शक्ति प्रसिद्धच आहे. त्यांचें सर्व साहित्य पेशव्यांनीं करून द्यावें तेव्हां हे बाहेर निघणार. त्यांस घरीं राहिल्यानें काय सुख नाहीं, ते बाहेर निघोन हैराण व्हावें! तथापि हे लगामीं असल्यानें कित्येक गोष्टी उपयोगास पडतात. रघूजीबावांस कर्नाटक द्यावें न द्यावें याची चर्चा नाहीं. परंतु आबाजी नायकास पुढें करून रघूजीस आंत घालावें असा महाराजांचा भाव दिसतो. तेव्हां फतेसिंगबावांस त्यांत मिळवायचा उत्पात केलाच पाहिजे. कर्नाटक त्यांचे घरास जाऊं देणें उचित नाहीं. जरूर पाय धरून वोढावे. थोरले वाड्यांतील कर्ज नायकांकडे येणें

‡ इ. सं. ऐ. स्थ. त्रिचनापल्ली पहा. § पे. द. ४०. २८.

* का. सं. प या. ५४. या पत्राची पौ १८ सेप्टें. १७४४ आहे.

आहे त्याचा तगादा करतात; त्यांचें म्हणणें मी कर्ज नायकांस दिल्हें, तेव्हां कर्नाटकचा मामला माझाच आहे. रघूजी धाकटे बाईंचे पक्षाचा, त्यासही तोंडघशीं दिल्हें." यावरून या कामांत निरनिराळ्या पक्षांची चढाओढ कशी चालली होती तें कळून येतें.

कर्नाटकच्या व्यवहारांत मुख्य पक्ष दोन, निजाम व मराठे. तिकडचे सर्वच नबाब कांहीं निजामास अनुकूल नव्हते. बरेचसे प्रसंग पडेल तसें वागून स्वार्थ साधणारे होते. हा प्रदेश कोल्हापुरकर संभाजीच्या कक्षेंतला होता, पण निजामाशीं लढून तो बचावण्याचें सामर्थ्य संभाजीस नव्हतें. प्रतिनिधि, बाबूजी नाईक, फत्तेसिंग व येसाजी भोसले अशा कित्येक आत्मिकांची सोय कर्नाटकांत लावावी ही इच्छा शाहूची होती. पण अंगच्या पराक्रमाशिवाय हे हेतु सिद्धीस जाणारे नव्हते. म्हणून हा डाव पेशव्याचे हातांत गेला. वास्तविक बंगाल्यांत जसा रघूजी तसा कर्नाटकांत मुरारराव घोरपडे बंदोबस्त ठेवण्यास लायक होता, त्यासच पेशव्यानें तिकडचा कारभार सांगितला पाहिजे होता, पण मुरारराव तरी सर्वथा आपल्या तंत्रानें वागेल अशी पेशव्याची खात्री नव्हती. शिवाय मुराररावास शाहूनें सेनापतिपद दिलें नाहीं, म्हणून तो नाराज होऊन संभाजीचे पदरीं सेनापतिपद मिळविण्याचे खटपटीस लागला. जिजाबाई राणीच्या मार्फत खटपट करण्यासाठीं तो स. १७४७ त कोल्हापुरास गेला; संभाजीला निजामाचा पाठिंबा थोडाबहुत होताच, पण कोल्हापुरास मुराररावाचा जम बसला नाहीं आणि पेशव्यानें युक्तीनें कर्नाटकचा कार्यभाग आपल्या हातीं घेतला.

रघूजी भोसले बंगाल प्रकरणांत जास्त गुंतत गेला. स. १७४४ च्या मार्च ३१ ला त्याचा सेनानी भास्करराम व त्याचे वीस साथीदार यांचे खटवा येथें भयंकर खून झाल्यामुळें, स्वतःची इभ्रत संभाळण्यासाठीं रघूजीला कैक वर्षे इतर ठिकाणचे व्याप सोडून द्यावे लागले. फक्त शाहूची धाकटी राणी त्याचें अगत्य बाळगी. याचे उलट थोरली राणी सकवारबाई इनें बाबूजी नाइकाचा पक्ष उचलला. तिचें कर्ज नाइकाकडे यावयाचें होतें, तें वसूल करण्यास तिला दुसरा मार्ग नव्हता. ही अंतस्थ लाथाळी ओळखून पेशव्यानें आपला डाव सावधगिरीनें चालवून युक्तीनें कर्नाटकांत आपलें बस्तान बसाविलें. बाबूजीचा जम त्यानें कर्नाटकांत बसूं दिला नाहीं; निजामाच्या हालचालींवर लक्ष ठेवून त्यास दुखविलें नाहीं, आणि मुरारराव व संभाजी

यांचीं खलबतें भरपूर चालू दिली. सन १७४६ अखेर त्यानें सदाशिवरावास कर्नाटकांत रवाना करण्याचें ठरविलें. †

**४ बाबूजीचे पाय ओढले.**—त्रिचनापल्ली घेण्याच्या उद्देशानें स. १७४४ अखेर बाबूजी नाईक चालून गेला. ता. २० जानेवारी स. १७४५ चें वर्तमान निजामाचे दरबारांतून आलें तें असें. "बाबूजी नाईक विजापुरासमीप आले. चार एक हजार फौज जमा जाली आहे. कर्नाटकांतून अन्वरुद्दीनखान वगैरे नायकावर चालून येत आहेत. नायकांची तंबी करावयास निजामांनीं मुजफ्फरजंगास फौज भारी देऊन पाठवितात." § पुढें बाबूजी नायकाची व मोगलांची लढाई लवकरच बसवापट्टणजवळ झाली. अन्वरुद्दीन व त्याचा पुत्र महंमदअली, कडापा, कर्नूळ, सावनूर, शिरें, बेदनूर, अडोनी, म्हैसूर अशा तमाम जागीरदारांच्या फौजा सामील करून चालून आले. त्यांची फौज ६९००० जमली. एक आठवडा पावेतों तुंबळ संग्राम घडून आला. बाबूजी नाईक पराभव पावून पुण्याकडे पळून आला. निजामानें अन्वरुद्दीन वगैरे सर्वांचें अभिनंदन केलें. या लढाईची नक्की तारीख उपलब्ध नाहीं. ता. १५ फेब्रुवारी स. १७४५च्या पत्रांत उभय दळें समोरासमोर युद्धास सज्ज असल्याचें वर्तमान असून निजाम मोठी रक्कम मराठ्यांस देण्यास कबूल होता, पण मराठे म्हणत, आम्हीं त्रिचनापल्ली घेतल्याशिवाय परत जाणार नाहीं. त्यावरून नंतर लवकरच वरील लढाई झाली असली पाहिजे. शाहू बखरींत खालील उल्लेख आढळतो. "बाबूजी नाईक कर्नाटक प्रांतीं गेले. तेथें संस्थानिकांशीं कटकट वाढून लढाई पडली. शिबंदी ठेवणें आली. लढाईत मोड झाला, लुटले गेले. शिबंदीचा पेंच अंगावर आला. त्यांचीं धरणीं बसलीं. निघोन सातारा आले." यावरून पुढें शाहूच्या दरबारांत कर्नाटकच्या

† पे. द. ४०. ३२, ३३, ३४. ३५, ४५, ४८, ५२, ५३; पे. द. २८. १७, १७ A, २०–३४, ३६–४४; पे. द. २५. १०–७२. . पे. द. २६. १२–२९; का. सं. प. या. ४५ ४८, ५२, ५३, ५४; ऐ. प. ५३, ५६, ५८, ५९, ६५; पु. द. भा. १, १५५, १६२, १६६.

स. १७४५ ते १७४८ च्या दरम्यानचे कर्नाटकीय व्यवहारांचे पुष्कळ कागद ठिकठिकाणीं विखुरलेले आढळतात. त्यांचे काल निश्चित करणें कठिण असल्यामुळें संगतवार मतलब ठरवितां येत नाहीं. अभ्यासकांनीं या कागदांचें निरीक्षण करून संगति ठरवावी. एका दृष्टीनें हा परिश्रम कोणी तरी करणें अवश्य आहे. पे. द. २५ भाग तर मुख्यत: निजामाचाच आहे,

§ पे. द. ४०. ५३; हि. रे. क. प्रो० १३ पृ. १२६

कारभारासंबंधीं विलक्षण झोंबाझोंबी चालू झाली, तिचें चित्र अनेक कागदांत आढळतें. नायकाची तर एवढी नाचक्की चहूंकडे झाली कीं, केव्हां शाहूकडे धरणें धरून तर केव्हां निजामाच्या पायां पडून त्याला निभावणूक करणें भाग पडलें. कर्नाटकांत वावरण्यास पाहिजे असलेली संधि पेशव्यास अनायासें प्राप्त झाली.

परत आल्यावर नायकानें आपल्या अडचणी महाराजांस निवेदन केल्या. "महाराजांनीं नायकास कर्नाटकचा मामला मुकासा सांगून गौरव केला, छ. ५ जमादिलोवलीं ( २६ मे १७४५ ) राजश्री स्वामींनीं नायकांस वस्त्रें व निरोप दिल्हा. येसाजी व कुसाजी भोसले सरकारचे लेकावळे यांस शिरोळ वगैरे सुभा सांगून बाबूजी नायकाकडे कर्नाटक सुभा, त्यांत त्रिचनापल्ली व श्रीरंगपट्टण हुजूर ठेविलें तें खेरीजकरून आदवानी वगैरे सारे महाल कर्नाटकचे त्यांत निंमे बाबूजी नाईक व निंमेंत येसाजी कुसाजी, शिबंदी खर्च व निंमे सरकार रसद, मोकासाबाबती स्वराज्य अंमल त्याचे सातलक्ष रुपये घेऊन भोसल्यांचे कारभारी यांनीं व नायकांनीं एक विचारें चालावें ऐसें करून रवाना केलें." *

इकडे नायकास आळा घालण्याकरितां निजामानें आपल्या फौजा कर्नाटकाकडे रवाना केल्या. बिदनूर सावनूर वगैरे ठिकाणच्या खंडण्या वसूल करण्याची तजवीज निजामानें चालविली. निजामाशीं विरोध किंवा संग्राम न करितां त्याच्या संमतीनें आपापले मतलब साधण्याचे प्रयत्न नाईक, पेशवे इत्यादिकांचे चालूच होते. निजामानें पुत्र नासिरजंग यास कर्नाटकांत रवाना केलें, पण नासिरजंगाचे हातून विशेष कार्य झालें नाहीं. या वेळेपासून निजामाची प्रकृति दिवसेंदिवस बिघडत गेली आणि पुढें त्यास मृत्यु आला, तेणेंकरून कर्नाटकांत पेशव्याची सरशी होत गेली.

कर्नाटकाबाबत शाहूकडे इतक्यांनीं आर्जवें चालविलीं कीं निकाल लावण्यांत त्याची त्रेधा उडून गेली. पेशव्यानें अंतस्थ डाव खेळून सर्वांच्याच तोंडांस पानें पुसण्याचा उद्योग चालविला. उभयतां राण्यांनीं त्यांत आग्रह धरल्यामुळें प्रकरण जास्त बिघळलें. बाबूजी नाइकानें तर उपासतापास करून शाहूच्या अंतःकरणांत करुणा उत्पन्न केली. सर्वांच्याच तक्रारी पेशवाच्या विरुद्ध गेल्यामुळें शाहूनें त्याचा निषेध केला. स. १७४५ अखेर शाहू महाराजांच्या

* का. सं. प. या. ४७; शा. म. ब.

आज्ञेनें बाबूजी नाईक कर्नाटकांत निघाला, तेव्हां त्यास अटकावण्याचे इलाज नबाबानें चालवून नासिरजंगास तिकडे जाण्याची आज्ञा केली. नायकानें प्रतिनिधीशीं स्नेह जोडून त्याचें साह्य मिळविलें. पेशव्याचे हस्तक नागोराम औरंगाबादेस व रघुनाथ गणेश निजामाचे स्वारीबरोबर राहून नायकाचा उद्योग हाणून पाडीत होते. नायकानें निजामाची भेट घेऊन आरकाटचा ऐवज पावला नाहीं त्याची मागणी केली. त्यावर निजामानें जबाब दिला, "तुम्ही सातान्यास जाऊन बहाल होऊन या मग मामलत चुकवूं. तुम्हांस सातारियांत रिपु फार आहेत." या प्रमाणें वाचेनें गोड मात्र बोलले; त्यावरून नायकांस विषाद फार जाला. दोनवेळ दर्शन मात्र निजामाचें जालें. खर्चाविशें फारश्रमी आहेत." §

दरम्यान निजामाचा कारभारी सय्यद लष्करखान व कायगांवकर दीक्षित यांच्या मार्फत पेशव्यानें निजामाकडे आपला जम बसविला; आणि सावनूरकर नबाब व मुरारराव यांचे मार्फत नायकाचा उच्छेद चालविला. निजामाचे दरबारांत व बाहेर सामान्य जनतेची समजूत अशी होती, कीं "हा प्रांत पंतप्रधानांनीं केला तरच त्याचें प्राक्तन उघडेल. त्यांनीं अवघें कर्नाटक तुंगभद्रेपलीकडील जिल्हा सर्व स्वामींकडून करून घेतला तरच दहशत पडेल."‡ पेशव्यानें बाबूजीनायकासही कळविलें कीं तुम्ही कर्नाटकची कमाविशी सदाशिवराव भाऊच्या नांवें करून देऊन आपला हक्क सोडावा, म्हणजे आम्ही बंदोबस्त करून तुमचाही निभाव होतो. परंतु नाइकास हा प्रकार मान्य झाला नाहीं, आणि ता. ५ डिसेंबर स. १७४६ रोजीं पेशव्यानें सदाशिवरावाची रवानगी कर्नाटकांत केली; बरोबर महादोबा पुरंदरे व सखाराम बापू यांस दिले. $

५ **सदाशिवरावाची सावरासावर.**—ता. १ डिसेंबर १७४६ चें पेशव्याचें पत्र पिलाजी जाधवास गेलें तें असें. "रा. संभाजी महाराजांचा तालुका सोंधें व बिकनूर व सावनूर बंकापूर वगैरे हीं संस्थानें स्वामीनें आमच्या स्वाधीन केलीं, तिकडे रा. बाबूजी नाईक यांनीं तालुक्यांत न जावें, ऐसा करार केला आहे. त्यास सदहू तालुक्यांचा पैका आला पाहिजे.

§ पे. द. २५. २२, २३. ‡ पे. द. २५–२९.

$ या स्वारीच्या तयारीसंबंधाचे कित्येक मुद्दे, फौजांचे वगैरे पुरंदरे द. भा. १ ले. ५९ यांत पहावे.

विनाफौज ते लोक सुप्रयुक्तीनें पैका देतील न देतील हा अर्थ तुम्हांस न कळेसा नाहीं. यास्तव तिकडे फौज गेली पाहिजे. दुसरें, सावतांशीं फिरंग्यांनीं कलह मांडला आहे. सावतांचीं दोन तीन ठाणीं फिरंग्यानें घेतलीं. सावंत पहिल्यापासून पदरचे, त्यांणीं चाकरी केली त्याचें साहित्य करावें जरूर आहे. यास्तव फौज रवाना करावयाची तजवीज केली आहे. चिरंजीव राजश्री सदोबा यास निरोप देऊन त्या प्रांतें रवाना करावा ऐसा विचार केला. दोच्यौ रोजांत राजश्री स्वामींचा निरोप होईल. चिरंजीव कधीं स्वारीस गेले नाहींत. यास्तव तुम्हांस जावें लागेल. तुम्हाविना दुसरें कोणी जावें ! तुम्ही याजबरोबर असलिया आम्हीं निश्चित असों. फौजेसह तुम्हीं व यांणीं नरसिंहसरस्वती या जागां जावें. दोचहूं संस्थानचा निर्गम करून घेणें तो घ्यावा, तिकडे सावतावर फिरंगियानें हाट केली, तरी तिकडे दोन हजार फौज, पाठविणें तिकडे पाठवून, त्यांचेंही साहित्य करावें. सारांश, तुम्हांबरोबर पथकें आहेत, तीं वसईस पाठवावीं; तुम्ही आपले समस्थ पथकांनिशीं सिद्ध असणें. चिरंजिवास रा. स्वामींचा निरोप होतांच तुम्हांस लेहून पाठवूं ते समयीं तुम्हीं स्वार होऊन अतिसत्वर येणें, जाणिजे. छ. २८ जिल्काद सु. सबा आर्बैन मया व आलफ.' यावरून नानासाहेबानें सदाशिवरावास कर्नाटकांत पाठविण्याची शाहूची परवानगी मिळविली यांत संशय नाहीं. नायकाच्या हातून प्रकरण निभावत नाहीं असें पाहूनच शाहूनें ही योजना केली.

सदाशिवरावास शाहूनें कर्नाटकांत पाठविल्याबरोबर नाइकास चीड येऊन त्यानें शाहूपाशीं त्रागा चालविला. ता. ७ फेब्रुवारी, स. १७४७ चें वर्तमान. "बाबूजी नाईक साताऱ्यास आहेत. पारणें केलें नाहीं. राजश्रींस मेजवानी करून पारणें करावें, मग निघावें असा विचार चालतो. भाऊच्या स्वारीसमागमें फौज वीस हजार आहे. नाईक निरोप घेऊन कोणीकडे जाणार म्हणोन राजश्रींनीं विचारतांच, यमाजीपंतांनीं सांगितलें, शिरें, चित्रदुर्ग, राजदुर्ग, हरपनहळ्ळी या प्रांतांकडे जातील म्हणतांच बोलले, पहावें कसें कसें होईल."†

सदाशिवरावभाऊचे पाठीवर निजामानें नासिरजंगास कर्नाटकांत रवाना केलें. दरम्यान पेशव्यानें मुरारराव घोरपड्याकडे संधान बांधून त्याजकडून नाइकाचा उच्छेद चालविला. ता. २४ मार्चचे पत्रांत पेशवा पिलाजी

† पे. द. २५. ४७, ५१.

जाधवास लिहितो, " तुम्ही येथें येऊन भेटून जाणें. नबाब सावनूर बिदनूरचे रोखें जाणार, सहजांत भाऊवर शह पडणार, नाईकही समागमें आहेत, या पेंचाचा प्रतिकार जरूर केला पाहिजे. भाऊ नवे स्वारीस गेले त्यामध्यें लौकिक एक प्रकारें जाहलीया उत्तम नाहीं. दरबारीं किरकोळ नफ्याचे इच्छेनें थोरले वाडियांतून क्रोधवृद्धि केली आहे. नबाबांचा विचार दोन्ही दगडींवर हात आहेत. भाऊंनीं कित्तूरचें ठाणें घेतलें. सोंध्याचे लगण्यांत गेले आहेत. बिदनुरास वकील गेले आहेत. फिरंग्यांवर दबाब आहे. नाईक आले तर त्यांस धुडाऊन लावावें ऐसा विचार आहे."§ ता. ३ मे रोजीं भाऊचा मुक्काम सौंदत्तीवर झाला. पाछापुरपासून हरिहर बसवापट्टणपर्यंतचा प्रदेश भाऊनें रगडून कबजांत आणिला. ३० मार्च रोजीं भाऊची व मुराररावाची भेट झाली, गोड भाषणें झालीं, परंतु मुरारराव स्वारींत सामील झाला नाहीं. त्याचें संधान कोल्हापुरशीं चालू होतें. मध्यंतरीं पेशव्यावर शाहूची इतराजी होऊन त्याचें प्रधानपदही अल्पकाळ दूर झालें, तो प्रकार अन्यत्र सांगितला आहे. मे अखेर सदाशिवराव परत येऊन पंढरपुराजवळ पेशव्यास भेटला. 'कर्नाटकच्या स्वारींत गवत मात्र भक्षावें, प्राप्ति थोडी, खर्च फार', अशी फलश्रुति पेशव्यानें वर्णिलेली आढळते. मात्र सदाशिवरावास पराक्रमाचा पहिला अनुभव मिळून त्याचें तेज झळकूं लागलें आणि मराठीराज्यांत धडाडीचा एक पुरुष निर्माण झाला, हें कांहीं थोडें नाहीं.

पेशव्याच्या कारवाईनें बाबूजी नायकाची दुर्दशा उडाली. कर्नाटकांत छावणी करून राहण्याचा विचार त्यानें केला, पण पैसा नाहीं म्हणून कुचंबणा झाली. अनन्यगतिक होऊन त्यानें निजामाचीं आर्जवें चालविलीं. " 'सातारा गेलों तर जीव वांचत नाहीं, नबाबानें आम्हांस वांचवावें. आपणांजवळ जमावानिशीं ठेवतील तरी राहतों, परंतु माघारें न पाठवावें,' परंतु, तुम्हीं निघोन परत जाणें, आम्हांजवळ न राहणें, म्हणोन जाब दिला. ते दिवशीं उभयतांस अन्न नाहीं, उपोषण जालें. नबाबानें आंबे फणस नारळ पाठविले. माघारा कूच करून गेले. कनमडी किल्ल्यास नायकाची व मुराररावाची लढाई झाली. नासिरजंगानें छावणी शिऱ्यास केली." पेशवा व बाबूजी यांच्या स्पर्धेमुळें सदाशिवरावाची स्वारी व्हावी तशी यशस्वी झाली नाहीं.

§ पे. प. ५२—७८; पे. द. २५. ५२

अपेश घेऊन आल्यामुळें नाइकाची पत महाराजांकडेही उरली नाहीं. कर्जाच्या उगवणीकरितां उभयतां राण्यांचे तगादे लागले. " महाराजांनीं हुजरे बसविले. त्यांनीं सक्ति फार केली. सायंकाळपर्यंत उभयबंधूंनीं उपास केले. निदानीं आबाजी नाईकानीं विषाची पुडी हातांत घेतली. बाबूजी पोट कट्यारीच्या तजविजेस लागले. आत्माराम जोश्यांनीं येऊन हातची पुडी काढून घेतली. उभयतां टोक्यास जाऊन श्रीसिद्धेश्वराजवळ बसले. रघूजी भोसल्यांनीं येऊन समाधान केलें कीं तुमचें साहित्य करून कर्नाटकची मामलत करून देवावितों. ¶ तदुत्तर नाइक कूच करून नरगुंदांतून मनोळीस गेले. महाराजांनीं साताऱ्यांतून मातबर सरकारकून पाठवून बहुमानें करून नेलें तर जावें अशी चर्चा चालते."

कर्नाटकांत बाबूजी नायकाचा थारा लागूं द्यावयाचा नाहीं असा पेशव्याचा निश्चय होता. हा उद्देश हाणून पाडण्यांत पुष्कळांनीं शिकस्त केली. 'पेशव्याकडे संस्थानें होऊं न द्यावीं येविशीं थोरली धनीन, फत्तेसिंग बावा, रघूजी भोसले, यशवंतराव पोतनीस आदि मंडळीचे प्रेष मुराररावाकडे चालू आहेत. बाबूजी नायकांकडूनही त्यांजकडे वकील आले.' पण स. १७४७ अखेर व पुढील सालीं शाहूचें लक्ष कारभारांत राहिलें नाहीं. त्याची प्रकृति व मन दुबळीं बनलीं. पेशव्याशिवाय दुसऱ्याचे हातून निभावणूक होणें शक्य नाहीं असें पाहून त्यानें त्या सालअखेर कर्नाटकचा सर्व मामला पेशव्याचे हवालीं केला. 'ईश्वरेच्छेनें कर्नाटक प्रांत आमचेकडे जाहला' असें पेशव्यानें आपल्या वकिलास कळविलें. बाबूजी नाइकाचा पाय मुलकांतून निघाला, त्यासंबंधानें त्यानें शक्य तितके इलाज केले, पण मुख्य धनीच पुढें दिवंगत झाल्यानें नायकाचा पाठिराखा कोणी राहिला नाहीं. शाहूचे पश्चात् रामराजा आला त्याच्या हातीं सत्ताच नव्हती. सांगोल्याचे व्यवस्थेंत कर्नाटक छत्रपतीच्या हुकुमानें पेशव्यास मिळालें. ताराबाई व दमाजी गायकवाड यांनीं पेशव्याविरुद्ध जो पुढें उठावा केला, त्यांतही नायकानें भाग घेतला, पण पेशव्यापुढें त्याचा निभाव लागला नाहीं. ‡

¶ रघूजी स. १७४७ त साताऱ्यास आला, त्या वेळचा हा प्रकार आहे.

‡ पे. द. २६. २३, २८. ७९, २५०, ६५, ६७, ६८.

## ६

# राजपूत-मराठा बेबनाव

## का ल सू ची

| | | | |
|---|---|---|---|
| १७१० | | | त्रिवर्ग राजपूत राजांचा पुष्कर येथील करार. |
| १७४१ | | | जयसिंग व बख्तसिंग यांची लढाई. गंगवाणा येथें जयसिंग पराभूत. |
| १७४३ | सेप्टें० | २१ | जयसिंग सवाई मृ०, गादीचे कलह. |
| | डिसेंबर— | | युद्धाची तयारी व सलूख. |
| १७४५ | फेब्रु० | | ईश्वरसिंगानें माधोसिंगाचा पराभव केला. |
| ,, | जुलै | ३ | राणोजी शिंदे मृ० |
| १७४६ | ऑक्टो. | ४ | नाथद्वारचें खलबत : माधोसिंग व साथीदार यांचें. |
| १७४७ | फेब्रु० | ९ | आयामल्ल जयपुर दिवाण मृ०, पुत्र केशवदास प्रधान. |
| ,, | मार्च | १ | राजमहालची लढाई, माधोसिंग पराभव. |
| ,, | ,, | ७ | तहाची याचना, तात्पुरता सलूख. |
| १७४८ | एप्रिल | ३० | पेशवा व माधवसिंग यांची भेट. |
| ,, | ऑगस्ट | १ | बग्रूची लढाई सहा दिवस, ईश्वरसिंगाचा पराभव. |
| ,, | ,, | ९ | तह करून ईश्वरसिंग परत राजधानीस. |
| १७५० | ऑगस्ट | | ईश्वरसिंगानें दिवाण केशवदासास ठार मारिलें. |
| ,, | डिसेंबर | १४ | ईश्वरसिंगाची आत्महत्या. |
| १७५१ | जाने० | १० | जयपुरांत तीन हजार मराठ्यांची भयंकर कत्तल. |

# ६

# राजपूत—मराठा बेबनाव

**१ प्रकोपाचीं पूर्वचिन्हें                २ जयपुर गादीचें युद्ध**

**३ ईश्वरसिंगाची आत्महत्या, मराठ्यांची कत्तल.**

**१ प्रकोपाचीं पूर्वचिन्हें.**—शाहूछत्रपतीनें सांभाळलेला मराठे राजपुतांचा स्नेहभाव कसा तुटला हें आतां सांगावयाचें आहे. शिवाजी महाराजांच्या वेळेपासून मराठ्यांच्या राजकारणाचें ध्येय हिंदुपदपातशाहीचें होतें, म्हणजे हिंदुधर्माचें संरक्षण व उत्कर्ष जो मुसलमानी अमलाखालीं लुप्त झाला होता, तो देशभर स्थापण्याचा उद्योग मराठ्यांनीं चालविला. शिवाजीनें मीर्झाराजा जयसिंग याचें मन या हिंदुत्वपुरस्कारानें वळविलें; छत्रसालाच्या भेटींत हेंच तत्त्व शिवाजीनें त्यास सांगितलें; राज्याभिषेक समारंभाचा तर तो मुख्य हेतु होता. संभाजीनें आपल्या पत्रांत रामसिंगाला हेंच तत्त्व कळविलें. संभाजीच्या वधानंतर बादशहाशीं प्रचंड झगडा चालविण्यास मराठ्यांना स्फुरण देणारी हाक या धर्माभिमानानें पुकारली. शाहू बादशाही कैदेंत असतां त्यानें याच हेतुस्तव राजपुतांशीं स्नेह जोडले. बाळाजी विश्वनाथ व बाजीराव यांना विशिष्ट सामर्थ्य प्राप्त होण्यास शाहूचा हा हिंदुत्वाचा पुरस्कार कारण झाला. राजपुतांना धर्मबंधनांनीं आळवून व आंवळून हिंदूंचें संघटन त्याच्या पेशव्यांनीं घडवून आणलें. नानासाहेब पेशव्याचाही तो हेतु असतां अनेक अवांतर कारणांनीं शाहूछत्रपतीच्या अखेरच्या आसन्न स्थितींत राजपूत मराठ्यांचें कैक वर्षांचें हें ऐक्य उत्तरोत्तर भंग पावलें आणि मराठ्यांच्या वाढत्या सत्तेला पानिपतावर धक्का पोंचला तो प्रकार आतां सांगावयाचा आहे.

शाहूचे समकालीन प्रमुख राजपूत राजे सवाई जयसिंग, उदेपुरचे संग्रामसिंग व जगत्सिंग आणि मारवाडचे अजितसिंग व अभयसिंग हे होत. पैकीं जयपुर व मारवाड येथील राजांशीं आतां मराठ्यांचा तीव्र बेबनाव उत्पन्न झाला. औरंगजेबाच्या उत्तरकालांत दक्षिणेंत जसे मराठे त्यावर उठले, तसे उत्तरेंत राजपूतही बादशाहीवर आक्रमण करूं लागले. औरंगजेब मरण पावतांच राजपूत राजांनीं वंशशुद्धि व धर्मोत्कर्ष या हेतूंनीं प्रेरित होऊन एक मोठी

नवीन घटना बनवून आणिली. पुष्कर सरोवराच्या कांठीं भेटून व दीर्घ काल खल करून त्यांनीं एकमतानें एक करार तयार केला कीं इतःपर आपल्या मुली मुसलमानांस देऊं नयेत, उदेपुरच्या घराण्यानें इतर राजपुतांशीं बेटीव्यवहार बंद केले होते ते पूर्ववत् चालू करावे, इतकेंच नव्हे तर जयपुर, जोधपुर वगैरे घराण्यांत अनेक स्त्रियांपासून संतति झाली असेल तर उदेपुरच्या मुलीच्या संततीचा राज्यप्राप्तीचा हक्क जास्त समजावा. हा सुप्रसिद्ध करार स. १७१० सालीं झाला, तेव्हांपासून पुढें सुमारें एक शतकपावेतों राजपूत राजांची आपसांत भयंकर रणधुमाळी चालू झाली; आणि ज्या शुद्ध हेतुस्तव मूळ करार अस्तित्वांत आला तो तर सिद्धीस गेला नाहीं. करार होता मुसलमानांविरुद्ध, पण त्यामुळें राजपुतान्यांत आपसांतील वारसाच्या हक्कासंबंधानें नसते कलह उत्पन्न होऊन, त्यांत निरनिराळया पक्षांनीं मराठ्यांचें साह्य मागितलें, तेणेंकरून रणसंग्राम माजले त्यांत मुख्यतः दोन प्रसंग मराठ्यांना विशेष जाचक झाले. एक सवाई जयसिंगाच्या मृत्यूनंतर जयपुरगादीचा व अभयसिंगाच्या मृत्यूनंतर जोधपुरगादीचा. हे कलह प्रत्येकीं सात वर्षे चालून त्यांत मराठे राजपुतांचें पूर्वीचें रहस्य सर्वथा बिनसून गेलें. त्या काळांत पेशवा दक्षिणेंत गुंतून राहिला आणि उत्तरेंतील मराठी राजकारणांत एकसूत्रता राहिली नाहीं.

ता. २१ सेप्टेंबर, स. १७४३ रोजीं सवाई जयसिंग मरण पावला. त्यास पुत्र दोन; वडील ईश्वरसिंग व धाकटा माधवसिंग. धाकटा असला तरी तो मेवाडकर राजकन्येच्या पोटचा असल्यामुळें वरील करारानुसार राज्यावर त्याचा हक्क जास्त होता. माधवसिंगाचा जन्म झाल्याबरोबर उदेपूरच्या संग्रामसिंगानें आपला रामपुरा परगणा स. १७२७ त त्याच्या नांवानें करून दिला आणि त्या परगण्याची वहिवाट सवाई जयसिंगाकडेच ठेविली. माधवसिंग बहुतेक आजोळीं उदेपुरासच राहत असे. जयसिंग मृत्यु पावतांच ईश्वरसिंगानें जयपुरची गादी घेतली आणि राज्यकारभार चालविला, त्यास बादशहानेंही मान्यता दिली.¶ हें पाहून उदेपुरच्या राण्यानें माधवसिंगाचा पक्ष घेऊन ईश्वरसिंगाशीं युद्ध आरंभलें तें सात वर्षे चाललें आणि शेवटीं ईश्वरसिंगानें वैतागून आत्महत्या केली तेव्हां जयपुरची गादी माधवसिंगास मिळाली, (२९ डिसेंबर, स. १७५० ). या सात वर्षांच्या युद्धांत सिंदे होळकरांनीं आपापल्या मतलबासाठीं केव्हां ईश्वरसिंगाचा व केव्हां माधवसिंगाचा पक्ष

¶ रा. खं. ६ ले. ३५७

घेतला, त्यामुळें घोटाळे उत्पन्न होऊन मराठ्यांचें राजकारण बिघडलें. या युद्धाचे व तत्संबंधीं झालेल्या व्यवहारांचे तपशील येथें सर्व सांगणें शक्य व जरूर नाहीं. त्यांतील मुख्य घडामोडी आरंभींच्या कालसूचीवरून लक्षांत येतील.

जयसिंगाचे पश्चात् ईश्वरसिंगानें गादी घेतल्याबरोबर मेवाडच्या जगत्सिंगानें फौज जमवून माधवसिंगासह जयपुरकडे चाल केली. तिकडून ईश्वरसिंगही चालून आला. सन १७४३ चे अखेरीस दीड महिना उभय दळें जहाजपुरजवळ सामना करून होतीं. कांहीं काळ परस्पर वाटाघाटी चालल्या, त्यांत ईश्वरसिंगानें कांहीं जास्त प्रदेश माधवसिंगास दिला. तेवढ्यानें त्याचें समाधान न होतां तो अर्धे राज्य मागूं लागला.

**२ जयपुर गादीचें युद्ध.**—ईश्वरसिंगानें सिंदे होळकरांशीं बोलणें करून पैसे भरून त्यांची मदत आणिली आणि स. १७४५ च्या फेब्रुवारींत माधोसिंगाचा पराभव केला. पेशवा किंवा सरदार यांपैकीं प्रत्येकानें द्रव्य-प्राप्तीचें धोरण चालवून न्यायान्यायाची क्षिति बाळगिली नाहीं. दरम्यान त्या सालच्या जुलईंत राणोजी सिंदे मृत्यु पावला, त्यानंतर त्याचा पुत्र जयाप्पा व कारभारी रामचंद्रबावा यांजमध्यें तेढ उत्पन्न होऊन उत्तरेंतील राजकारणाची एकसूत्रता बिघडली. माधवसिंह व त्याचा मातुल जगत्सिंह यांनीं आपल्या उद्योगाचा पिच्छा सोडला नाहीं. दरम्यान बुंदीचा उमेदसिंग हाडा याचें राज्य जाऊन तो माधवसिंगास सामील झाला. ता. ४ ऑक्टोबर, स. १७४६ त नाथद्वार येथें भेटून त्यांनीं पुष्कळ खलबतें केलीं. मल्हारराव होळकराशीं संधान करून मदतीस बोलाविलें. मल्हाररावानें पुत्र खंडेरावास पाठवून कांहीं एक तडजोड ठरविली. पण ती अंमलांत न येतां प्रकरण युद्धावर आलें. जयपुरचा अनुभवी व पिढीजाद दिवाण खत्री आयामल्ल, ज्यास राजामल्ल किंवा मलजी हें नांव प्रचारांत होतें, तो ता. ९ फेब्रुवारी स. १७४७ रोजीं मरण पावला आणि त्याचा पुत्र केशवदास जयपुरच्या प्रधानकीवर आला, तेव्हांपासून जयपुर दरबाराकडून मराठ्यांचें अनुसंधान बरोबर पाळलें गेलें नाहीं. नारायणदास व हरगोविंद हे दोन ईश्वरसिंगाचे सेनानी राजमहालच्या रणभूमीवर माधव-सिंगाच्या व राण्याच्या अंगावर चालून आले. ता. १ मार्च, स. १७४७ रोजीं लढाईस तोंड लागून दोन दिवस भयंकर संग्राम झाला. " ईश्वरसिंगाची फत्ते जाली. माधवसिंगाकडील पुष्कळ लूट यांस आली. राणाजीची फौज पळाली. उभयपक्षीं बहुत लोक मारले गेले. खंडेराव होळकर एकीकडे उभे होते, त्यांस

नारायणदासजींनीं मारून काढिलें."† नंतर जगत्सिंगानें तहाची याचना केली ती मान्य करून ईश्वरसिंग विजयघोष करीत एप्रिलांत जयपुरीं परत आला. या सालीं उत्तरेंत भयंकर दुष्काळ होता.

या पराभवानें महाराणा अत्यंत कष्टी होऊन मदतीसाठीं मल्हाररावाचीं आर्जवें करूं लागला. मराठ्यांची मदत घेऊन आपण ईश्वरसिंगाचा पाडाव करावा असें ठरवून त्यानें आपले वकील पुण्यास पेशव्याकडे पाठविले. या पूर्वी पेशव्यानें ईश्वरसिंगाचा पक्ष घेतला होता, त्या विरुद्ध मल्हाररावानें आतां पैशाच्या आशेनें माधोसिंगाचा पक्ष स्वीकारला. पेशव्यास पेंच पडला. रामचंद्रबाबास ता. ७ मार्च, स. १७४७ रोजीं पेशवा लिहितो, " राणाजीचे वकील येथें आले आहेत, माधोसिंगाचा मजकूर बोलतात, त्यांत मुख्यार्थ हाच कीं, ईश्वरसिंगानें माधोसिंगास चोवीस लक्षांचे जागा द्यावयाचे करार केले, त्यावर सरदारांनीं कारभार बिघडून दिल्यामुळें माधोसिंगाचें कार्य खराब झालें. दोघेही सवाईजीचे पुत्र. ईश्वरसिंगानें राज्य करावें; आणि माधोसिंग नालायक आहे असें नाहीं. परंतु ईश्वरसिंगानीं चोवीस लक्षांची जागा देण्याचा करार केला, ती द्यावी, आम्ही स्वामीस ( पेशव्यांस ) नजर करणें ती करूं, म्हणोन राणाजीचे वकील बोलतात. तर या गोष्टीचा विचार तुमचे मतें काय तो लिहून पाठविणें. आमच्या विचारें ईश्वरसिंगांनीं करारा-प्रमाणें माधोसिंगास जागा द्यावी, आणि माधोसिंगापासून बारा, पंधरा, बल्की याहून विशेष, जेथवर साधेल, तेथवर साधावी. यांत तुमचा पोख्त विचार लिहून पाठविणें. ईश्वरसिंगानें चोविसांची जहागीर कबूल केली होती, परंतु तुम्हीं त्वरेनें जाऊन ईश्वरसिंगाचें मनोभीष्ट सिद्धीस नेलें; आणि माधोसिंगास तीन लाखांवर समजाविला, तर ही गोष्ट निरंतर चिंताकारीच आहे. सांप्रत राणाजीचे वकील पंधरा लाखांची नजर कबूल करितात, तर करारप्रमाणें ईश्वरसिंगास सांगून चोविसांची जागा देववावी. यांत दोनही साधतात."§

यावर रामचंद्रबाबानें पेशव्यास कळविलें, 'माधवसिंगाचे राजकारण लटकें, त्यांत जीव नाहीं. पैका प्राप्त होणें नाहीं. स्वामींनीं ईश्वरसिंगाचा अभिमान धरिला ऐसें लोकांत जालें, त्यास आतां ही गोष्ट विरुद्ध आहे.'

† पे. द. २१. २४. राजमहाल बनास नदीच्या कांठीं देवळीजवळ आहे.

§ ऐ. प, ६८

याप्रमाणें होळकर व रामचंद्रबाबा म्हणजे सिंदे यांनीं एकमेकांविरुद्ध पक्ष स्वीकारले तेणेंकरून मराठ्यांची इभ्रत बुडाली. पेशवा कसा बुचकळयांत पडला हें त्याच्या पुढील एप्रिल स. १७४७ च्या पत्रावरून कळून येतें.‡ ‘ राणाजींनीं मोगलाई अमिरांकडे राजकारण करून मल्हारजीकडे प्रेश केला, एतद्विषयीं मल्हारबांनीं आम्हांस बहुतांप्रकारें लिहिलें कीं, राजकारण खरेंखुरें आहे. उभयतांची समजावीस होऊन कलह तुटतो. स्वामीस पैका मिळतो, म्हणून कित्येक आग्रहपुरःसर लिहिलें आहे. मल्हारबास या गोष्टीचा पुर्ता अभिमान आहे. तुम्हांस ( म्हणजे पर्यायानें जयाप्पास ) कोणे गोष्टीचा अभिमान आहे, ऐसें नाहीं. तुम्ही सेवा निष्ठायुक्त करीत आलेत. ज्यांत खावंदाची मर्जी, हित व नक्ष तेंच केलें. तन्मुळेंच सर्वही उत्तम प्रकारें दिसोन स्वामिसेवा घडत गेली. सांप्रत मल्हारबा अभिमानी, तुम्ही ईश्वर-सिंगाचाच पक्ष धरिल्यास, तुमची त्यांची ऐक्यता चालणार नाहीं. ते द्वैत दाखवितील. आजपर्यंतचा ऐक्यभाव विथर दिसेल. हिंदुस्थानांत दुर्लौकिक होऊन कार्यनाश होऊं शकतो; उमदे उमदे मनसुब्यास अंतर पडून, कित्येक फितवे अंग्रेज लोकांस बोटें घालावयास जागा होणार, ऐसें चित्तांत येतें, त्यास तुम्ही येविशीं दुराग्रह न करतां, फूट न दिसतां, मल्हारबाचा मनोदय रक्षून, संपादिल्या यशाची अभिवृद्धि होय तें करणें. आमच्या विचारें तुम्ही उभयतां ऐक्यरूप मनसुबा करीत आलां, तदनुरूपच चालावें. त्यास विपर्यास नसावा, हेंच सर्वात्मना आमच्या चित्तांत आहे. विस्तार लिहिण्यास कारण हेंच कीं, दुराग्रह मल्हारबाचा, नाहीं करीत म्हटल्यानें वाईट मानतील. तुम्हांपासून जावयाचा आग्रह धरितील. दुसरें, पंधरा लाख राणाजी देणार असें असतां, दुराग्रह केलिया उत्तम दिसत नाहीं. यास्तव ज्याप्रकारें लौकिक फटकळ, ग्रहकलहाचा न होतां, कार्य करणें.’

पेशव्यानें पैशाच्या लालचीनें धरसोड चालविलेली पाहून ईश्वरसिंग संतापून गेला. त्यानें खालील सणसणित उत्तर पेशव्यास पाठविलें. “ आपला आमचा स्नेह पिढीजाद अलौकिक आहे. महाराज वैकुंठवासी सवाईजयसिंग व राऊ कै. बाजीराव यांचें इष्टत्व कोण्याप्रकारें निभलें, महाराजांनीं काय काय कामें श्रीमंतांचीं केलीं हें बाळाजीरायांच्या ध्यानांत नाहीं ऐसें नाहीं, आम्ही सर्व प्रकारें त्यांच्या वचनावेगळे नव्हतों. परंतु हा प्रश्न दायादांचा आहे. कज्जिया

‡ ऐ. प. ७६.

भूमीचा आहे. चाकरीच्या नात्यानें सरदारांना पूर्वी द्यायचें तें दिधलें आहे. अधिक विनायुद्ध कसें अनुकूल पडतें ! कनिष्ठास विभाग देऊन आपल्या अंगीं कुपुत्रपण कसें घेववेल ! पहिल्यापेक्षां विशेष द्यावयाचें तों घडणार नाहीं. राज्य ईश्वराचें देणें आहे, ज्यास देईल तो घेईल. परंतु पगडी बदलली, त्याची फलश्रुति दाखविली." "आतां युद्ध करून आपला लौकिक केला. राणा, राठोड, हाडे यांची छक्कड ईश्वरसिंग खातो ऐसें नाहीं." §

तथापि होळकर आपला हट्ट सोडीना. ता. ६ डिसेंबर, स. १७४७ रोजीं त्यानें लिहिलें, 'राणाजीकडून किशोर पंचोली व जयसिंग सखतावत पिंपळेकर या उभतांस श्रीमंतांचे दर्शनानिमित्त पाठविले आहेत. माधोसिंगाकडून कणीराम आले आहेत हे सविस्तर आपणास विदित करतील. यांच्या आपल्या मतें मनास आणून कर्तव्य तें करावें. श्रीमंतांचे आज्ञेनुसार वर्तणूक करूं." या भानगडी इतक्या वाढल्या कीं स. १७४७ अखेर स्वतः पेशवा उत्तरेंत गेला. † माधवसिंगानें त्याची भेट घेतली. जयपुराजवळ मराठ्यांच्या प्रचंड फौजा जमल्या. दोन पक्षांस धाक दाखवून एक प्रकारची समजावणी पेशव्यानें केली. दरम्यान अब्दाली पंजाबावर चालून आला त्या प्रसंगीं ईश्वरसिंग बादशहाचे साह्यास गेला असतां अंग चुकवून संग्रामांतून पळून आल्यामुळें त्याची पुष्कळशी नाचक्की झाली. इतउत्तर त्याचें भाग्य खालावत जाऊन तो वैतागून गेला. पैशाच्या आशेनें मराठे सरदार व पेशवा क्षणोक्षणीं आपलीं वचनें व करार बदलतात याची त्याला अत्यंत चीड उत्पन्न झाली. ईश्वरसिंग शूर व मानी होता, पण व्यवहारास तारतम्य व धोरण लागतें तें अंगीं नसल्यामुळें त्यास विषण्णता प्राप्त झाली. त्यांत दिल्लीदरबारची डळमळित अवस्था, अब्दाली व पठाण यांचा प्रळय, वजीर सफदरजंगाची असमर्थता, बादशहाचा मृत्यु व त्याच्या पुत्राची स्थापना, तसेंच दाक्षिणेंत शाहूच्या मुमूर्षतेनें उत्पन्न झालेली अनिश्चिति हे सर्व प्रकार एकसमयावच्छेदें मनांत आणले म्हणजे अठराव्या शतकाचा हा मध्यवर्ति काळ किती भीषण व संकटमय बनला होता याची कल्पना येईल. त्याबरोबर हेंही खरें कीं अशा बिकट प्रसंगांतच राज्यचालकाची परीक्षा होते. या दृष्टीनें पेशव्याचें अनुसंधान चुकून निव्वळ लोभापायीं मराठ्यांना राजपुतांचे स्नेहास मुकावें लागलें हा परिणाम व्यक्त होतो.

§ पे. द. २.११, २७.१८, १९
† पे. द. २१.१७, ना. रो. १.२०८

नेवाईच्या स्वारींत असतां सिंदे होळकरांचें वितुष्ट पेशव्याचे नजरेस आलें, त्याच्या परिहारार्थ त्यानें खालील पत्र रामचंद्रबावास लिहिलें. 'तुमचा व मल्हारजी होळकराचा परस्पर पेंच वाढला आहे, म्हणोन वर्तमान बहुतां मुखें ऐकिलें जातें. ऐशास आपले घरांत सरदारांत काडीमात्र द्वैतभाव नसावा, हा उत्तम पक्ष आहे. तथापि घर आहे तेथें बोलीचाली आहेच, परंतु परस्पर रुष्टता कोणी बाळगीत नव्हते. सर्वही एकचित्तें करून ज्यांत धन्याचें हित व नक्ष तोच मनसुबा करीत गेले. श्रीकृपें व वडिलांचे पुण्येंकरून जें ज्यांणीं चित्तांत आणिलें तें सिद्धीतें पावत गेलें. यशावह कर्में तुम्हींच संपादिलीं. नक्ष लौकिक म्हणावा तसा लोकोत्तर जाला. पुढेंही तुम्ही स्वामिसेवेस चुकतां असा अर्थ नाहीं. सर्व प्रकारें या दौलतीचे तुम्ही स्तंभच आहां. उचित मनसुबा असेल तो करितां, व करालच, संदेह नाहीं. परंतु घरांत घरभेद सर्वस्वी नसावा. यामागें तुमचें सांगणें मल्हारबांनीं केलें, त्यांचा मनोभाव तुम्हीं सिद्धीस नेला. म्हणोनच उत्तम शोभा जाहली. एकतत्त्वी फौज एकदील. कोणाचाही बुद्धिभेद चालला नाहीं. प्रस्तुत तुमची परस्पर रुष्टता याकारितां, या राज्यांत काय, मोंगलाईंत काय, उमद्या उमद्यांचे घरीं मन माने तैशा चर्चा करितात. आमचें कोणास सुख आहे ऐसें नाहीं. परंतु वडिलांचे तपोबलें आमची फौज भारी, सरदार एकदील, मर्द, कर्ते, अस्मानही कडाडलें तरी आपल्या मर्दानगीस, हिंमतीस अंतर करणार नाहींत; व केलें नाहीं. ज्यांच्या मर्दुमी व दिलेदारीची तारीफ सर्वही करितात. सांप्रत मल्हारबा इंदुरासच राहून राणाजीच्या भेटीस जाणार. तुम्ही देशास येणार म्हणोन तत्त्वतां ऐकतों. तर ते तिकडे राहिले, तुम्ही एकटे इकडे आल्यास लोकांत कसें दिसेल! उमदे लोक चर्चा करितात, आमच्या सरदारींत फूट पडावी, आपली कारीगारी चालावी हें इच्छितात, तेंच घडूं सकेल. रघूजी भोसले व बाबूजी नाईक औरंगाबादेस जाऊन नबाब आसफजाची भेट घेतली. आम्हांकडील विपरीतार्थाच्या गोष्टी सांगतात. नबाब करूं तो सकत नाहीं; परंतु त्यांचे मनोरंजकेसाठीं अनुमोदन देतात, गोड बोलतात. रा. स्वामींस कर्ज झालें आहे, तें परिहार झालें पाहिजे, याजकरितां मन माने तो पैका मागतात. त्यांच्या सांगितल्याप्रमाणें आमचे वस्तू कबूल करवत नाहीं. यास्तव परम विमनस्कतेच्या गोष्टी घरांत बाहेर बोलतात. येणेंकरूनही लोकांस सुखावह वाटोन, मन माने त्या चर्चा करितात. नबाब आसफजाचा विचार दगाबाजीचा, एकास पळ म्हणावें, एकास पाठीस लाग म्हणावें. हा त्याचा विचार तुम्ही

जाणतच आहां. त्यास कांहीं चमत्कार दाखवावा, विचारावरी आणावें येविशींचा विचार करावा. दुसरें राजश्रींच्या कर्जाच्या विचारास तुम्ही असलें पाहिजे. तुम्हांस येणेंविशीं वारंवार लिहिलें, परंतु अद्याप येणें जालें नाहीं. भेटी होऊन विचार करून आश्विनकार्तिकांत मनसुबा कर्तव्य तो करावा. सारांश, तुम्हीं उभयतांनीं यावें, घरचे बाहेरचे मनसुबे उचित दिसतील तैसे तुम्हां सर्वांच्या विचारें करावे, असा विचार आहे. तरी मल्हारबांस उत्तम प्रकारें सांगून त्यांस घेऊन येणें. ते इकडे न यावयाचे हरप्रकारें पर्याय लावतील; तथापि बहुतां प्रकारें प्रसन्न करून खामखा घेऊन यावेंच यावें. उभयतां एक जागां जालियावर त्यांच्या चित्तांतील कलुषता दूर करून पूर्ववत् प्रमाणें तुम्ही ते वर्ता. दरम्यान विकृतभाव नव्हे ऐसाच विचार देवाच्या दयेकरून होईल, चिंता नाहीं. मुख्य गोष्ट, आमच्या सरदारांत परस्पर फूट व्हावी, आमचा पक्ष हलका दिसावा, ( पुढील एक बंद गहाळ ). दुसरा पेंच राजश्री आम्हांपासून पंधरा वीस लाख कर्जाऊ इच्छितात, ते प्राप्त न होत, त्यामुळें कष्टी. थोरले वाड्यांतील पेंच निरंतर वृद्धीसच पावत आहे. मानाजी आंगऱ्याचा किल्ला माणिकगड घेतला, यामुळें धाकटे वाड्यांतील कृपा होती तीही इतराज. इतकेही पेंच, घरकलह नसतील तर, श्रीकृपेनें उलगडूं शकतों. सबब हरप्रकारें मल्हारबांस समजाऊन स्वकार्यसाधनेसाठीं घेऊन यावें. घरीं दोन वर्षें फौज बसली. कर्ज नवें दहा पंधरा झालें. यंदां स्वारीस जावयास योग्यता, राजश्रींनीं निरोप दिला याजमुळें, झाली. सत्वर सर्वांनीं एक जागीं होऊन तमाम डौल पाडावे. हे अर्थ तुम्हांस लिहिणें लागतात ऐसें नाहीं. सर्व तुम्ही करून म्हातारे जालां. सारांश, बाहेर वाईट न दिसे, घरकलहामुळें दौलतेची उचित कार्यास अटकाव न पडे ती योजना जेणेंकरून होय, तें सत्वर करून त्यांस समजावून घेऊन यावें. तुम्हींही निखालस जन्माचे सोबती आहांत. विस्तारें काय लिहिणें हे विनंति. तुम्हीं मल्हारबाच्या चित्तांतील किल्मिष दूर करून त्यांस घेऊन अतित्वरेनें यावें.' †

† हें पत्र कै. पारसनीसांकडून मिळालें. ऐ. प. ले. ४१ येथें त्रुटित छापलें आहे. रघूजी भोसले निजामास भेटल्याचा उल्लेख पत्रांत आहे. ही भेट स. १७४७ च्या उन्हाळ्यांत झाली, त्यानंतरचें हें पत्र पेशवा नेवाई स्वारींत जाण्यापूर्वींचें आहे. पे. द. २०.४७, ७१ यांत या भेटीचा उल्लेख असून राणी सगुणाबाईनें रघूजीस लिहिलेल्या ता. २६ जुलई, स. १७४७ च्या वैद्य संग्रहांतील अप्रसिद्ध पत्रांत रघूजी निजाम भेटल्याचा मजकूर आहे.

ईश्वरसिंग अरेरावीनें वागतो सबब त्यास नरम करण्याचें काम होळकरानें स्वीकारिलें. ‘ ईश्वरसिंग यांणीं लटकी रदबदल दोन महिने लावून आपल्या फौजा तमाम मेळवून युद्धप्रसंग करावा, ऐसा त्यांचा विचार देखोन, रा. गंगाधरपंत चंद्रचूड यांजबरोबर फौज देऊन फागईच्या मुक्कामींहून जैपुरास रवाना केलें. आषाढ व॥ २ स शहराभोंवताल्या वाड्या होत्या त्या जाळून, फौजेनें दोन कोस अलीकडे येऊन मुक्काम केला. त्याजवर राजे ईश्वरसिंग चालून आले. चार घटका युद्ध जालें. आपल्या कडील ××× कामास आला; आणखी चांगलें माणूस त्याजकडील शें दीडशें ठार जालें; दोन तीनशें जखमी जालें. माघारे परतून जैपुराशेजारीं नेऊन घातलें. त्या उपरी राजे ईश्वरसिंग तमाम फौजेसुद्धां बाहेर निघाले. आम्हीही तयार होऊन गेलों. चार घटका युद्ध जालें. त्यांनीं संकट जाणून रा. केशवदास सलुखाबद्दल आम्हाकडे पाठविला. बुंदी सोडून देतों, माधोसिंगाचे चारही परगणे निखालस खालीं करून देतों, ऐसा करार कबूल केला.’ † वरील लढाई सांभरच्या पूर्वेस २५ मैलांवर बगरू म्हणून स्थल आहे तेथें महिना दीड महिना चालली.

**३ ईश्वरसिंगाची आत्महत्त्या, मराठ्यांची कत्तल.**—स. १७४९ चें साल उत्तरेंत शांततेचें गेलें. सिंदे होळकर दक्षिणेंत असून सफदरजंग दिल्लींत बादशहाजवळ आपलें आसन स्थिर करीत होता. ईश्वरसिंगानें कबूल केलेल्या रकमा न मिळाल्यामुळें मराठे वकील त्यास तगादा लावीत होते. पेशव्यानें स. १७५० च्या पावसाळ्यांत सिंदे होळकरांस उत्तरेंत पाठवून जयपुरची बाकी वसूल करण्यास सांगितलें. दरम्यान ईश्वरसिंगाची प्रकृति संतापवायूनें नादुरुस्त झाली. राजा मलजीचा पुत्र केशवदास प्रधानगिरीवर होता, त्यास ईश्वरसिंगानें, हरगोविंदनें चहाडी केल्यावरून विषप्रयोगानें स. १७५० च्या ऑगस्टांत ठार मारलें; आणि शिवनाथ भय्या म्हणून तोफखानाकामगार होता, त्यास सर्व मुलाबाळांसह कैदेंत घातलें. तेणेंकरून बाहेर जिकडे तिकडे अनर्थ उडाला. राज्यास आळा घालील असा शहाणा कोणी जयपुरांत उरला नाहीं. नोव्हेंबर अखेर होळकर जयपुरावर चालून आला, तेव्हां दोन लाख चार लाख देऊन ईश्वरसिंग मल्हाररावाची समजूत करूं लागला. ही थट्टा पाहून “ सुभेदार इतराज झाले. केशवदास मारला त्याचा सूड घेणार. राजाचे कारभारी म्हणाले, आम्ही होळकराचे भेटीस

† रा. खं. ६ ले. १९०, १९१, ५८१ हीं सर्व पत्रें महत्त्वाचीं आहेत.

न जाऊं. आम्हांस तो मारील. राजा उगाच राहिला. संध्याकाळ जाहला. वर्तमान आलें कीं सुभेदार दहा कोसांवर आले. खिजमतगारास सांगितलें काळा नाग व सोमलखार घेऊन येणें. त्यांणीं आणून दिल्हें. दोनप्रहर रात्रीस राजानें जहर घेतलें. अंगास नाग डसविले, पहाटे ईश्वरसिंगाचा प्राण गेला. तिघां बायकांनीं व एका कलावंतिणीनें जहर घेतलें. मार्गशीर्ष व. १२ शुक्रवार प्रहर दिवसा होळकर जयनगरावर चालून गेले. त्या वेळीं कारभारी राजास कळविण्यास गेले, अजून निजलां काय ! तों खिजमतगारानें सर्व सांगितलें. मग शहरांत आकांत जाला. हरगोविंद व विद्याधर सुभेदारांस जाऊन भेटले. सुभेदारांनीं आपले मातबर पाठवून अग्निदाव दिधला. वरील चौघी व वीस कलावंतिणी सती गेल्या. दुसरे दिवशीं राजवाड्यावर चौक्या बसवून माधवसिंगास आणण्यास स्वार पाठविले. खंडणीचा करार करून चौक्या उठविल्या. माधोसिंग पंधरावे रोजीं आला. सुभेदार पुढें जाऊन भेटले. उभयतां एक हत्तीवर बसून हवेलींत आले. आठवे रोजीं जयाजी सिंदेही आले. वसुलास लागले. इतक्यांत माधोसिंगाची फौज पंधरा हजार आली होती. जमाव झाल्यावर राजाची नजर फिरली. कुविद्या धरली कीं सुभेदारास व जयाजी सिंद्यास जेवायास करावें. अन्न अवघें विखाचें करावें. सुभेदार कबूल झाले, जयापानीं उडवून दिलें. सोमलखार दोन मण घेतला होता. ईश्वरें सरदारांस वांचविलें. दुसरे रोजीं दुसरा विचार गंगाधरपंत व कारभारी यांस बोलावून मारावयाचा केला. जयाप्पा व पांच हजार माणूस शहर पहावयास गेलें. पौष व० ९ गुरुवारीं ता. १० जाने. स. १७५१ राजाच्या हुकूम जाला कीं मराठे आले. कत्तल करा. पूर्व सूचना होतीच. शहरचे दरवाजे लावले. दोन प्रहरांपासून प्रहर रात्री पर्यंत मराठे कापले. तीन हजार कापले व एक हजार जखमी. जयापाकडील मातबर सरदार पंचवीस व चाकर वगैरे हजार दीड हजार, ब्राह्मण शंभर, बटकी, पेंढारी, मुलें वगैरे कापून काढलीं. कित्येक गांवकुसावरून उड्या घालून गेले त्यांचे पाय व कंबर मोडली. एक हजार चांगले घोडे गेले. सोन्याचीं कडीं, मोत्यें, वस्त्रभाव मराठ्यांचें फार गेलें. गुरुवारीं हा प्रकार झाल्यावर शनिवारीं तीन चार कोस अलीकडे येऊन राहिले. पुढें राजाचा वकील कनीराम व गणेशमल्ल व महादेवभटाचा वकील गोविंद तिमाजी असे येऊन सलूखाचें बोलूं लागले. परंतु पोटांत दगाबाजी. सुखेपणें देत नाहींत. हे तों आशेस गुंतले.

मनसूरअलीचे वकील बोलावण्यास येऊन बसले आहेत तिकडे जाणार. भगवंतानें मोठें यश सुभेदारांस दिधलें होतें, आतां अपेश आलें यामुळें फार श्रमी आहेत. " हें ता. २२ जानेवारी स. १७५१ चें पत्र गोविंदपंत बुंदेल्यास होळकरांचे छावणींतून लिहिलेलें महत्त्वाचें आहे. पुढें जयपुरावरून सरदार अंतर्वेदींत गेले, सफदारजंगाचें साह्य करून मर्दुमी दाखविली, जयपुरच्या कत्तलीची क्षिति दाखविली नाहीं हें त्यांच्या शिपाईबाण्यास योग्यच झालें. मात्र राजपूत–मराठयांचें वैर कसें वाढत गेलें तें या प्रकरणांत दिसून येतें. §

§ पे. द. २'३१ व. २७' ६४, ६५

७

# अंतसमयाची छाया

## कालसूची

१७३४ नोव्हें० २६ चाफळकर गंगाधरस्वामी मृ.
१७४० डिसें० २४ विरूबाई मृ.
१७४३ जाने० ६ जिवाजी खंडो चिटणीस मृ.
,, मे १३-जून २० शाहूची प्रकृति चिंताजनक.
१७४५ उभयतां राण्यांनीं वागण्याची याद महाराजांनीं लिहून दिली.
१७४६ एप्रिल–ऑगस्ट कोल्हापुरकर संभाजीचा मुक्काम साताऱ्यास.
,, ऑगस्ट २ महाराजांस ताप येऊं लागला.
,, ,, १२ सकवारबाईची कन्या गजराबाई व तिचा नवरा मल्हारराव यांचा सरंजाम ठरवून दिला.
,, ऑगस्ट २० संभाजीची साताऱ्याहून परत रवानगी.
,, नोव्हें० २५ श्रीपतराव प्रतिनिधि मृ.
,, डिसें० ५ सदाशिवरावाची कर्नाटकांत रवानगी.
,, ,, १५ जगजीवनराव ऊ० दादोबा प्रतिनिधि यास वस्त्रें.
१७४७ जाने० पेशव्याचें शाहूस दटावणीचें पत्र.
,, ,,–मार्च नानासाहेब पेशवाईवरून दूर.
१७४७ मार्च ७ पेशव्यानें महाराजांस भेटून नजराणा केला.
,, एप्रिल १३ नानासाहेबास वस्त्रें, हत्ती देऊन शाहूनें पदापन्न केलें.
,, ,, १५ शाहूनें पेशव्याचे डेऱ्यास जाऊन भेट दिली.
मे १ रघूजी साताऱ्यास आला सगुणाबाईनें वस्त्रें दिलीं.
,, मे ९ सदाशिवराव स्वारींतून परत येऊन जेजुरी येथें पेशव्यास भेटला.
,, ,, २४ नानासाहेब पुण्यास दाखल.
,, जून ७ आबाजी नायकाची बायको भिऊबाई वारली.
,, जुलई शेटी मलीककडून नानासा० चे आचरणाचा गुप्त तपास.

| | | | |
|---|---|---|---|
| १७४७ | ऑक्टो० | २५ | नारो आपाजीस पुण्याचे कारभारावर नेमलें. |
| ,, | डिसें. | ७–जुलई १७४८ | पेशवा नेवाईचे स्वारींत. |
| ,, | ,, | | मुराररावं घोरपडे कोल्हापुरास दाखल, तेथें मुक्काम २९ फे० १७४८ पावेतों. |
| १७४८ | | | शाहूचा मुक्काम वनवासवाडी. |
| ,, | जून | २१ | रामोजी शिर्के, सकवारबाईचा बाप, वारला. |
| ,, | ,, | | बाबूजी नायकानें समस्त कुटुंबासह विष प्राशन केलें, उतार पडला. |
| ,, | जुलई | १५ | महाराजांस वृषणाचा विकार. |
| ,, | ऑगस्ट | २५ | सगुणाबाई राणी जेजुरीस मृ० |
| १७४९ | फेब्रु० | १० | नानासा० व रघुनाथराव शाहूजवळ कोरेगांवास आले. |
| ,, | मार्च | ९ | विश्वासरावाची मुंज पुण्यास. |
| ,, | ऑगस्ट | २१ | सिंदे होळकर व फौज घेऊन पेशवा साताऱ्यास गेला. |
| ,, | ,, | | महाराजांस वनवासवाडींतून रंगमहालांत आणलें. |
| ,, | सेप्टें० | ५ | अनुष्ठानास ब्राह्मण बसविले. |
| ,, | ऑक्टो० | १ | महाराजांनीं राज्यव्यवस्थेचा लेख स्वहस्तें लिहून दिला. |
| १७४९ | ऑक्टो० | | शाहूनें रघूजीस त्वरेनें साताऱ्यास बोलावलें. आला नाहीं. |
| ,, | डिसें० | १५ | शाहू महाराज मृ० शाहूनगर. |
| १७५० | | | नारोराम मंत्री मृ०, पुत्रास पद दिलें. |

# ७

# अंतसमयाची छाया

१ नैराश्याचा उद्वेग — २ आमची सत्ता उडाली
३ नानासाहेब पदभ्रष्ट — ४ अंतर्बाह्य खटपटी
५ वनवासवाडी — ६ पुढील धन्याचा शोध

**१ नैराश्याचा उद्वेग.**—स. १७४३ पासून शाहूची प्रकृति बरीच ढासळली. त्या वेळीं त्याचें वय ६१ वर्षांचें होतें. त्या सालच्या उन्हाळ्यांत तारीख १३ मे पासून २०जून पावेतों त्याचा वाखा जोरांत होता, त्याच कारणामुळें नानासाहेबास प्रयागच्या स्वारींतून तातडतोब साताऱ्यास यावें लागलें. परंतु ही विकृति लवकरच निखालस बरी झाली. ता. २५ मे १७४३ रोजीं 'प्रथम दरबारास आले तेव्हां लोकांनीं सत्के व नजरा केल्या.' † लोकांस समाधान झालें. तरी पण हें दुखणें म्हणजे शाहूच्या उत्तरावस्थेचें पूर्वचिन्ह होतें. या पुढें आणखी सहा वर्षें शाहूची आयुष्यमर्यादा वाढली तरी त्यास पुत्रसंतान $ नसल्यामुळें, खुद्द त्याच्या मनास व एकंदर मराठमंडळास भावी स्थितीसंबंधानें उत्तरोत्तर मोठी चिंता उत्पन्न झाली; आणि पुढील व्यवस्था ठरविण्याकडे सर्वांचें चित्त वेधलें गेलें. अर्थात् तितक्या मानानें पेशव्याचे व प्रमुख सरदारांचे महाराष्ट्राबाहेरील उद्योग ढिले पडूं लागले. तो काळच एकमुखी कारभाराचा होता. सर्वांस नियंत्रण घालणारा कोणी तरी एक स्वामी वर असणें राज्यास अवश्य होतें. एका मुख्य व्यक्तीच्या कर्तबगारीवर राज्याचें हिताहित अवलंबून होतें. यास्तव स. १७४३-४४ पासून शाहूच्या मृत्युनंतर एक दोन वर्षें पावेतों मराठे सरदारांचें व्यवधान राजधानींतील अंतर्व्यवहारांकडे लागलें, त्याचा परिणाम राज्यास थोडाबहुत अपायकारक झाल्याशिवाय राहिला नाहीं. प्रत्यक्ष नानासाहेबांचें चित्त शाहूच्या अस्वास्थ्यामुळें व राजधानींतील खटपटींमुळें द्विधा होऊन, प्रयागच्या स्वारींत जी त्याच्या हिंमतीनें जोराची भरारी मारिली, ती पुढें नऊ दहा वर्षें पावेतों पुष्कळ नरम पडली. स. १७५२-५३ पासून

† शा. रो. ९१

$ "श. १६४९ प्लवंग संवत्सरीं शाहूला सगुणाबाईचे पोटीं पुत्र झाला. नांव संभाजी राजे ठेविलें. पण तो तीन वर्षांचे आंत वारला." म. द. रु. १ पृ. १३२

पुनः त्याच्या परराष्ट्रीय उद्योगास जोराचें भरतें आलें. या दृष्टीनें स. १७४३ पासून ५२ पर्यंतचा काल बाह्यव्यवहारासंबंधानें आंतबस्याचा गणला पाहिजे. या काळांत कित्येक प्रचंड घडामोडी निर्माण झाल्या. नादीरशहा मरण पावला तेणें करून अहमदशहा अबदालीचें प्रस्थ वाढलें. दिल्लीचा बादशहा व निजामुल्मुल्क मरण पावले त्या प्रसंगाचा योग्य उपयोग करून घेण्याचें स्वातंत्र्य पेशव्यास उरलें नाहीं. सिंदे होळकरांनीं राजपुतांच्या व्यवहारांत हात घातला, त्यामुळें मराठे-राजपुतांचें सख्य भंग पावलें. एकंदरींत औत्तरीय कारभारांत जो जम बाजीरावानें बसविला, तो नानासाहेबास सांभाळतां न येऊन तिकडे बिघाड उत्पन्न झाला त्याचें पर्यवसान पानिपतावर व्यक्त झालें.

बाजीराव व नानासाहेब यांच्या परिस्थितींत पुष्कळ अंतर होतें. बाजीरावाच्या वेळेस शाहूची प्रकृति चांगली असून राज्याचीं कामें त्याच्याच हुकमानें होत असत. परंतु वर सांगितल्याप्रमाणें स. १७४६ पासून राज्याच्या बाहेरच्या काळजीबरोबर शाहूच्या प्रकृतीची व पुढील घडामोडींची जबरदस्त चिंता नानासाहेबाचे पाठीमागें लागली. शाहूची ढासळलेली प्रकृति, त्याच्या राण्यांचीं भांडणें,ताराबाईचीं कारस्थानें व सरदारांचे कावे, इत्यादि कारणांनीं नानासाहेबाचे मनास अशी जबरदस्त व्यग्रता उत्पन्न झाली, कीं दुसरा एखादा लेचापेचा गृहस्थ या अडचणींतून निभावूं शकला नसता. परंतु नानासाहेबास जसे जबरदस्त प्रतिस्पर्धी होते, तसेच पुरंदरे, शिंदे, होळकर, चिटणीस वगैरे कित्येक त्याच्या जिवास जीव देणारे सहायक होते, त्यांच्या साह्यानें व अंगच्या धूर्ततेनें नानासाहेबानें अडचणींचें निरसन करून, एकंदर कारभार प्राप्त परिस्थितींत पुष्कळसा यशस्वी करून कसा दाखविला, हें समजून येण्यासाठीं दरबारांतील भानगडींचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. †

इ. स. १७४६ हें वर्ष नानासा० नें बहुतेक साताऱ्यासच काढिलें. त्या वेळची हवाल त्यानें ता. २१ ऑक्टोबर, स. १७४६ रोजीं रामचंद्रबाबास कळविली. तो लिहितो,

" दरबारचा मजकूर विस्तारानें सरदारांस लिहिला आहे त्यावरून कळेल. आमचा गुंता आजपर्यंत दरबारांत व्हावयास कारण, रा. स्वामींचें सरकार

† नानासाहेबाच्या या वेळच्या विवंचना पु. द. ले. १५ व त्या पुढील कित्येक कागदांवरून कळून येतात.

कर्जदार झालें; राण्यांचे खर्च अनिवार, नित्य कथळे. यास्तव राजश्रींनीं आपले कारभाऱ्यांस ताकीद करून बंदोबस्त करतात.

" घरच्याच कारभारांत राजश्री स्वामी दंग आहेत. त्यांहीं होऊन आम्हांस निरोप द्यावा, तर ते आपले कारभारांत निमग्न. आम्ही विनंति करावी तर, त्यांची मर्जी दिक्क पाहून आज पावेतों चर्चा न केली. राहत राहत गोष्ट राहिली. आम्ही निरोपाच्या विचारांत आहों. रा. स्वामींची मर्जी पाहून, निरोप घेऊं, परंतु यंदां येणें आमचें तिकडे होतें असा विचार नाहीं. निरोपासच किती दिवस लागतील तें न कळले. निरोप घेऊन पुण्यास आल्यावर, कोंकणचा वगैरे कारभार करणें लागेल."§ नानासाहेबाची माळवा बुंदेलखंडांत जाण्याची इच्छा असून, शाहूच्या प्रकृतीमुळें तो साताऱ्यास अडकून पडला. नानासा० आपल्या जवळून दूर गेला, तर मागें आपलें येथें कसें होईल, याची विवंचना शाहूस लागली. कर्जाचा जाच व राण्यांच्या भानगडी अशा स्थितींत एकटा नानासा०च काय तो शाहूचा आधार होता. निदान नानाच एकटा हरएक प्रसंग निभावून नेणारा आहे, दुसरा तसा इसम आपले जवळ नाहीं, अशी शाहूची त्या वेळीं पूर्ण भावना झाली होती. वरील पत्रानंतर दोन महिन्यांनीं दुसरें पत्र नानासा०नें रामचंद्रबाबास लिहिलें.

" दरबारचें वर्तमान व राजश्री श्रीपतराव निवर्तलियाचा अर्थ पहिला तुम्हांस लिहिलाच आहे. उभयतां महालचें अति प्राबल्य झालें आहे. त्याचा विस्तार कोठवरी लिहावा ! आम्ही युक्ति करून रेटणें तें रेटतों. कांहीं ऐकावें लागतें. कांहीं करून देतों म्हणतों. या रीतीचा येथील विचार आहे."

स. १७४६ ता. २५ नोव्हेंबर रोजीं श्रीपतराव प्रतिनिधि साताऱ्यास मरण पावला. त्याजवर शाहूचा लोभ विशेष होता आणि आपला जुना व फार दिवसांचा घरोब्याचा सोबती गेल्यामुळें शाहूस पराकाष्ठेचें दुःख होऊन आपलीही आतां इहलोकची यात्रा संपली असें वाटूं लागलें. प्रतिनिधीची स्त्री राधाबाई परमपतिव्रता होती, तिनें सहगमन केलें.‡ श्रीपतरावास मूल

§ का. सं. प. या. ५५, ६७

‡ महाराजांनीं आपल्या वाड्यांत बाईस आणून वस्त्राभरणें देऊन मोठ्या समारंभानें दानधर्मसहित सरकारांतून देऊन व्यवस्था लाविली. 'प्रतिनिधीस राव असें स्वमुखें म्हणत होते. नित्य सरकारदर्शनास येत. एक दिवशीं आले नाहींत म्हणोन महाराजांची स्वारी त्यांचे वाड्यांत गेली- तीन लक्ष खर्च करून महाराजांचे राज्यांत एक अन्नछत्र

[ पुढील पानावर समाप्त

नसल्यामुळें त्याचा धाकटा भाऊ जगजीवनराव ऊर्फ दादोबा यास शाहूनें ता. १७ डिसेंबर, १७४६ रोजीं, प्रतिनिधिपद दिलें आणि यमाजी शिवदेव यांस त्याचा मुतालिक नेमिलें. या यमाजी शिवदेवानें पुढें पेशव्यांशीं मोठा विरोध केला.

गंगाधर स्वामी चाफळकर ता. २६ नोव्हेंबर स. १७३४ रोजीं सातारा मुक्कामीं समाप्त झाले, त्यांस पुत्र लक्ष्मणबावा ते मठाधिपति झाले, त्या समयीं तंटे झाले ते मिटविण्यासाठीं स्वतः महाराज रामनवमीचे उत्सवास चाफळास गेले; तेथील बखेडा मोडून एक मुक्काम करून, ललिताचा प्रसाद घेऊन स्वारी परत आली. नारो राममंत्रीही शाहूचे पश्चात् स .१७५० त वारला. जिवाजी खंडेराव चिटणीस ता. ६ जानेवारी स. १७४३ त वारला.¶ अशा रीतीनें संबंध जुनी पिढी हळूहळू नाहींशी होऊन शाहूस मोठी उदासीनता प्राप्त झाली. दोघां बायकांचे भांडणाचा विकोप तर कळसास पोंचला.

विरुबाईस शरीरीं पीडा झाली. ती ता.२४ डिसेंबर स.१७४० रोजीं वारली.† मदारी म्हणून महाराजांचा एक आवडता हत्ती होता. सर्व काळ मस्तींत असूनही कोणास इजा करीत नसे ऐसें दौलतींत केवळ रत्नच होतें. तो रात्रीस सुटून बाहेर जाऊन शनवारांत विहीर होती, तींत पडून मेला, याजमुळें महाराज बहुत खिन्न झाले. या उपरी आमचा पुढें काल विपर्यास येईल. वार्धक्य आलें, संतान नाहीं, संभाजीराजे आहेत तेही वृद्ध झाले त्यांसही संतान नाहीं, म्हणून बहुत यागी झाले.

**२ आमची सत्ता उडाली.**—उभयतां राण्या विरूबाईचे आज्ञेंत चालाव्या असें होतें. त्या वारल्यावर थोरली धनीण सकवारबाई उग्र प्रकृतीची होती, ती

घालावें. त्याची याद करीत प्रतिनिधि बसले होते. महाराज येतांच त्यांचे हातांत प्रतिनिधीनें याद दिली. महाराजांनीं पाहून ती याद फाडून टाकिली आणि कांहीं एक उत्तर न देतां परत वाड्यांत गेले. प्रतिनिधीला अचंबा वाटला आणि पुनः दर्शनास गेले, तेव्हां क्षमा मागितली. त्यावर महाराज बोलले, तीन लक्षांची थोडकी याद केली म्हणून फाडून टाकिली आणि अठरा लक्षांची नवीन याद करून माहुली येथें अन्नछत्र घालण्यासाठीं नऊ लाख व स्वतः प्रतिनिधीस नऊ लाख अशी सनद करून दिली. भा. व. श. व म. द., रुमाल १ ला.

† पे. द. ८.४८, रा. खं. ३ ले. १८

¶ शा. म. ब. पृ. ८३, व पुरंदरे रो. खं. ६, पौष वा। ७ सत्का. ९ पृ. ३९९.

महाराजांपासून सरंजाम व नेमणूक करून घेऊन वागूं लागली. धाकटी धनीण सगुणाबाई यांजकडेही सरंजाम नेमणूक केली ती महाराजांचे आज्ञेत व मर्जीनें वागत असे. परंतु थोरली धनीण बहुत नाजूक यामुळें आग्रह करणें पडूं लागलें. एकीकडे दिलें तें दुसरीकडे पाहिजे, ऐसे आग्रह पडले. गांवांतील शहरांतील मनसुबी व फिर्यादी यांच्या हिमायती पडूं लागल्या. गांवखंडणी, अमल पाहिजे तेथें पाठवावा, वतनें विकत घ्यावीं, ऐसें होऊं लागलें. यावरून महाराज बहुत उदास झाले. प्रधानपंतांस आणवून दोहींकडे गांवनेमणूक करून, खर्च पाहून कसून देऊन, शहरांत फिर्याद किंवा वतन घेणें, अंमल पाठविणें, कांहीं एक कारभार दोही वाड्यांकडून होऊं नये, कोणाची भीड मनसुबी करूं नये, ऐशी यादी प्रधान यांजपासोन लिहून आपलें खास दस्तुर करून, निक्षून दोहींकडे ताकीद केली. तें मान्य दोहींकडे करविलें. एक दिवस एका महालांत भोजन, एक दिवस एकीकडे ऐसें केलें. ‡ हे तंटे तोडण्याच्या हेतूनें शाहूनें दोनही वाड्यांनीं वर्तणूक करण्याची याद स. १७४५ त तयार केली ती येणेंप्रमाणें,—

१ उभयतांनीं इनसाफ करूं नये; २ नक्त गांव, परगणा, जमीन जें स्वामीनीं देणें तें उभयतांस बरोबर द्यावें; ३ जो सरंजाम सरकारचे सनदेखेरीज उभयतांनीं धरिला असेल, स्वराज्यांतील व परराज्यांतील, तो सोडावा; ४ गांव, खेडें, परगणे, जिल्हेदारांकडील, मोकासदाराकडील, खासगीकडील, स्वराज्यांत, परराज्यांत, रोखे करूं नये; ५ सरंजाम गांवखेडें परगणा जमीन धरूं नये; ६ कोणाचें वतन देशमुखी पाटिलकी घेऊं नये; ७ ज्यास देणें वाड्यांत, नजर, गांव, खेडें, तें उभयतांस बरोबर द्यावें; ८ पेठ शाहूनगर येथील कज्ज्या मनास आणूं नये; ९ कोणाचें कर्ज कोणाकडे असेल, तो फिर्याद आला तरी त्यांत चित्त घालूं नये; १० जागाजागांची जकातीची परगण्यांची कमावीस करूं नये.' सदरहूप्रमाणें उभतांनीं मान्य केलीयास स्वामी निरंतर संतोषी आहेत. येणेंप्रमाणें चालावें. करार.

'सौ. श्रीमंत सगुणाबाईसाहेब यांस सरंजाम दिल्हा त्याची याद--सुरू सन खंमस आर्बैन मया व आलफ. पुणें व जुन्नर प्रांत खेरीज करून, खानदेश गंगथडी वगैरे प्रांतांत, रुपये दहा हजार, तनखा कमाल रु. पंधरा हजारांचे द्यावे. मोकासबाबती, सरदेशमुखी मिळोन तनख्याचे गांव नेमून द्यावे. $

‡ शा. म. च. पृ. ८८. $ ऐ. प. ३८, ३९, ४४

दोघी बायकांच्या कलहांत शाहूची त्रेधा कशी उडत असे त्याचें वर्णन एका पत्रांत मोठें गमतीदार दिलेलें आढळतें. हें पत्र साताऱ्याहून महादोबा पुरंदऱ्यानें पेशव्यास लिहिलेलें ता. २ आगस्ट, स. १७४६ चें आहे. ' सांप्रत राजश्री स्वामींची प्रकृत तरी तिसरे प्रहरापासून अंग मोडून येत असतें. पोटावर बिब्याच्या फुल्या घातल्या आहेत. ऐसेंही असतां, दोनही वाड्यांतील नित्य एक दुसरा कजिया ठेवलेलाच आहे. कजिया असा जालियास असे घाबरे होतात कीं गर्भगळित. देव मरण लवकर देईल तर उत्तम म्हणतात. शरीरास उपाय करावयाची उपेक्षा करीतात. हे गोष्ट फटकळ. दोन्हीं वाड्यातून तुमचें इंगित समजावें, आणि तदनुसार वर्तणूक करावी, हें तरी त्यांचे ध्यानांत येत नाहीं; आणि साहेब तरी कोणाचें ऐकत नाहींत. म्हणोन यशवंतराय महादेव पातनीस एक दोन वेळ बोलले व गोविंदरावही बोलले. परंतु कांहीं सुद्धां जबाब दिल्हा नाहीं. याउपरी वांचून काय करणें आहे म्हणतात. बुधवारीं प्रातःकाळीं नागोजीराव केशवराव दरबारीं होते. राघोरामाचे लोकांनीं शेणवी कर्जदार होता त्यास पैक्याकरितां मारला. त्याचा कजिया दरबारास आला. तो फैसल झाल्यावर राजश्रींनीं म्हटलें, ' हाच कजिया देवडीवर जाता आणि आपाजी रघुनाथ यांस नेऊन मारते तर कसें होतें ? माझे बळावर कोन्हीं जाऊं नये. आमची सत्ता उडाली. स्वामित्व दोहीं वाड्यांत आलें. तीं जीं करतील तें आमचे वस्तु नको म्हणवत नाहीं. कासार व परालाचा कजिया उपस्थित केला आहे. वाणी हरताळ पाडितात तें माझ्यानें सांगवत नाहीं. वाणी वगैरे आज उठोन गेले, तेव्हां कबूल करील. सबदा ( जेवणाचें शिधासामान ) मिळेनासा झाला तरी, मजपुरतें तरी माझ्या बायकांकडून मजला जेऊं घालतील तें पुरवलें. परंतु बायकांशीं कजिया माझ्यानें होत नाहीं. गजराबाईची नांदणूक उत्तम व्हावी, आपण पहावी, हा आपला संकल्प होता. परंतु थोरले धनिनींचे मर्जीस्तव जावाई आदिकरून वाड्यांस तंबी दिली कीं नाहीं ! मग वरकड कळतच आहे. या उपरी माझे वस्तु कांहीं होत नाहीं म्हणून बहुतच भाषण केलें. सारांश इतकाच कीं, वाड्यांतील मजकुराविषशीं राजाच्यानें तिलप्राय बोलवत नाहीं. तीं जें म्हणतात तें हे बरें म्हणतात. या प्रकाराचा मजकूर झाला आहे. याच समयांत या दोहों तिहीं दिवसांत गोसावी व साहुकार येरझारा घालूं लागले आहेत. आमचीं दिवाळीं निघावयास आलीं, याउपरी पैका पाहिजे, म्हणोन तगादा करितात. आज उद्यांच येऊन बसले तरी

फजितीस कारण, म्हणोन राजश्रींनीं घोसरा घेतला आहे. हाच मजकूर दोनही वाड्यांत ऐकतों. दुश्चिन्हें दिसतात. वाड्यांत कोणता परिणाम कसा लागेल ते पाहवें.'

"राजश्री स्वामी दोहीं महालच्या कज्ज्यांमुळें व खर्चाच्या तगाद्यामुळें दिक आहेत. आपला खासगी ऐवज तरताबुडता पाहत असतात. निरंतर दिक. दोहीं वाड्यांतील भीड मोडत नाहीं. स्वामींस लग्नामुळें, व संसार-कृत्य दोहीं महालचे खर्च विशिष्ट वाढले, कर्ज मब्लग जाहलें. आमचें कर्ज तुम्हाविना कोण वारणार, तुम्हीच माझे आहां, असें बोलले." असें पेशवा स. १७४६ त लिहितो. ‡

**३ नानासाहेब पदभ्रष्ट.**—छत्रपति दरबारच्या अशा स्थितींत भावी राज्यव्यवस्थेसंबंधानें मंडळींचीं मनें चिंताक्रान्त होऊन नानाप्रकारच्या खटपटी सुरू झाल्या. हळूहळू शाहूच्या मनावर पेशव्याचा ताबा ज्यास्त बसत चालला, तो हाणून पाडण्याकरितां खटपट करणारा दुसरा एक पक्ष निर्माण झाला. रघूजी भोसले, राणी सकवारबाई, प्रतिनिधींचा मुतालिक यमाजी शिवदेव आणि दाभाडे गायकवाडादि कित्येक सरदार असे अनेक पेशव्याचे विरुद्ध असून, ते वेळीं अवेळीं शाहूचें मन पेशव्याबद्दल कलुषित करण्याविषयीं टपलेले असत. रघूजीच्या साशंक वृत्तीसंबंधानें वर स्वतः नानासाहेबानेंच एका पत्रांत उल्लेख केला आहे. स. १७४५ च्या ऑगस्ट पासून पुढें दोन वर्षे नानासाहेब लांब कोठें न जातां पुणें साताऱ्याचे बाजूसच राहिला. ता. ५ डिसेंबर १७४६ रोजीं सदाशिवरावाची रवानगी कर्नाटकांत झाली, त्याच्या उद्योगावर नजर ठेवीत स. १७४७ च्या आरंभीं नानासाहेब साताऱ्यास होता. ता. १३ एप्रिल रोजीं निरोपाचीं वस्त्रें घेऊन तो निघाला, तो पंढरपुरास जाऊन ९ मे ला जेजुरीस आला, तेथें सदाशिवराव कर्नाटक स्वारींतून परत येऊन भेटला. पुढें उभयतां २४ मेला पुण्यास आले. जून महिन्यांत थेउरास तुलादान वगैरे होऊन सेप्टेंबरांत सिद्धटेकास जाऊन, रस्त्यानें जानोजी निंबाळकरास भेटून पेशवा परत पुण्यास आला. ता. २५ ऑक्टोबरला नारो आपाजी तुळशीबागवाले यास पुणे सुभ्याची दिवाणगिरी सांगितली; आणि सिंदेहोळकर दक्षिणेंत आले होते त्यांस भेटून उत्तरहिन्दुस्थानांत जाण्यास निरोप दिला. नंतर १० डिसेंबर सन १७४७ पासून ९ जुलई १७४८ पावेतों

‡ पे द. १८. ८५, ८६

पेशवा स्वतः उत्तर हिन्दुस्थानचे स्वारींत गेला, ती नेवाईची स्वारी म्हणून प्रसिद्ध आहे. स. १७४८ त ता. २५ ऑगस्ट पासून १४ सेप्टेंबर पावेतों नानासाहेब साताऱ्यास होता. आपण जवळ राहिल्यानें शाहूला मोकळेपणानें व्यवस्था करतां येत नाहीं, शाहूच्या मनावर दडपण पडतें, तें न पडावें व शाहूनें वाटेल ती राज्याची व्यवस्था निर्भीडपणें ठरवावी ह्या हेतूनें बहुधा नानासाहेब साताऱ्याच्या बाहेर परंतु नजीकच राहूं लागला. अंतस्थ रीतीनें साताऱ्यास त्यानें आपला बंदोबस्त ठेविला. मात्र तेथील भानगडींत प्रत्यक्ष हात न घालतां काय होतें तें पाहत तो स्वतः दूर राहिला. शिवाय त्यास बाहेर कामही पुष्कळ होतें. नाना बेफाम झाला आहे, तो नेहमीं व्यसनांत दंग असतो, प्रत्यक्ष शाहूसही तो आतां जुमानणार नाहीं, अशी विरुद्ध पक्षानें साताऱ्यास ओरड करून शाहूचें मन कलुषित केलें. तेव्हां खऱ्याखोट्याची शहानिशा शाहूनें केली, तींत ते आरोप खोटे ठरले. दंतकथा सांगते कीं स. १७४६ त एकदां पांचसात हजार फौज घेऊन नानासाहेब साताऱ्यास गेला आणि शाहूची भेट झाल्यावर बाहेर डेऱ्यांत राहिला. तेव्हां अकस्मात् चिटणीस यांस बोलावून महाराजांनीं आज्ञा केली कीं, ‘प्रधान यांस चिठ्ठी लिहावी जे, तुमचें प्रधानपद दूर केलें आहे, तरी शिक्के कटार व जरीपटका हुजरे पाठविले आहेत यांजबरोबर जामदारखान्यांत दाखल करणें.’ प्रधानपंतांनीं चिठ्ठी वाचून, तसेच उठोन शिक्केकटार व जरीपटका हुजरे यांचे स्वाधीन करून रवाना केले; आणि लष्करापासून दूर एक राहुटी देऊन स्वयंपाक करविला; आणि महाराजांस चिठ्ठी लिहिली कीं, ‘सरकारी कारखाना व फौज सरकारची आहे ती कोणाचे हवालीं करावी तें लिहून यावें, त्याप्रमाणें करून पायांपाशीं दर्शनास येतों.’ त्यावरून ‘सरकारकून पाठवितों तोंपर्यंत तेथेंच राहवें,’ असें सांगून पाठविलें. याप्रमाणें आठ दहा दिवस गुदरले. कामें थांबलीं. चहूंकडे हाकाटी सुरू झाली. मुत्सद्दी मंडळींनीं महाराजांस विचारिलें ‘पुढें विचार काय! हिंदुस्थान प्रांतीं वगैरे हे बातमी गेली व जाईल. चहूंकडे सरदार यांचे विद्यमानें आहेत, त्यांत बखेडे आहेत. यास्तव यांजवर कृपा करणें, किंवा दुसऱ्यास पद सांगून आधीं बंदोबस्त व्हावा.’ इकडे नानासाहेबानें चिटणीस व मंत्री यांजपासोन विनंति करविली कीं, ‘आम्हीं एका राहुटीनें बाहेर राहिलों. चरणापाशीं येण्याची आज्ञा व्हावी, किंवा दुसरी सेवा कांही सांगावी.’ तेव्हां उत्तर आलें, कीं ‘नजर काय देतां बोलावें.’ यावर सांगून पाठविलें जे, ‘आम्ही

एकटे येथें आहों, सलतनत सरकारची सरकारांत आली. घर व सर्व जें आहे तें सरकारांत नजर आहे, आणवावें.' याजवर 'प्रधानपद दुसरीकडे सांगावयाचें,' इतकेंच उत्तर केलें. नंतर पुढील पत्र नानासाहेबानें महाराजांस लिहिलें,–"चरणरज बाळाजीनें कृतानेक विज्ञापना. स्वामींनीं चिठी पाठविली तेथें कित्येक खेदयुक्त पर्याय लिहिला तो कळला. ऐशियास आम्ही स्वामींचीं लेंकरें. आम्हांस इतके पर्याय स्वामींनीं लिहावेसें काय आहे? आम्ही स्वामीखेरीज आहों असें नाहीं. जशी आमची निष्ठा पायांशीं असेल तदनुरूप फल. पत्रीं काय लिहावें. हें विज्ञापना." एके दिवशीं अकस्मात् हुजरे बोलावणें पाठविले. बाळाजीपंत एकच खिजमतगारानिशीं येऊन मुजरे करून उभे राहिले; बोलले जे 'पायांपाशीं कोणती सेवा सांगणें ती आज्ञा होऊन पायांच्या वियोग मात्र न व्हावा.' यावरून हे एकनिष्ठ सेवक खरे, यांजपासोन कदापि अंतर पडावयाचें नाहीं. म्हणून सर्व प्रकारचे बहुमान आणून प्रधानपद पुनः दिलें. यांणीं पायांवर मस्तक ठेविलें. बाजीरावाचे पुत्र, बाळाजी विश्वनाथाचे नातू खरे, तुमची सेवा व निष्ठा पाहून बहुत संतोषी जालों, असें बोलिले; आणि पोशाख जवाहीर वगैरे आणखी दिलें.‡

ही हकीगत केवळ आख्यायिका नसून ती खरी असल्याबद्दल पुरावाही आढळतो. नानासाहेबासंबंधानें विरुद्ध पक्षानें शाहूचें मन अति कलुषित केलें होतें. विरुद्ध पक्षाची ही भीति अगदींच निराधार नव्हती. नानासाहेब पेशवाई पदावर राहील तर, शाहूचे पश्चात्, दुसरा कोणीही राजा गादीवर बसला किंवा कोणतीही व्यवस्था झाली, तरी पेशव्याचे हातांत सर्व सत्ता जाणार ही गोष्ट उघड दिसत होती. अशा प्रसंगीं सामान्य जनसमूहाचे मनावर विचारापेक्षां विकाराचाच पगडा ज्यास्त होत असतो. हा प्रश्न केवळ हुशारीचा किंवा कर्तबगारीचा नव्हता. सर्व सरदार व प्रधान मंडळी शाहूच्या आज्ञेंत वागण्यास तत्पर होती, परंतु ती आज्ञाधारकता त्यांनीं पंचवीस वर्षांच्या ब्राह्मण तरुणास काय म्हणून दाखवावी! आजपर्यंत पेशव्यांशीं विरोध करीत असल्यामुळें, पेशव्याच्याच हातीं सगळी सत्ता आली तर ते आपली वाट लावल्याशिवाय राहणार नाहींत, अशी धास्ती राण्यांच्या व इतर मंडळीच्या मनांत निःसंशय वागत होती. यास्तव पेशव्यास सर्वाधिकार न देतां दुसरी कांहीं तरी व्यवस्था ठरवावी; मुधोजी भोसल्यासारखा कोणी तरी

‡ शा. म. च. पृ. ८७–८८ व का. सं. प. या. ४८.

दुसरा धनी राज्यास करावा, अशी खटपट या मंडळींनीं चालविली. शाहू कर्जाच्या पेचांत होता. पेशव्यानें द्रव्यसंचय चांगला केला आहे, अशी सर्वांची समजूत होती. तेव्हां यांचें प्रधानपद दूर केलें म्हणजे सरकारास द्रव्य मिळून, पुढील व्यवस्था निराळी करतां येईल, असा या मंडळीचा घाट होता. बाळाजीराव उघड बंडावा करील, शाहूचा हुकूमही धाब्यावर बसवील, अशी कदाचित् त्यांची अटकळ असावी. परंतु नानासाहेब मोठा धूर्त होता. शाहूचा स्वभाव ओळखून त्याची मर्जी कशी राखावी, हें त्यास उत्कृष्ट ठाऊक होतें. म्हणून त्यानें सर्वस्वी शरण आल्याचा भाव दाखविला. हा प्रकार बहुधा चार दोन दिवसांत आटपलेला दिसत नाहीं. महिना दोन महिने तरी शाहूनें बाळाजीस कुचंबत ठेविलें असावें. मोठासा नजराणा घेऊन कर्ज तरी वारतां येईल अशीही शाहूची अपेक्षा असेल. या भानगडीच्या संबंधाचा एक कागद नानासाहेबानें गोविंदराव चिटणिसास लिहिलेलें पत्र आहे तें असें,—

'आशीर्वाद उपरी. रात्रीं राजश्री स्वामींची गांठ पडली नाहीं म्हणून लिहिलें, ऐशियास ईश्वरी इच्छेस तुमचा इलाज काय! याउपरी तरी खामखा गांठ दुपारीं घालून येणेंप्रमाणें विनंति करणें:—

क. १ दोनही महालांतील गुंते फार करून दूर केले. रोज नवे निघतात त्यांस मात्र आमचा इलाज नाहीं. सांप्रत महालांतील गुंता नाहीं. मोघम बोलले चालले असतील, वारूं. महाराज कर्जाचे मजकुराचा गुंता तो, सर्व विचार ध्यानांत आणून आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक, जेथें असूं तेथें करूं. हुजूर असल्यास आज्ञा मान्य करूं, बाहेर गेल्यास न करूं ही सबब होणार नाहीं. परंतु निभावे ऐशी आज्ञा केली पाहिजे. सांप्रत मनसबा होऊन खचित जाहला आहे. मनसब्याचा कळस रक्षण करावयाचे दिवस थोडे असतात. यास्तव दोहीं वाड्यांत समजून सेवकास निरोप द्यावा. एका दों दिवसांत हा अर्थ उत्तम असें महाराजांनीं कृपा करून करावें.

क. २ महाराजांचे कर्जाचा उरक करावा तेव्हांच जावें, ऐशीच मर्जी असली तर पुण्यास न जातांच, इकडून फिरून सेवेशीं येऊं. सावकाशीनें महाराज कृपा करून पुण्यास व वसईस जावयास आज्ञा देतील तेव्हां जाऊं. या मनसब्याचा डौल पंधरा दिवसां अलीकडे आहे. तेव्हां मालकास, ऐसा गुंता काढल्यानें, मनसबा नासतो. ये समयीं महिना दोन महिन्यांचा निरोप द्यावा. फिरोन सावकाशीं सुमुहूर्त महाराजांनीं देणें तर द्यावा.

क. ३ नायकांशीं कब्जा करावयासी जातां, ऐसा संदेह, जनवार्तेवरून, मनांत वाटला असला, तर त्याविशीं निशा करून घ्यावी. जो तालुका महाराजांनीं नायकास करार केला, त्यांत त्यांनीं जावें. कब्जा करावा हे गोष्ट महाराजांचे हुकमावांचून सहसा होणार नाहीं.

क. ४ चिरंजीव भाऊ तिकडे गेले आहेत. नबाबही तिकडे गेले म्हणजे गोव्याच्या शहास अंतर होऊन, आणखी किरकोळ गुंते तसेच अडकून पडतील. तेव्हां त्याचा लौकीक एक प्रकारें होऊन येईल, हा अर्थ महाराजांनीं ध्यानांत आणावा. सरकारांत भर करूं द्यावा, तो उगवला पाहिजे. सर्वांही गोष्टींत आम्हांवर तोटा पडे असें करावें कीं काय! निदान येथून दो मजलीवर जाण्यास आज्ञा करावी. सर्व फौज व पिलाजी जाधव यांस चिरंजिवाकडे रवाना करितों; आणि सेवेशीं फिरोन येतों.

क. ५ महाराज निरोप देतात हा लौकिक जनांत जाहला. नबाबापावेतों बातमी जाईल. फिरोन दिल्हें हेंही वर्तमान जाईल तेव्हां सर्व प्रकारें आम्ही इतराजींत हा लौकिक जाहला आहे, व बाकी राहिला आहे हाही होईल.

इतके प्रकार निखालसतेनें विनंति केली असतां महाराज ध्यानांत न आणीत तर ईश्वरें या दौलतीवर इतराजी केली अशी जाणावी. मग बाहेरील ही इज्जतीचा दरकार सोडून बसूं. सर्व मजकूर, वरल्या प्रमाणें विनंति करून उत्तर घेऊन येणें." †

या महत्त्वाच्या कागदानें शाहू व बाळाजी यांजमधील तेढीवर व तत्कालीन कारस्थानांवर चांगलाच प्रकाश पडतो. सदाशिवराव भाऊ कर्नाटकांत गेल्याचा यांत उल्लेख आहे. डिसेंबर स. १७४६ पासून मे १७४७ पावेतों सदाशिवराव कर्नाटकांत होता. अर्थात् हें पत्र व बाळाजीवरील इतराजी सन १७४७ च्या पहिल्या दोन तीन महिन्यांतली आहे, हें निर्विवाद सिद्ध होतें. तसेंच पेशव्याकडून शाहूनें प्रधानपद कांहीं दिवस काढिलें ही केवळ आख्यायिका नसून तो प्रकार खरोखरीचा होता; आणि बाळाजीस कारभारांतून समूळ काढून टाकण्याचा त्याच्या प्रतिस्पर्ध्यांचा हा शेवटचा प्रयत्न होता, याविषयींही संशय राहत नाहीं. राण्यांची भांडणें, बाबूजी नायकास पेशव्यानें दिलेला शह, व शाहूचें कर्ज एकदम वारण्याची पेशव्याची असमर्थता, § या तीन मुख्य

† ऐ. प. ६५ व ५९

§ पे. द. २०-४८. कर्जाचे तपशील पु. द. १ ले. २१४–२१८ यांत सांपडतील.

कारणांनीं शाहूचें मन बाळाजीवर रुष्ट झालें. त्यांत प्रतिस्पर्ध्यांनीं भर घातली आणि निदान कांहीं दिवस बाळाजीस बाजूस ठेवून दुसऱ्या कोणाकडून कारभारांत जास्त सुधारणा होते कीं काय, हा प्रयोग शाहूनें एक वार करून पाहिला. त्यानें रघूजी भोसल्यास साताऱ्यास बोलावून आणिलें, पण रघूजीनें राज्य सांभाळण्याचें नाकारल्यानें शाहूनें पुनः नानासाहेबास रुजू केलें. या एकंदर भानगडींत बाळाजीचे दोन तीन महिने मोठ्या विवंचनेंत फुकट गेले. शाहूची व त्याची भेट होत नव्हती; आणि दुसरी कांहीं व्यवस्थाही अंमलांत येईना, अशा संदिग्धावस्थेंत व फिकीरींत नानासाहेबाचे कांहीं दिवस गेले. 'दरबारचा मजकूर तर हा काल पर्यंत आमचा उलगडा झाला नाहीं. मोठा बखेडा थोरले महालचा आहे. तो गुंता कळेल त्या रीतीनें उरकावा या प्रयत्नांत आहों. प्रसंग अनिवार फार, यास्तव गुंता आहे,' असें पेशवा रामचंद्रबाबास लिहितो. मुख्य बाबत शाहूच्या कर्जाची होती. आपण कर्जमुक्त होऊन मग मरावें, दुसऱ्याचे ऋणांत राहिल्यास पुढील जन्मीं यातना होतात अशी शाहूची भावना होती. बाळाजीनें उत्तर हिंदुस्थानांत वगैरे स्वाऱ्या करून पैसा जमविण्याची शिकस्त केली; पण कर्ज वारण्याइतकी निपज झाली नाहीं. या कर्जाशीं दोन्ही राण्यांचाही संबंध असावा, आणि पेशव्याच्या हातून कर्ज वारत नाहीं, उगाच वायदे करून व पोकळ गप्पा सांगून पेशवा वेळ मारून नेत आहे, अशी दोन्ही राण्यांनीं शाहूची समजूत करून दिली. आपला काळ समीप येत चालला, सावकार दाराशीं धरणें धरून बसले, आतां पुढें निभाव कसा लागणार, याची विवंचना शाहूस लागली.

बाबूजी नायकासंबंधानें शाहूनें केलेली आज्ञा झुगारून देऊन उलट बाळाजीनें त्याचा छळ चालविला, अशी वार्ता शाहूच्या कानावर गेली. तुमच्या डोळयांदेखत जर पेशवे तुमची अशी अवज्ञा करतात, तर तुमच्या पश्चात् काय प्रकार होणार, अशी धास्ती मंडळींनीं शाहूस घातली. येणेंकरून शाहूचें मन फार संतप्त झालें. बाबूजी नायकाच्या प्रकरणानें शाहूच्या रोषांत भर घातली. गोविंदराव चिटणिसाचें व पेशव्याचें सख्य होतें. निदान कोणत्याही पक्षांत स्वतः उचल न घेतां, प्रत्येक बाजूचें व इसमाचें म्हणणें निर्विकार मनानें महाराजांपुढें ठेवून जशी आज्ञा होईल त्याप्रमाणें बरोबर निकाल देणें, हें काम गोविंदराव चिटणीस योग्य प्रकारें बजावीत होता.

त्याजबरोबर पेशव्याची बोलाचाली रोजच्या रोज चालू होती. तरी साफीचा जबाब पेशव्यास मिळेना, तेव्हां कंटाळून जाऊन शेवटचें निक्षून बोलणें म्हणून वरील कलमें त्यानें गोविंदराव चिटणिसास लिहिलीं. पैशाच्या प्राप्तीकरितांच बहुधा सदाशिवराव भाऊस सखाराम बापूच्या स्वाधीन करून पेशव्यानें कर्नाटकांत रवाना केलें. निदान शाहूचें समाधान करण्याचा कांहीं तरी विशिष्ट मनसुबा पेशव्यानें रचिला, परंतु त्यास शाहूनें साताऱ्यास अडकवून ठेवल्यामुळें, ऐन यशःप्राप्तीच्या वेळेस तो मनसुबा बिघडत चालला, म्हणून थोडे दिवस मला बाहेर जाऊं द्या, शक्य असेल अशी आज्ञा मला करा, अशीं आर्जवें पेशव्यानें गोविंदराव चिटणिसाच्या मार्फत महाराजांकडे केलीं. इतकेंही करून महाराज आपणास स्थापन करून ताबडतोब बंदोबस्त न करतील तर ईश्वरें या दौलतीवर इतराजी केली, म्हणजे शाहूच्या या कृत्यानें आजपर्यंत केलेला सर्व उद्योग फुकट जाऊन राज्याचें सर्वस्वी नुकसान झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी स्पष्ट धमकीही नानासाहेबानें या पत्रांत शाहूस दिली आहे. अलबत शाहूनें हें पत्र लक्षपूर्वक वाचून, पेशवा धडपड करतो त्यास हे लोक आडकाठ्या घालितात, परंतु दुसरी एखादी व्यवस्था सुचवून आपल्या अडचणींचा निरास करून राज्याचें ओझें अंगावर घेण्यास कोणी पुढें होत नाहीं, अशी शाहूची खात्री पटून, त्यानें बाळाजीस पुनः कारभारावर रुजू केलें आणि त्यास बाहेरच्या उद्योगावर पाठवून दिलें, तो प्रकार असा.

शाहू कांहीं केल्या मनांतील तेढ सोडीना, तेव्हां त्रासून दबकावणीचा शेवटचा उपाय म्हणून नानासाहेब तसाच बाहेर पडला. ता. २० मार्च रोजीं 'आम्हीं वडुथाहून कुच करून बुधास आलों, तुमची वाट येथें पाहत बसलों आहों,' असें तो पिलाजी जाधवास लिहितो. रुसून बाहेर पडल्यानें हा कांहीं तरी भलताच अर्थ करील असें जाणून, शाहूनें नानासाहेबास परत बोलावलें; आणि स्वतः त्याच्या तंबूवर जाऊन त्यास वस्त्रें व निरोप दिला.

ता. ७ मार्च स. १७४७ रोजीं रघुनाथराव साताऱ्याहून सदाशिवरावास लिहितो, 'काल संध्याकाळीं ती० नाना व आम्ही सारे दरबारास गेलों होतों. तीर्थरूपांनीं वस्त्रें नजर केली. त्यावर बाईकडे गेलों, तेथेंही वस्त्रें नजर केलीं. दुसऱ्या दिवशीं दों घटका दिवसास दरबारास गेलों, त्यावर तीर्थरूपांस वस्त्रें दिलीं. आम्हांस ठेवावयाची आज्ञा झाली. त्यावर फतेसिंगबाबांच्या डेऱ्यास गेलों. घरास येऊन जेऊन शिकारीस जाणार तों राजश्री आमच्या डेरियाहून

चालले. म्यां धाऊन जाऊन अर्ज केला कीं डेरियास चलावें. तीर्थरूपांनीं वस्त्रें थोडींबहुत व जवाहीर नजर केलें. पुढें शिकारीस गेलों. प्रतिनिधींचेंही आजच कूच जाहलें. उद्यां तीर्थरूपांच्या कुचाची वार्ता आहे. मग आम्ही राजश्रीच्या दर्शनास जाऊं.$ यावरून नानासाहेबावरील शाहूची इतराजी दूर झाली हें उघड होतें. पिलाजी जाधवास नानासाहेबानें १५ एप्रिल १७४७ रोजीं पत्र लिहिलें तें असें. 'राजश्री स्वामींचा निरोप जाला नव्हता, याजकरितां रा० स्वामींनीं माघारें बोलावून नेलें. या उपरी आमचे डेरियास आले. त्यांस वस्त्रें दिलीं. दुसरे दिवशीं छ १२ रबिलाखरीं रविवारीं म्हणजे ता. १२.४.१७४७ रोजीं राजश्री स्वामीनें हत्ती दिल्हा. आम्हांस खर्चाबद्दल सरंजाम द्यावा, वरकड सर्व मोघम ठेवून निरोप मात्र जाहला. या उपरी तुम्हींही मजल दरमजल येणें, भेटीनंतर सर्व वर्तमान कळेल. पुढें विचार आचार बोलणें ते बोलून तुम्हांसही जावयास निरोप देऊं. तरी सत्वर यावें. तुम्हीं खटावेस येणें जाणीजे. श्रीकृपेनें उत्तम प्रकारें रंग उतरला. बहुत काय लिहिणें.' यावरून नानासाहेबावरील शाहूची इतराजी दूर झाली हें उघड होतें. बाळाजीनें शाहूचें अवसान जोखलें, त्यास लगेच थोडेंसें निरंकुशत्व प्राप्त झालें, आणि या सत्तेच्या जोरावर ताबडतोब एकएका प्रकरणाचा निकाल करण्यास त्यानें सुरुवात केली.

नानासाहेब सातान्याहून निघाल्यावर लवकरच सदाशिवराव कर्नाटकचे स्वारींतून आला, तेव्हां शाहूच्या कर्जाची व्यवस्था कांहीं तरी त्यानें लाविली असावी. कारण यापुढें कर्जाच्या बाबतीचा उल्लेख आढळत नाहीं. शाहूची मर्जी नानासाहेबावर पूर्वीहून ज्यास्त बसली. एवढाच काय तो आपला आधार असें समजून त्याजवर शाहूनें सर्व भार व कामें सोंपवून मरणापूर्वी स्वस्थ चित्तानें शाहूनें राज्याची निरवानिरव केली; आणि पुनरपि विरोधकांच्या म्हणण्याकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं.

ता. १२ एप्रिल १७४७ रोजीं गुढी पाडव्यानंतर निरोपाचीं वस्त्रें घेऊन बाळाजी सातान्याहून निघाला तो पंढरपुरास जाऊन ९ मेला जेजुरीस सदाशिवरावास भेटून उभयतां ता. २४ मे रोजीं पुण्यास दाखल झाले. निरोपाचीं वस्त्रें घेतल्याचा वरील एकच प्रसंग शकावलींत नमूद आहे, त्यावरून आणि 'उत्तम प्रकारें रंग उतरला' या शब्दांवरून कांहीं दिवस तरी नानासाहेब

$ पे. द. ३१. १३७; ऐ. प. ७५

स्थानभ्रष्ट झाला होता हें सिद्ध होतें. विरोधकांनीं समोर आघात करून पाहिला तो सिद्धीस गेला नाहीं, तेव्हां पेशव्याच्या परोक्ष त्याच्या दानतीवर त्यांनीं आघात सुरू केला. हा आघात व त्याचें निरसन खालील पत्रांत दाखल आहे. नाना वं तथा भाऊ पेशवे यांस पत्र महादवा पुरंदरे याचें,—

'पु. ती. नाना व तथा राजश्री भाऊ स्वामींचे सेवेशीं विनंती. शेटी मलीक स्वामींकडून येथें आला त्याजबरोबर पत्र पाठविलें तें पावलें. शेटींनें राजश्रीस वर्तमान सविस्तर स्वामींकडील सांगितलें. महाराजांनीं सर्व ऐकून मागती येकीकडे शेटीस नेऊन पुसिलें. त्यानें सांगितलें कीं, पेशवे सुखरूप आहेत. काम कारभार पूर्ववत् प्रमाणेंच होत आहे. आपल्या बंदोबस्तानें आहेत. ब्राह्मणांचे हात तोडिले, कलावंतिणी राखिल्या, दारू पितात, धुंद जाहले, म्हणून महाराजांनीं ऐकिलें होतें, परंतु सर्व शोध बारकाईनेंही घेतला व दिसानेही सर्व आला. अगदीं बाष्कळ. नाना बहुत खबरदार आहेत. तेव्हां महाराज बोलले कीं लंवडीचे लोक भलतेंच सांगतात. सर्व लटकें. नाना खुशाल आहे कीं ? तेव्हां हा ( शेटीमलीक ) म्हणाला कीं खुशाल आहेत. महाराज बोलले, इतकेंच असलें म्हणजे जाहलें. नाना जिवानें खुशाल असला म्हणजे सर्व बरें आहे. लोकांचे आम्ही मजकूर कोठे मानतों. तूं सांगतोस हें खरें. बारांना वाईट नाना. माझा तेवढा माझा चाकर पदरीं माझे मातबर आहे. सुखरूप असला म्हणजे जाहलें. मग शेटी म्हणाला, कीं सुखरूप आहेत. हें वर्तमान शेटीनें येथें येऊन आम्हांजवळ सांगितलें. खरेंच आहे. परभारें शेटीनें जेव्हां राजश्रीजवळ स्वामींचें पत्र दिल्हें, महाराजांनीं वाचलें, दरबारीं लोक फार होते, यास्तव शेटीला म्हणाले, इकडे ये. तुला वर्तमान पुसावयाचें आहे. असें सदरेस बोलून, पलीकडे शेटीला घेऊन गेले. वर्तमान पुसिलें. यानेंही सांगितलें. हेंही वर्तमान राजश्री गोविंदराव यांनीं सांगितलें कीं, नानाचें वर्तमान पुसावयासीं शेटीस याप्रमाणें पुशिलें; व जाबसालही उत्तम जाहला. आतां महाराजांचे निदर्शनास आलें. इतक्या उपरी राजश्री दरबारीं काय चर्चा करितात; व बाईजवळ काय करितात हेंही येक दो दिवशीं कळेल. तदुत्तर सेवेशीं लिहीन.' ¶ गोविंदराव चिटणीस नानाची तरफदारी करतो, यावरून

¶ ऐ. प. ६१; पे. द. १८.८७; भा. व. पु. २ शा. म. ब. पृ. ७९, ८३. ८५

यासारखेंच एक पत्र पेशव्यांच्या नालस्तीचें वर्तमान,–नारायणराव घोरपड्यानें नानासाहेबास लिहिलेलें रा. वासुदेव विष्णु जोशी सातारा याजकडून मिळालें आहे. यावरून जनवार्तेत पेशव्यावर निंद्य आरोप होते एवढें खरें.

नानाविषयीं त्याचे मनांत आदर होता, आणि त्याच्या कर्तबगारीची त्यास खात्री होती, हें उघड होतें. पुरंदरे कदाचित् पेशव्याचा पक्ष अंधश्रद्धेनें उचलून धरील, पण गोविंदराव चिटणिसास तसें करण्याचें प्रयोजन नव्हतें.

वरील पत्रांत उल्लेखिलेला शेटी मलीक उर्फ शेख्याबा दाजी संकपाळ हा शाहूच्या मर्जीतला खिजमतगार विश्वासु व गुप्त कामगिरीवर पाठविला जात असे. केव्हांही व कोठेंही जाऊन शाहूची गांठ घेण्यास त्यास प्रतिबंध नव्हता. अखेरच्या दुखण्यांत राणी सकवारबाई शाहूची गांठ पेशवेचिटणिसांना पडूं देईना, ती पुढें या शेख्याजीचे मार्फत पडूं लागली.

**४ अंतर्बाह्य खटपटींना ऊत.**—प्रत्यक्ष शाहूच्या दरबारची स्थिति वर सांगितलीच आहे. कोंकणांत आंगरे बंधू नाहीं नाहीं त्या कारवाया करीत होते. कोल्हापुरकर संभाजी व राणी जिजाबाई मुरारराव घोरपड्यास हाताशीं घेऊन साताऱ्यावर झडप घालण्यास टपलेली होती. मुराररावास शाहूजवळून सेनापतिपद मिळविण्याची हाव होती. रघूजी भोसले देखील कमी उपद्व्यापी नव्हता. प्रसंग आला तर आपल्या पुत्रास छत्रपतिपद मिळविण्याची त्याची इच्छा होती. उत्तरेंत सिंदे होळकरांनीं राजपूत युद्धांत पडून नवीन जोखीम स्वीकारलें होतें. निजामुल्मुल्क व त्याचे पुत्र मराठ्यांचें उणें पडून केव्हां आपण त्याचा फायदा घेतों या उद्योगांत निमग्न होते. खुद्द दिल्लीवर अब्दाली चालून आल्यानें तिकडील मराठे वकील व सरदार घडोघडी पेशव्यास जास्तच विवंचनेंत पाडीत होते. खुद्द शाहूला अंथरुणावर पडल्या पडल्या सर्व ठिकाणच्या बातम्या ऐकाव्या लागून त्याचे पोटांत सारखें धस्स होत होतें. पेशव्यानें घटकाभर दूर जाऊं नये, तो दूर गेला तर आपलें कसें होईल ही चिंता त्यास चैन पडूं देत नव्हती.

स. १७४६ एप्रिलांत पेशवा रामचंद्रबावास लिहितो. "आम्ही व सारी फौज साल मजकुरीं घरीं राहिलों. नित्य संबंध कर्जाशीं. कर्ज घेईन म्हटल्यास ऐवज कोणापाशीं नाहीं. तरी हरकसा वसूल करून ऐवज ताबडतोब पाठवून देणें. येथील संसाराचा डौल तुमचे ध्यानांत आहेच. दरबारचा मजकूर तरी अद्यापि प्रथम दिवस असे. संभाजी राजे बाबूजी नायकाकरितां अडले आहेत, त्यांस राजश्री स्वामींनीं आम्हांस जामीन व्हावयाची आज्ञा केली. आम्हीं मान्य केलें. संभाजी राजे यांस १३ साबानीं (२० ऑगस्ट स. १७४६ रोजीं) निरोप दिल्हा. दोन हत्ती, पांच घोडे, १ समशेर, चार पोषाख दिल्हे. एकादों

रोजीं कूच करून जातील.''¶ त्याप्रमाणें संभाजी निघून गेल्यावर बाबूजी नाईक साताऱ्यास महाराजांचे दर्शनास आला. त्यानें संभाजीचे तालुक्यांत खंडण्या घेतल्या याजकरितां संभाजी महाराज नायकाची तक्रार सांगण्याकरितां पांचसहा महिने येऊन साताऱ्यास अडून बसला. नायकास बोलावणें पाठविलें तो आला नाहीं. दरम्यान पेशव्यानें जामीनगिरी पत्करिली तेव्हां संभाजी निघून गेला. पुढें नाईक साताऱ्यास आला. शाहूनें त्याचा निषेध केला, "त्यावरून स्वामींच्या दारीं बसून उपोषणें आरंभिलीं, यामुळें महाराज फारच सक्रोध झाले. मध्यस्थास रोज शिरपाव होतात. ईश्वरें काय परिणाम नेमला असेल नकळे." अशी ही बाबूजी नाईक व संभाजीची रड शाहूस अखेरपर्यंत पुरली. ता. ७ जून स. १७४७ रोजीं बाजीरावाची बहीण भिऊबाई आबाजी नायकाची बायको वारली, तेणेंकरून पेशवेनायकांचा आप्तपणा तुटला. जून स. १७४८ त "बाबूजी नायकांनीं विष घेतलें होतें, पैकीं आबाजीचें व थोरले बायकोचें उतरलें. बाबूजीस उतार पडत नाहीं. अवस्था कठिण आहे." †

पांच सहा महिने संभाजी साताऱ्यास राहिला त्या अवधींत शाहूच्या पश्चात् काय योजना होणार त्याची चर्चा व रामराजाचा तपास इत्यादि गोष्टी संभाजीस अवगत झाल्या. त्यांत पेशवा व संभाजी यांचा गुप्त करार पूर्वी झालेला कायम असल्यामुळें संभाजी व जिजाबाई निर्धास्त होतीं. पुढील दहा वर्षांत त्यांनीं पेशव्याला लिहिलेल्या अनेक पत्रांत या कराराची आठवण दिलेली आढळते. राणी सकवारबाईचा पाठिंबा संभाजीस होता. ताराबाई रामराजास उभा करून भलतेंच कारस्थान रचील अशी अटकळ त्या वेळीं फारशी कोणास नव्हती. पण उत्तरोत्तर या रामराजाच्या निर्मितीनें इतर विषय मागें पडले, तो प्रकार अन्यत्र वर्णिला आहे. शाहूच्या मृत्युसमयीं सहगमन करतांना देखील सकवारबाईनें मोठ्या कळकळीनें संभाजीला राज्यावर आणा, भलतेंच खूळ उभें करूं नका असा इशारा दिला.

बाबूजी नाईक व संभाजी यांस पेशवा पुरा पडला, तसेंच रघूजी व मुरारराव घोरपडे या दोन सामर्थ्यवान व्यक्तींसही त्यानें निरुपाधिक बनविलें. या कामीं त्या उभयतांजवळ पेशव्याचे जिव्हाळ्याचे हस्तक सारखी कारवाई करीत बसले होते. रघूजी काय किंवा मुरारराव काय दोघेही परिस्थिति ओळखून, अंतर्यामीचा थांग बाहेर लागूं न देतां प्रसंग पडेल तसा वर्तनक्रम

¶ ऐ. प. ४९, ५३

† पु. द. १. १६९

ठेवीत होते. पेशव्याचें सामर्थ्य ते पूर्ण ओळखून असल्यामुळें त्याजविरुद्ध डाव त्यांनीं अंगावर घेतला नाहीं.

स. १७४७ च्या मे महिन्यांत रघूजी साताऱ्यास आला, त्याच सालच्या पहिल्या दोनतीन महिन्यांत पेशव्यावर शाहूची इतराजी होऊन त्यास अल्पकाळ पेशवाईवरून दूर करण्यांत आलें होतें. यावरून अनुमान होतें कीं पेशव्यास दूर करून रघूजीचे स्वाधीन राज्यभार करावा अशी व्यवस्था शाहूनें सुचविली, पण त्यासंबंधानें रघूजीचें व पेशव्याचें बोलणें होऊन राज्यकारभाराचें जोखीम रघूजीनें पत्करिलें नाहीं.* कान्होजीचा पुत्र रायाजी याचें व रघूजीचें भांडण निकरावर आलें होतें. ता. १ मे १७४७ चें वर्तमान. 'रघूजीबावांस धाकटे बाईनें वस्त्रें दिलीं, परंतु येथेंच आहेत. रायाजी भोसल्याचे सरंजामाचे कटकटीचा वेध लागला आहे, तो निर्गम जाला म्हणजे रघूजीचें जाणें होईल.' पुढें रघूजी निघून बंगालचे उद्योगास गेल्यावर शाहूनें ऑक्टोबर स. १७४९ त म्हणजे मरणापूर्वी दोन महिने रघूजीस तातडतोब साताऱ्यास बोलावलें, कीं 'तुम्हीं आपल्या मुलकांत बंदोबस्त करून येथें येणें, सर्व भरंवसा तुमचा आहे.' पण रघूजीचा निश्चय एकच कीं "आपण पहिलेंच पेशव्याशीं शपथपूर्वक सख्य केलें आहे त्यास अंतर नाहीं. पेशवे आज्ञा करतील त्याप्रमाणें आपण वर्तणूक करूं." शाहू मेल्यानंतर रामराजानें रघूजीस बोलावलें तेव्हांच तो स. १७५० च्या एप्रिलांत साताऱ्यास आला आणि पेशव्याचे तंत्रानें वागला. "रघूजीचा मिजास तों पाऱ्यासारखा, नलिनीपत्रावरील जलबुंद," असें त्याचें वर्णन एका लेखकानें केलेलें आढळतें. †

निजामाचे दरबारींही असेच घोटाळे स. १७४७-४८ त चालून त्याच्या सरदारांची चलबिचल झाली. महाराव जानोजी निंबाळकर रघूजी विरुद्ध तक्रार करण्यासाठीं साताऱ्यास आला. 'धनिणीस त्यांचें अगत्य बहुत आहे' असें गोविंदराव चिटणीस लिहितो. स. १७४७ तच महादाजी अंबाजी पुरंदरे याजला दगा झाल्याचें वर्तमान शाहूकडे आलें. हा काय प्रकार झाला त्याची स्पष्टता आढळत नाहीं. निजामुल्मुल्क वारल्यावर ऑक्टोबर स. १७४८ त नानासाहेबानें नासिरजंगाची भेट घेऊन त्याच्याशीं प्रेमभाव जोडिला. ‡

* ना० भो० ब० नवीन आवृत्ति पृ० ६३-६४

† पे. द. भा. २० ले. ३२, ४८, ५४, ५५, ५७, ५८ वगैरे.

‡ पे. द. २३. १६, १७; १८. ९०

मुरारराव घोरपडे त्रिचनापल्ली सोडल्यावर गुत्तीस येऊन राहिला होता, त्यास संभाजी व जिजाबाई यांनीं राज्यांतील बखेडे मोडण्याच्या निमित्तानें स. १७४७ च्या डिसेंबरांत कोल्हापुरास आणिलें. अर्जोजी जाधव वडगांव वगैरे ठाणीं दाबून बसला होता, त्यास मुराररावानें येऊन सडकून नरम केलें आणि जिजाबाईचा अंमल सुरळित करून दिला. बरोबर साडेतीन हजार स्वार व तीन तोफा होत्या. "पूर्वीं बाजीराव पेशव्यांचे वेळेस निजामांनीं पन्हाळकर महाराजांस हातीं धरून उपद्याप केला, तोच मनसुबा पुनः आहे," असें एक लेखक सांगतो. मुराररायांचे मिष्ट भाषणानें संभाजी व जिजाबाई मोहग्रस्त होतात. बाईसाहेब कुचाळे करणार फार, स्थिरबुद्धीची नव्हत." अशीं कारस्थानें कोल्हापुरास चाललीं, त्यांत लक्ष न घालतां मुरारराव स. १७४८ च्या मार्चांत परत कर्नाटकांत गेला. त्यानंतर स. १७४९ च्या नोव्हेंबरांत प्रधानपंत व सकवारबाई यांचा कटाक्ष फार वाढला. सकवारबाईनें संभाजीस त्वरेनें साताऱ्यास बोलावलें, त्यावर संभाजीनें उत्तर दिलें, "साताऱ्यास जाऊन सकवारबाईचा पक्ष स्वीकारावा तर पंतप्रधानांचे स्नेहास अंतर पडतें. ते राज्यांत भारी, सबब आम्ही तूर्त जात नाहीं. तसाच प्रसंग आला तर दहा वीस हजार फौज घेऊन पंतप्रधानांशीं मिलाफ करूं." यावरून स्पष्ट होतें कीं पेशव्यानें बाहेरचीं सर्व संधानें उत्कृष्ट सांभाळून आपली योजना भक्कम केली होती. भाऊसाहेबानें कर्नाटकच्या स्वारींत मुराररावाचा स्नेह कायमचा करून ठेविला होता.‡ मुडागडावर तुळाजी आंगऱ्याशीं प्रतिनिधि, सावंत वगैरेचें युद्ध झालें, त्यांत तुळाजीची मदत करण्यास मुराररावास संभाजीनें भर घातली, पण तो या भानगडींत पडला नाहीं. मिळून प्रत्येक वजनदार इसम शाहूच्या अंतकाळीं आपल्या ठिकाणीं सावध राहिला.

तमाम राज्यांतील जाणत्या मंडळींचें लक्ष शाहू काय योजना ठरविणार या प्रश्नाकडे लागलें होतें. एकट्या पेशव्याशिवाय राज्यास आळा घालीलसा नाहीं, त्याचाच आश्रय संपादणें श्रेयस्कर असा सर्वसामान्य ग्रह फैलावलेला होता. सदाशिवरावानें कर्नाटकांत जाऊन बाबूजी नायकाचा धुव्वा उडविला हा प्रकार उघड दिसत असून नानासाहेबापेक्षांही सदाशिवरावाचें कर्तृत्व जास्त खरमरित दिसूं लागलें. त्यांजकडे जिजाबाईनें संधान बांधून व स्नेहभाव

‡ पे. द. २८.५७; पे. द. २६.१५, १६, १७, २३, २४, ३२, ११४, २२९. पे. द. २४.२५

दर्शवून शाहूच्या पश्चात् सातारची गादी संभाजीस मिळावी, निदान सदाशिवरावास कोल्हापूरची प्रधानकी देऊन एकमुखी कारभार करावा अशी कांहींतरी खटपट चालविली. स. १७४८ त ती सदाशिवरावास लिहिते. 'पूर्व संदर्भानुरूप तुम्हांकडे दादंभट श्रोत्री यांस पाठविले आहेत. अविलंबें कार्य दृष्टीस पडावें, लौकिक उत्तम दिसोन यशास पात्र तुम्ही व्हावें म्हणून गतवर्षापासून अंगेजणी केली आहे. स्वराज्य कर्तव्यार्थ पेशजी बोली जाहली आहे, करारबाज यादी लिहून दिल्या आहेत, त्याप्रमाणें साहेबांचे निदर्शनास यावें आणि राज्योपयोगी मनसबा घडे तें व्हावें, ऐसें रा. बाळाजी पंडित प्रधान यांस तुम्ही सांगून त्वरेनें करावें. साहेब मध्यस्थ, तुमची निष्ठा दृढतर हा भरंवसा साहेबांस आहे. साहेबांचा तुमचा करारबाज कोणे प्रकारचा आहे, स्वराज्याविशीं पंडित मशारनिल्हे यांचे मांडीचें उसें केलें आहे, तरी सांगोपांग चित्तांत आणून योजिलें कार्य शीघ्र होय तें करणें.'' § कोल्हापुरच्या या भानगडी व व्यवहार स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे.

**५ वनवास-वाडी.**—शाहूचा स्वभाव फार नाजूक व त्रासिक झाला होता. नागोराव मेघश्याम व त्याचा वडील बंधु देवराव शाहू संनिध असत. ता. २५ ऑक्टोबर स. १७४७ च्या पत्रांत नागोराव लिहितो. 'ती० देवराव यजमानांचा निरोप घेऊन इंदापुरास गेले. त्यांच्या गळयावर हात ठेवून यजमानांनीं समाधान केलें. रात्रंदिवस माझे देवडीस तुम्हीं श्रम फार केले, असें बोलून अंगावरील चौशाला अंगावर टाकिल्या. दरबारची मर्जी बहुत नाजूक झाली आहे. फार माणूस सोसत नाहीं. बाई मात्र जवळ असतात. कोणी बोलावल्या वेगळे जावें असें नाहीं. सुखानंद भेटीस जात होते, त्यांसही यजमान उपरोधिक बोलले, त्यावरून त्यांनीं जाणें येणें सोडिलें. काल आम्हांस व रायांस थोरले वाड्यांतून सात आठ बोलावणीं आलीं. त्रिवर्ग गेलों. बाईनीं बहुतच प्रलाप केला. निदान पंचवीस लाख रुपये माझे राजाकडे आहेत ते मागतात. रोकड मागतात, चिठ्या घेऊन काय करूं म्हणतात. आम्हीं त्रिवर्ग येऊन राजश्रींस विनंति केली. त्यांनीं सर्व गोष्टींचें वारापाणी केलें. लग्नाची योजना चित्तांत फार आहे. दोन तरी अगत्यरूप करणार. ¶ विरूबाईचें थडें माहुलीस बांधावयास आरंभ करविला. प्रतापगडीं जाऊं

§ पे. द. २६.१८, २१, २६, २३२, २४०.

¶ ही लग्नें बहुधा रक्षाकन्यांचीं असावीं. त्यांचीं नांवें पुढें सांगितलीं आहेत.

म्हणतात. बनलें तर जेजुरीस जातील. बाबूजी नाईक भेटीस येणार होते' त्यांस मना करविलें. इ० " सर्वच पत्र वाचण्यालायक आहे. $

स. १७४८ त पुरंदरे पेशव्यास लिहितो, " धाकटे बाईस एकदोन दिवस कपाळ दुखून ज्वर येत होता. सांप्रत ज्वर येतो. कपाळ दुखतें. बोलवत नाहीं. बहुत हैराण आहेत. वैद्य म्हणतात कीं व्यथा लौकर उलगडेलसी दिसत नाहीं. फारच घाबरी होतात. उतार न पडे तर स्वामींस यावें लागेल. आम्ही प्रत्यहीं जात असतों, बहुतच गलाटलीं आहेत." ‡

ता. २३ जून स. १७४८ चें वर्तमान. " राजश्री स्वामी मेळ्याची स्वारी पूर्ण करून परावृत्त व्हावें तों रामोजी शिर्के व्येथेनें बहुत दाटले, म्हणून लष्कर सहित जुन्या कळंब्यावर आले. तेथें दहा पंधरा मुकाम झाले. त्यानंतर पर्जन्यानें आपला उद्योग अत्यंत आरंभिला. श्रेष्ठांनीं ग्रामप्रवेश केला. आम्हीही समागमें होतों. बहुतसा विराग दाखविला. राजगृहप्रवेश भोजनादिक संपादून मागती रामोजीबावांस पाहून लष्करास गेले. नदीस पाणी आलें. उभयतांचा वियोगही एक दिवस जाला. तदुत्तर गोडोलीवास नेमिला. तेथें अंतःपुरास गृह नेमिलें. आपल्यास तृणगृहच योजिलें आहे. सर्वांनीं यथांशें आपापलीं घरें दाक्षिण्यास्तव तृणाचीं घातलीं आहेत. देवरावजी मात्र नेहमीं जवळ राहतात. निदानीं उपाय करितां करितां रामोजीबावा षष्ठीचे रात्रीं पंचत्वाप्रत पावले.¶ यथास्थित माहुलीस नेले. चातुर्मास गोडोलीवरच होणार. छप्परें घालावयाचा शुगुल ( हव्यास ? ) आहे. शिकार तों सहज स्वभावच. धनीण दहा रोज घरींच वाड्यांत आहेत. त्यांची खेप द्विवार होत असते. राजजीय देवकीय चर्चा चालते ती स्वामींस विदित आहेच. कर्नाटकाविशीं अंतःकरण पुत्राचे ठायीं आहे." यानंतर ता. २५ ऑगस्ट, स. १७४८ रोजीं सगुणाबाई वारली.

उत्तरोत्तर महाराजांनीं संसारांतून आपलें लक्ष सर्वथा काढिलें आणि हिंदुधर्माला उचित असा वानप्रस्थाश्रम पत्करिला. " पुनः साताऱ्यास राहवयास जावयाचें नाहीं, श्रीकृष्णातीरींच वास करावयाचा म्हणून सातारा व माहुली यांचे दरम्यान छपरबंदी करून राहूं लागले. त्यास वनवासवाडी म्हणत. याप्रसंगीं धाकटी धनीण सगुणाबाई यांचे शरीरीं व्यथा निर्माण झाली.

$ पे. द. १८.८८ ‡ पे. द. १८-१५३

¶ रामोजी शिर्के सकवारबाईचे वडील ता. २१ जून स. १७४८ रोजीं वारले, मुलीच्या सहगमनप्रसंगीं जिवंत नव्हते.

त्यास उपाय व अनुष्ठानें वगैरे लक्षावधि खर्च करविला. परंतु आरोग्य न होय. यांजवरून बहुत उद्विग्न जाले. नंतर श्रीजेजुरीस महाराजच त्यांस घेऊन गेले. तेथेंही अनुष्ठानें व दानधर्म बहुत करविला. आयुर्दाय संपला. समाप्ति जाली, ( २५ आगस्ट, स. १७४८ ). त्याच दिवशीं शव घेऊन निघाले ते दुसरे दिवशीं तिसरे प्रहरीं माहुलीस आले. दहन करून समाधि बांधून पूजेची व्यवस्था केली.‡

धाकटी राणी गेल्यावर शाहूला घरांतील प्रेमाचें मनुष्य कोणीच उरलें नाहीं. त्याची प्रकृतिही दिवसेंदिवस अगदीं खंगली. ता. १५ जुलै स. १७४९ चें पुढील वर्णन आढळतें.

" राजश्रींचें वृषण सुजले. नारू किंवा वायुविकार. प्रथम दिवशीं मुसलमान तबीबांनीं लेप लाविला होता. शेकीत बसले असतां राजश्रींना मूर्च्छना आली. बापूजी बाबांनीं पलंगावर चढोन धरिलें. तोंड उघडून तोंडांत पाणी घातलें. अर्ध घटकेनें किंचित् पित्त पडलें. चोघटकांनीं सावध झाले. वैद्य व पंचाक्षरी अवघे जमा केले. दर्याबाईही आली. आज तीन रोज सूज आहे तशी आहे. "$ 'अधिक मासांत महाराजांस अनारोग्यता प्राप्त झाली,' असा आणखी उल्लेख आहे. स. १७४९ त भाद्रपद अधिक मास होता. म्हणजे ऑगस्टांत चिन्ह वाईट दिसूं लागलें, तेव्हां शाहूनें पेशव्यास फौज घेऊन साताऱ्यास बोलाविलें. त्याजवर शाहूचा विश्वास पुत्रवत् असून तोच एकंदर राज्यास आळा घालण्यास समर्थ होता.

**६ पुढील धन्याचा शोध.**—संपादिलें राज्य संरक्षण कसें होईल ही चिंता महाराजांस लागली. संभाजी राजे आहेत. पण तेही वृद्ध जाले व त्यांसही संतान नाहीं, म्हणून भोसल्यांच्या घराण्यांतील चांगलीं मुलें आणवून निश्चय करावा असें योजिलें. त्यास सकवारबाई व प्रतिनिधि यांचें बोलणें निराळें पडलें. विठोजीराजांचे आठ पुत्रांचा वंश आहे व शरीफजी राजांचा वंश आहे, त्यांत चांगला मूल कोण, राजचिन्हें व बुद्धिलक्षणें वगैरे शोध करण्यास माणसें पाठविलीं. परंतु सकवारबाईनें यमाजी शिवदेवाचे साह्यानें निराळीं राजकारणें चालू केलीं. महाराजांचा सर्व भरंवसा गोविंदराव चिटणीस, यशवंतराव पोतनीस व देवराव मेघश्याम यांजवर. हे जवळ राहून कारभार करीत. त्यांत ताराबाई किल्ल्यावर नजरकैदेंत होती त्यांनीं सांगून पाठविलें, 'दुसरें

‡ शा. रो. ९५ व ९८; शा. ब. $ पे. द. ८.६०, ६३

मूल कां पाहतां! माझे पुत्र शिवाजी राजे यांचा मूल मी गुप्तरूपें ठेविला असोन राज्यास धणी करावा.' त्यावरून बाहेरचीं मुलें आणलीं त्यांचा निश्चय राहिला. ¶

राज्याला आवरणारा योग्य धनी शोधण्यांत शाहूनें अतोनात कष्ट केले. उदेपुरास त्या वेळीं राजा जगत्सिंह राज्य करीत असून त्याला नाथाजी नांवाचा धाकटा बंधु होता. त्या नाथाजीस शाहूनें सातान्यास आणिलें. राजपूत मराठ्यांचें निकट ऐक्य जमवून आणावें अशा उद्देशानें शाहूनें राणा जगत्सिंहास कळविलें, आपले बंधु नाथाजी यांस आम्ही दत्तक घेऊन मराठी राज्याचे मालक करितों, तर आपली मान्यता द्यावी. ही शाहूची विनंती राण्यास पोंचते तोंच बागोरच्या जागिरीवर राणाजीनें नाथाजीची स्थापना केली, तेणेंकरून शाहूची इच्छा पुरी होऊं शकली नाहीं. ‡ याचप्रमाणें कुशलसिंह नामक एका राजपूत क्षत्रियास शाहूनें दत्तक घ्यावें आणि त्याचे नांवानें बादशहानें माळवा प्रांत करून द्यावा, अशी खटपट सवाई जयसिंगा-मार्फत शाहूनें केली होती, अशी माहिती जयपुर अखबारांत मिळते.

"संभाजीराजांत आवरशक्ति व बुद्धिवैभव नाहीं, याकरितां दत्तपुत घेणें प्राप्त. सबब ताराबाई साहेबांनीं मूल गुप्तरूपें ठेविला आहे त्याचा शोध आणविणें. बाहेरचा केल्यास पुढें निभावणीस कलह पडतील, म्हणून आईसाहेबांकडे गोविंदरायास पाठवून सर्व मजकूर लिहून आणविला, त्यावर स्वहस्तें लिहून ठेविलें. बावडेकर भगवंतराव अमात्यास आणिलें. यशवंतराव पोतनीस व गोविंदराव चिटणीस यांस पाठवून भगवंतरायाची खातरजमा करविली. श्रीकृष्णेसंनिध त्यांस शपथ घालून विचारलें. मूल खरा अशी खातरजमा जाली. त्यावर बोलले, 'आमचे मागें या मुलास धनी करून त्यांचे

¶ अंतसमयींच्या भानगडी सांगणारे अनेक कागद उपलब्ध असून अलीकडील संशोधनानें व चर्चेनें शंकाकुशंकांचें निरसन झालेलें असल्यामुळें तात्पर्यार्थानें मुख्य मुद्दे या कलमांत दर्शविले आहेत. शाहूमहाराजांच्या दोन बखरी, एक मल्हारराम-रावकृत व दुसरी भारतवर्षांत छापलेली, यांशिवाय शेडगांवकर बखर ठाण्याचे भाव्यांनीं प्रसिद्धलेली, भारतवर्षांतील अमात्यांची व प्रतिनिधींच्या बखरी, इतिहास संग्रहांतील सनदांपत्रांतील माहिती, का० सं० प० या० व ऐ० प०, ऐ० टि० भाग १.४२; ऐ० स्फु० ले० ४.५, पेशवे दप्तरांतील निवडक कागदांचे भाग, बावडा दप्तराचे भाग, राजवाड्यांचे खंड, शकावल्या, पेशव्यांच्या रोजनिशा इत्यादि मुबलक साहित्य जिज्ञासूंनीं पहावें.

‡ वीर विनोद खं. २ पृ १५८१–८२; ना. रो. १.२२९.

आज्ञेत चालून राज्य रक्षावें.' हें वर्तमान सकवारबाईस समजलें. आपणास ताराबाईचे आज्ञेंत राहवें लागेल यास्तव आपण दुसरा दत्तक घेऊं, ऐशीं बोलणीं बोलून सकवारबाई बहुत रोषेंकरून निराळीं राजकारणें करूं लागली. कारभारी मंडळी धरावी, कैद करावी, वाटे लावावी, अशीं खलबतें ठायीं ठायीं होऊं लागलीं; ताराबाईचा नातू खोटा, हें ताराबाईचें थोतांड आहे अशी मसलत केली. महाराजांनीं विश्वासु कारकून व स्वार पानगांवी रवाना केले. यावरून धनिनीचा रोष प्रधान, चिटणीस, देवराव यशवंतराव यांजवर बहुत जाला. त्यांनीं यमाजीपंतास विचारांत घेऊन फौज जमविली; संभाजीराजांस आणण्याचें राजकारण केलें. ताराबाईचा बंदोबस्त करावा यास्तव किल्लेदार व गडकरी यांशीं राजकारण केलें. महाराज अत्यंत व्यथित, त्यांजपर्यंत कारभाऱ्यांचा प्रवेश होऊं नये ऐसा विचार करूं लागली. महाराजांनीं समय कठिण जाणून प्रधानपंतास एकान्तीं बोलावून आपले हातची यादी लिहून गोविंदरायाचे विद्यमानें ठराव करून दिला." असा हा बखरींचा मतलब उपलब्ध कागदपत्रांनीं पूर्ण विश्वसनीय ठरतो.

पेशवा सावध होता. महाराजांचे आज्ञेवरून सिंदे, होळकर, जनार्दनबावा वगैरेसह भली मोठी फौज घेऊन तो ता. २१ ऑगस्ट रोजीं पुणें सोडून साताऱ्यास गेला, तो पुढें शाहूचें निधन झाल्यावर अंत्यक्रिया व रामराजाचें राज्यारोहण आटपून एप्रिल स. १७५० त पुण्यास परत आला. अंतसमयीं वनवासवाडींतून राणीसाहेबांनीं महाराजांस रंगमहालांत नेलें, वाड्यांत व बाहेर आपला बंदोबस्त करविला. जागोजाग ब्राह्मण अनुष्ठानास बसविले. § रंगमहालांत परवानगीशिवाय महाराजांजवळ कोणाचाही प्रवेश होऊं नये, प्रधान व चिटणीस यांस येतांजातां दगा करावा ऐसे प्रयोग चालले. याची सावधगिरी पेशव्यानें ठेवून महाराजांच्या आज्ञेप्रमाणें पानगांवचा मूल आणावा हा मनसुबा सिद्ध केला. राणीसाहेब महाराजांस आग्रह करून बोलूं लागली, तेव्हां फौजेविना शेवटास जाणार नाहीं असें महाराज त्यांस बोलले. उभयतांच्या फौजांचा जमाव बनूं लागला. प्रतिनिधि, सेनापति, सरलष्कर, अक्कलकोटकर, बिंबाजी भोसले, रघूजी व मुधोजी भोसले इत्यादींचे घरोघरीं गोविंदराव जातीनें एकटे जाऊन प्रहर प्रहर बसून महाराजांची आज्ञा कळविली, कीं राज्य चालविण्याचा हिय्या कोणाचा आहे ? परंतु त्यावर कोणीही राज्याची

§ रा. खं. ३. ३५०; नारो. १. १२२

जबाबदारी संभाळण्यास कबूल झाला नाहीं. तेव्हां महाराजांनीं राणीसाहेबांस सांगितलें, तुमचा मनसुबा शेवटास जाणार नाहीं. बाईनें गोविंदरावास आपल्या पक्षांत आणण्याची शिकस्त केली. त्यास इनामाच्या सनदा करून दिल्या. ते ऐकेनात. म्हणून त्याचा खून करण्याचा घाट घातला. त्यांत भूलचुकीनें तुळाजी खिजमदगार मारला गेला. बाईनें कोल्हापुराहून संभाजीराजांस फौजा घेऊन बोलाविलें. पण महाराजांनीं बापूजी खंडेरावास त्याजकडे पाठवून तुम्ही या खटल्यांत पडूं नये असें कळविलें, तेव्हां ते माघारे गेले. ¶

महाराजांनीं स्वहस्तानें पेशव्यास दोन यादी लिहून दिल्या त्या महत्त्वाच्या असल्यामुळें पुढें देतों. या यादी स. १७४९ च्या नवरात्रांत ता. १ आक्टोबरच्या सुमारास किंवा दसऱ्यास लिहिल्याचें अनुमान होतें.

**यादी नंबर १**—राजमान्य रा बाळाजी प्रधान पंडित यांस आज्ञा. तुम्हीं फौज धरनें. सर्वांस आज्ञा केली त्यांच्या दैवीं नाहीं. महाराजांस लिखनें जालें नाहीं. बरे होत नाहींत. राज्यभार चालला पाहिजे. तर पुढें वंश बसवनें. कोलापुरचे न करनें. चिटणीसास सर्व सांगितलें तसें करनें. वंश होईल त्याच्या आज्ञेंत चालून राजमंडळ चालवनें. चिटणीस स्वामीचे विश्वास. त्याच्या तुमच्या विचारें राज्य राखनें. वंश होईल तो तुमची घालमेल करनार नाहीं. सुज्ञ असा.

**यादी नंबर २**—राजमान रा बाळाजी पंडित प्रधान आज्ञा जे. राज्यभार तुम्ही चालवाल हा भरवंसा स्वामीस आहे; पहिलें सांगितलें ( त्याची ) खातरजमा, ती चिटणिसांनीं आढळ केली. तुमचे मस्तकीं हात ठेविला आहे; वंश होईल तो तुमचें प्रधानपद चालवील. करील अंतर तर शपथ असे. त्याचे आज्ञेंत चालून सेवा करनें. राज्य राखनें. बहुत काय लिहिनें. सुज्ञ असा

या दोन यादी म्हणजे मराठशाहीच्या सूत्रचालकत्वाची शाहूनें पेशव्यास करून दिलेली सनद होय. ‡

या यादी आतां इतिहास संग्रहांत अस्सल प्रतिकृतींसह छापल्या असल्यामुळें त्या निर्विवाद शाहूच्या हातच्या आहेत, आणि त्यांत पेशव्यास केलेल्या आज्ञा स्पष्ट आहेत. फौज आणून बंदोबस्त करावा, चिटणिसास सांगितल्याप्रमाणें राज्यास नवीन धनी करून पेशव्यानें सर्व कारभार करावा, कोल्हापुरकर संभाजीस आणूं नये, पेशव्याचे संबंधानें संशय आला होता तो चिटणिसानें घालविला, तेव्हां पेशव्याचे मस्तकीं वरदहस्त ठेवून राज्यकारभार इमानानें चालविण्याची आज्ञा शाहूनें केली, ती त्यानें अंमलांत आणिली. अंत समयीं

¶ पु. द. १.३६९ ‡ ऐ. स्फु. ले. ४.५

शाहूनें पेशव्यास बजावलें, कीं " आम्ही देवब्राह्मणांस धर्मादाय, अग्रहार, व खैरखैरात, व ज्यांस, भाऊबंध व गोत्रज व आणखी इतर कुणबी मराठे लोक वगैरे नाना जातीयांस, चाकरीबद्दल, व सरंजाम, व जहागिरा, व गांव, जमिनी, वगैरे लोकांस आम्हीं इनाम देणगी दिली आहे, ती तुम्हीं आमचे पाठीमागें चालवावी. कोणास अटकाव करूं नये. आमच्या हातचें देणगीस बाध आणिल्यास व आम्हीं मान दिलेल्या लोकांचा छळ वगैरे केल्यास तुम्हांकडे पेशवाई पद कायम राहणार नाहीं.' याप्रमाणें सर्व मंडळीस सांगोन, भस्म लावून, रुद्राक्ष धारण करून, दर्भासनावर पांढरी घोंगडी टाकोन, श्रीरामनाम व शिव हरहर असा अकरा वेळ शब्दोच्चार करोन, प्राण आक्रमण करून मिति मजकुरीं, रंगमहालाचे वाड्यांत शहर सातारा येथें शाहूमहाराज छत्रपति कैलासवासीं शांत जाहले."

अशा या एकंदर बनावावरून शाहूनें पुढील व्यवस्थेसंबंधानें आपल्यामतें सर्वांत योग्य अशी योजना निश्चित करून मग आपला देह ठेविला. सकवारबाई वगैरे अंतसमयीं बखेडा करतील सबब रामराजास आपल्या पश्चात् आणावें असें शाहूनें ठरविलें. नाहीं तर त्याच्या अंतसमयीं राजधानींत युद्धप्रसंगच निर्माण झाला असता. पेशव्याची इच्छा कोल्हापुरकर संभाजीस आणून राज्याची दुही मिटाविण्याची होती, ती वरील व्यवस्थेनें सफल होऊं शकली नाहीं. यांत ताराबाईनें मात्र युक्तीनें आपला डाव साधला त्यांत राज्याचें नुकसान कसें झालें तें पुढें दिसून येईल. संभाजीचेंही कर्तृत्व बेताचेंच असून, रामराजापेक्षां त्याचा पराक्रम जास्त झळकला असता असें म्हणतां येत नाहीं. ताराबाईचा संतोष करण्यांतही पेशव्यानें कसूर केली नाहीं. ¶ मुद्दाम नालायक इसम गादीवर आणून पेशव्यानें सत्ता बळकावली असेंही नाहीं. लायक इसम धनी असण्यांतच राज्याचें व पेशव्याचें हित होतें ही गोष्ट स्पष्ट आहे. चिटणीस व पेशवा यांनीं एकमतानें वागून राजाचा सांभाळ केला. सकवारबाईनें चिटणिसाचा छळ चालविला, त्यांतून त्याचा निभाव पेशव्यानें केला. ‡ रघूजीचा पुत्र मुधोजी यास दत्तक घेण्याचा शाहूचा विचार होता. हा राणी सगुणाबाईच्या चुलत बहिणीचा लेक. याचें चरित्र नागपुरच्या इतिहासांत पुढें दिसून आलें त्यावरून मराठी राज्य संभाळण्याची लायकी त्यालाही नव्हती हें उघड आहे. अशा रीतीनें शाहूची कारकीर्द संपून मराठी राज्यांत नवीन क्रान्ति उत्पन्न झाली, तिचें स्वरूप पुढील भागांत व्यक्त होईल.

¶ पहा ता. १९.८.१७४३ चे पत्र रा० खं० ३.१२७

‡ ऐ. प. ८५ व ८७; रा. ख. ६.२४३ व ४५९.

# ८

# योग्यता व निष्कर्ष

## कालसूची

| | | | |
|---|---|---|---|
| १६८२ | मे | १८ | शाहू जन्म. |
| १७०७ | मे | २६ | शाहूच्या मोहोरेचा उपलब्ध कागद. |
| १७१९ | जून | | येसूबाई व विरूबाई दिल्लीहून परत. |
| १७२१ | | | शाहूनगरची स्थापना. |
| ,, | मार्च | २८ | शाहूनगरांत वाड्याची सुरुवात. |
| १७२४ | जाने० | २७ | कृष्णेश्वराचें देऊळ कृष्णराव चास्करानें बांधलें. |
| १७४० | | | शाहूच्या दोघां मुलींचीं लग्नें. |
| | | | तानशेट भुरके यास टांकसाळीचा अधिकार दिला. |
| १७४९ | डिसें० | १५ | शाहूचा मृ. |
| १७५० | जून | | रामराजानें शाहूच्या मुली वाड्यांतून काढून दिल्या. |
| १८५३ | | | विरूबाईची पाषाणप्रतिमा वाहून गेली, पुनः बसविली. |
| १८६५ | | | शाहूचा वाडा विकला गेला. |
| १८७४ | | | रंगमहालचा वाडा जळाला. |

# ८

## पुण्यश्लोक शाहू, पे० नानासाहेब
## योग्यता व निष्कर्ष


१ अंत्यविधि — २ सकवारबाई सहगमन
३ समकालीन लोकमत — ४ कुटुंबपरिवार
५ दिनचर्या — ६ करमणुकी, व्यवसाय
७ सौजन्याचें सामर्थ्य — ८ व्याप
९ पार्श्वभूमि — १० समबुद्धि
११ दोषाविष्करण — १२ लोभांतील मंडळी
१३ शाहूनगर


१ **अंत्यविधि.**—मार्गशीर्ष व॥ ३ भृगुवारीं पुष्यनक्षत्र, शके १६७१ शुक्ल संवत्सरीं ता. १५ डिसेंबर, स. १७४९ रोजीं सकाळीं चार घटका दिवसास विष्णुलोकवास केला.† सर्व जनांस दुःख जाहलें. मनुष्यमात्र लहान थोर दासदासी पदरचे त्यांचा बाप, प्रतिपालनकर्ता, तें दुःख स्मरून क्लेश जाले, ते लिहावयास असमर्थता आली. कारण असा प्रभु दयावंत दुसरा जाला नाहीं. धन्याचे राज्यांत अपराधी झाला तरी, 'हत्यारें करून घ्या,' परंतु 'मारा' असा शब्द ज्याचे मुखीं आला नाहीं. आजानुबाहु, **अजातशत्रु**, पुत्र-मित्र-अरी एकरूप व्यवस्थेनीं वागवावयाचे. कोणास गैर भाषण केलें नाहीं. असा **पुण्यश्लोक** राजा निधन पावला, ते समयीं राव व पंत सर्व लहान थोर जाऊन बसले. एकच हाहाःकार जाला, तेथें यांणीं लोकांस किती समजावून सांगावयाचें. अशा आकांतीं ताराबाई, राजारामसाहेबांची स्त्री, शाहूमहाराजांची चुलती, कैदेंत ठेविली होती, ती पहावयास आली. परंतु रायानें (गोविंदराव चिटणिसानें) तितक्यांत त्यांजवळ जाऊन विनंति केली कीं, 'महाराज आपण धनी, आणि हा प्रसंग पाहूं नये, असें सर्वांचे मनोदयांतून, याजकरितां विनंति करितों, तर आपण आपले ठिकाणीं चलावें, तेथें आज्ञा करावी, जशी आज्ञा होईल, तसें करण्यास नीट पडेल.' असें बोलून तेथें नेऊन बंदोबस्त केला

---

† ना. रो. १.१२३ व रा. श. २

आणि पुढें कसें करावें म्हणोन विचारिलें. त्याचें उत्तर त्यांणीं केलें कीं, 'सकवार राहिल्यास राज्याचा डोहाणा करील, राज्य बुडवील, कोणाचे पाय भुईस लागूं देणार नाहीं, याकरितां बरोबर जाईल तर फार चांगलें, सहगमनाचा विचार कळेल तसा तिनें करावा, मग पुढें विचार करणें तो करावा. करवीराहून संभाजीस आणावयाचें सर्वांचे सल्लेस येणार नाहीं, आणि मीही सल्ला देत नाहीं. माझे सुनेचा मुलगा पानगावांस आहे त्यास आणून गादीवर बसवावा, दुसरें काय.' याप्रमाणें आज्ञा आल्यानंतर येऊन झालेला मजकूर नानासा०स चिटणिसांनीं सांगितला. नंतर प्रतिनिधि, अक्कलकोटकर, दाभाडे, राजाज्ञा आदिकरून लहान थोर एक विचारें मनसोबा ठरला, कीं 'सकवार बाईसाहेबांस सती घालवावी, न जातील तर बळें न्यावी, महाराजांमागें दुर्लौकिक बखेडा करितील; मग विचारीं पडावें, नीट नाहीं, आतांच शेवट केला पाहिजे.' नंतर बाईचे भाऊ चांगले थोर माणूस शहाणे होते, त्यांस बोलावून आणिलें आणि 'तुम्ही बाईस समजून सांगून समागमें जाण्याचा विचार ठरवा.' त्यावरून त्यांणीं जाऊन बाईस वाईटबरेपणांनीं परनिष्ठ सांगितलें कीं 'उद्यां या ब्राह्मणाशिवाय राज्यास आवर घालील, असा दुसरा सरदार मला दिसत नाहीं. तूं उगाच भलत्याचे नादास लागून मागें राहशील तर, यांचे हरभरे भरडावे लागतील. यांत तुझा पुरुषार्थ नाहीं. आमचे कपाळास आलें तें भोगूं, पण तूं आपला लौकिक मिळवून जा, यांत फार चांगलें लोक म्हणतील.' असें पर्यायानें सांगितल्यावर उमेदवारी जी मनांत धरली ती खचली. बरें बोलली, म्हणोन त्यांणीं रायास व पंतास येऊन सांगितलें, कीं 'सिद्धता करावी, गेली तर बरें, न गेली तर आम्हीं तिला नेतों.' असें बोलल्यानंतर सहगमनाची सिद्धता करून हळदकुंकूं वाणें दिलीं. गोप्रदानादि कित्येक प्रकारचे धर्म केले. राजश्रीच्या कानांतील कुड्यांची जोडी प्रसाद म्हणून सकवारबाईनें पेशव्यास दिली, आणि दंडकडी जडाव जोडा १ महादाजी अंबाजीस दिला. अनेक वाद्यें, घरोघरीं हळदकुंकूं, समारंभें करून, माहुलीस मोठ्या गजरांनीं दोन लाख मनुष्यें जमा झालीं. सहगमनविधि झाल्यानंतर सर्वांनीं स्नानें करून शहरांत येऊन दीपदर्शन घेऊन श्रीचे अवलोकनानें पुनीत होऊन घरोघरीं गेले. आईसाहेबांस जेवण घालून, राव, पंत, यमाजी शिवदेवही आले. नंतर घरीं जेवण झालें. सारे दिवसाचे उपोषित होते. ‡

‡ ना. रो. १.१२४; शा. म. ब. भारतवर्ष.

'शाहूमहाराज छत्रपति कैलासवासीं शांत झाल्यावर त्यांची तिसरी स्त्री राणूबाईसाहेब§ ही रामोजी राजे शिर्के यांची कन्या, यांचे पोटीं पुत्र संतति नाहीं, म्हणून सहगमन संगम माहुली येथें सती गेली; व दोन नाटकशाळा बरोबर गेल्या. पैकीं लक्ष्मीबाईचे मुलगे येसाजी व कुसाजी भोसले होत. तिसरे दिवशीं दुसरी राख धाकली सखू सती गेली, त्यांचें दहन करून नंतर प्रतिनिधि व अष्टप्रधान सर्व मिळोन त्यांचे नांवची पाषाणाची लिंगप्रतिमा¶ साळोंका घडोन वेणाकृष्णा उभयसंगमीं वाळूवर लिंग ठेवून त्याची प्राणप्रतिष्ठा करून, तेथें स्थापना केली. त्यांची पूजा अर्चा नैवेद्य सेवाधारी मनुष्यें नेमून बंदोबस्त केला तो चालत आहे. तेथें शाहूमहाराज छत्रपति अद्यापि आहेत. त्यांची मर्यादा जो कोणी ठेवील त्यास कदापि न्यून पडणार नाहीं. प्रथम पेशवे प्रधान हे श्रीकृष्णासंगमापलीकडे रुमालानें हात बांधून पायउतारा होऊन, नगारे नौबती बंद करून तेथें शाहूमहाराज छत्रपति यांचे दर्शन घेऊन, नंतर सातारा येथें जी मुद्रा तक्तारूढ असेल, त्यांचे दर्शनास येत होते.' तेरा दिवसपावेतों उत्तरक्रिया नानासाहेबानें स्वतः रात्रंदिवस खपून पूर्ण भक्तिभावानें यथासांग सिद्धीस नेली, त्या संबंधाचे सूक्ष्म तपशील उपलब्ध आहेत. ‡ पुढें गोविंद बल्लाळ यांचे मार्फत महाराजांच्या अस्थि काशीस गंगेंत वाहविल्या, त्यास खर्च रु. दहा हजार झाला. अस्थि ज्या घागरींत ठेवल्या होत्या त्या

§ राणूबाई हें सकवारबाईचें माहेरचें नांव. शाहूची आई जिजाबाई ऊर्फ येसूबाई व त्याची बायको सकवारबाई या दोघी एकाच शिर्के घराण्यांतल्या. रामोजीची मुलगी सकवारबाई होय.

**रामोजी** ऊ० कुवरजी शिर्के कुटरेकर

| विठोजी | दौलतराव | कान्होजी | राणूबाई ऊ. सकवारबाई | बहिरजी |
|---|---|---|---|---|
| | | लक्ष्मणराव | | |

¶ का, सं. श. व इ. सं. पे. द. मा. पृ. २. शके १७७५ सालीं कृष्णेस महापूर येऊन पहिली शालुंका वाहून गेली ती सांपडेना तेव्हां स. १८५३ सालीं शहाजीचे दत्तक पुत्र व्यंकोजी राजे यांनीं दुसरी घडवून बसविली, नंतर पहिली वाळूंत सांपडली तीही, नवीच्या शेजारींच बसविण्यांत आली. म्हणून हल्लीं दोन शालुंका आहेत. तेथें बारा महिने प्रतिदिवशी ठरीव वेळीं चौघडा वाजत असतो, त्यास सालीना १२०० ची नेमणूक आहे. छत्रपतींचे वंशजाकडून शाहूमहाराजांची पुण्यतिथि दरसाल पाळण्यांत येते, त्याजबद्दल नेमणूक रु. ३०० आहे. शालुंकावर येणारी माती दरसाल काढून जागा साफ करण्यांत येते.

‡ ना. रो. १. १२२–१३०; पे. द. १८.१८५–१९४.

माहुलीहून चोरीस गेल्या, त्याचा तपास करण्याविषयीं ताराबाईची आज्ञा नमूद आहे. ‡

**२ सकवारबाईचें सहगमन.**—शाहूमहाराजांच्या चिटणिशी बखरींत कांहीं जास्त तपशील आहे. 'शाहूमहाराज याणीं बेचाळीस वर्षे राज्याभिषेक यवनाचे नजरबंदींतून येऊन अप्रतिहत आज्ञा पृथ्वीचे ठायीं करून, परमपुण्य-श्लोक होत्साते कैलासवास केला. तो समय परमदारुण! प्रधानपंत व गोविंदराव कारभारी व सरदार यांणीं शहराची नाकेबंदी करून वाड्याभोंवत्या व कारखान्यास चौक्यापहारे याप्रमाणें करून, प्रधानपंत वगैरे गोविंदरावाचे वाड्यांत येऊन बसले. राणीसाहेबांचे तीर्थरूप कुवरजी शिर्के यांस बोलवून सांगितलें जे, 'बाईसाहेबांची मर्जी कशी आहे? पुढें राज्यभार चालणें त्यास आम्हा सर्वांस घेऊन, महाराजांची आज्ञा जाली आहे त्याप्रमाणें, राज्याचे अधिकारी करून करावयाचें आहे? आम्ही सर्व आज्ञांकित, महाराज तेच बाईसाहेब आहेत, कीं सहगमन करण्याचा संकल्प आहे? हें विचारून यावें; आणि 'आपणांशीं बखेडा करणार कारभारी यांचा बंदोबस्त महाराजांचे आज्ञेनें करितों,' म्हणून सांगून पाठविलें. आणि दादोबा प्रतिनिधि व यमाजीपंत व त्यांचे लोक यांभोवते आपले लोक पाठवून नजरबंद करविली. शिर्के यांणीं बाईसाहेबांस निरोप सांगितला, तेव्हा बाईसाहेबीं विचार केला जे, 'सर्व प्रकारें बलवान प्रधानपंत व गोविंदराव व सर्व कारभारी होऊन ताराबाईचे नातू राज्यावर बसविणें हें राजकारण सिद्ध झालें. तेच पुत्र घेऊन आपण राहवें तरी त्यांचे आज्ञेंत चालून ताराबाईचे आज्ञेंत चालावें, यांत शोभा राहावयाची नाहीं. याउपरी राहणें व्यर्थ आहे,' म्हणोन सहगमन करण्याचा निश्चय केला, आणि साहित्य लौकर करावें म्हणून आज्ञा पाठविली. याप्रमाणें निरोप येतांच तात्काळ प्रतिनिधि व यमाजीपंत यांस बेड्या घालून कैद केलें, आणि पुरंदर§ व कावनई किल्ल्यावर रवाना केलें. नंतर कारभारी व प्रधानपंत यांणीं दोन पालख्या तयार करून वाड्यांत गेले. सर्व कारखान्यांस कुलपें घालून बंदोबस्त केला आणि उभयतां पालखींत सर्व राजोपचार वस्त्रें; जवाहीर अलंकार करून समारंभें गेले. अंत्यविधि यथाशास्त्र करणें तो केला.

‡ ना. रो. १२९ व पु. द. १-२२९ पहा.

§ कांहीं ठिकाणीं सिंहगड, लोहगड व अणकाई असें आहे. मागाहून निरनिराळ्या किल्ल्यांवर त्यांची रवानगी झाली असावी. कावनई कि. इगतपुरीजवळ आहे.

उत्तरकार्य मालोजी भोसले मुंगीकर याजपासोन चालतें केलें.' उत्तरकार्याचा खर्च ४५४१२ झाला.†

सकवारबाईला पेशव्यानें बळजबरीनें सती घालविलें, असें नीच कृत्य करण्यापेक्षां तिला उघडपणें फांशीं दिलें असतें तर तें पुरुषार्थाला शोभलें तरी असतें, अशा आशयाचा दोष सकवारबाईच्या सती जाण्यासंबंधानें ग्रँट डफनें नानासाहेब पेशव्याला दिला असून अद्यापिही कित्येकांचे बोलण्यांत हा आशय वागतो. वास्तविक ज्या दृष्टीनें या प्रकरणाचा निकाल ठरवायचा, ती दृष्टि तत्कालीन वस्तुस्थिति पाहणारी असली पाहिजे, दुराग्रहदूषित नसावी. बाई सती गेल्यानें नानासाहेबाचें पुढील काम तितकें हलकें झालें, एवढ्यावरून केवळ स्वार्थबुद्धीनें त्यानें तिला चिडवून सती घालविलें असें नाहीं. तत्कालीन स्थितीशीं तादात्म्य कल्पून या गोष्टीकडे पाहिल्याशिवाय तिचें रहस्य कळणार नाहीं. तशा दृष्टीनें पाहतां पुढील मुद्दे लक्षांत येतात.

( १ ) वर दिलेल्या पुराव्यावरून पाहतां सकवारबाईस सती जाण्याचा निरोप पाठविण्यांत एकटा पेशवाच प्रमुख नसून, त्या वेळीं जमलेल्या सर्व प्रमुख मंडळीचा त्यांत भाग होता. किंबहुना त्यांत ताराबाईच अग्रेसर होती. सकवारबाईसही कदाचित् कारभाऱ्यांचा ताबा पुरवला असता, परंतु ताराबाईचा पुरवणार नव्हता.

( २ ) ही चाल हल्लीं कितीही क्रूर व वेडगळ भासत असली, तरी त्या वेळीं ती प्रचलित होती. बहुधा सती जाणें हा नियम व न जाणें हा अपवाद समजला जाई. न जाण्यास योग्य प्रापंचिक कारणें असतील तर गोष्ट निराळी. एरवीं जिला असें कांहीं कारण संभवत नसे तिची साहजिक प्रवृत्ति सती जाण्याकडे कोणीं न सांगतांच होत असे.

( ३ ) राजे लोकांच्या वैभवाचें व सत्कीर्तीचें वर्णन कर्तव्य असतां, त्यांच्या शवाबरोबर किती बायका व दासी सती गेल्या हेंही मुद्दाम सांगण्यांत येई. कान्होजी आंगरे, प्रतिनिधि इत्यादिकांचीं उदाहरणें मागें ठिकठिकाणीं देण्यांत आलींच आहेत. तात्पर्य, वैभवाचें व सुकीर्तीचें अनुमान करण्यास हें एक गमक मानण्यांत येई. हें विधान विशेषतः रजपुतान्यास सर्वथा लागू होतें. उदेपुर, जयपुर येथील राजांशीं बरोबरी, किंबहुना, वरचढ करण्याची शाहूला हौस होती. हिंदुधर्मासाठीं तूं काय केलेंस, मी काय केलें, असा त्याचा जयसिंगाशीं वाद झालेला आहे.

† इ. सं. पे. द. मा. पृ. २

( ४ ) सकवारबाईच्या वयाला पंन्नासी उलटली असावी. तिला मूल वगैरे पाश कांहीं एक नव्हता. तिचा प्रपंच झालेला होता. शाहूला आतां दुसरी राणी सती जाणारी नव्हती. तेव्हां या राणीनें सती जाणें शाहूच्या लौकिकाला त्या काळीं साजेसें व जरूरही होतें.

( ५ ) शाहूविषयीं नानासाहेबाची भक्ति निस्सीम होती. धनी मेल्यावर त्याच्या कीर्तीस कलंक लागेल अथवा कमीपणा येईल असें त्याच्या स्त्रीनें वर्तन करणें हें नानासाहेबासच काय, पण शाहूच्या कोणत्याही नोकरास रुचणारें नव्हतें. सती जाण्याचा निश्चय आगाऊ महिना दोन महिने सर्व राज्यांत जाहीर करून, आयत्या वेळीं आपण सती जात नाहीं असें सकवारबाईनें म्हणणें, जन्मभर सहचारिणीचें वैभव भोगून, नवऱ्यास परलोकींच्या प्रवासांत एकटाच सोडून, इहलोकीं केवळ बखेडे करण्याची हौस पुरविण्याकरितां, शाहूच्या विधवेनें, जिला मूल बाळ नाहीं व जी वृद्ध झालेली, अशा स्त्रीनें सती न जाणें हें कोणासच त्या वेळीं पसंत पडण्यासारखें नव्हतें. कार्य साधण्यासाठीं कांगावा करण्याचे प्रकार आहेत त्यांतला सती जाण्याचा पुकारा करणें हा नाहीं. मृताविषयीं लोकांत जी पूज्यबुद्धि असते, तिला असल्या कांगाव्यानें धक्का बसतो, त्यांत मृताची चेष्टा केल्यासारखें होतें. † सकवारबाई सती न जाती तर पुढील इतिहासाचा ओघ जास्त यशस्वी झाला असता असें मानण्यास कांहीं कारण नाहीं.

३ **समकालीन लोकमत.**—" मनुष्यमात्रांस कृपाममता लावून वेध लाविला. सर्वांस वाटावें कीं, आपले इतकी कृपा कोणावर नाहीं. तैनाता, नेमणुका, जमिनी, इनामें, ज्याच्यापासून ज्या कामांत उपयोग त्यात एखादा अवगुण आहे, तरी युक्तीनें झांकून तो त्याजपासून सोडवावा. गुण तितका प्रकट करून द्यावा, माणसें वाढवावीं. याप्रमाणें राज्याची उदयकालवृद्धि व्हावी हें समजून, पूर्वी वडिलांनीं सर्व माणसें दुखविलीं, मारिलीं, कारखाने बुडविले, त्यायोगें राज्यनाश झाला, उग्रदंड ब्रह्महत्त्या झाल्यावरून देव-ब्राह्मणांचें ठायीं बहुत निष्ठा, यथास्थित संगोपन करून माणसांचा गुणग्रहणच बहुत केला. आपलेंसे करून वेधास लाविले. प्रौढ माणसें सर्वकाळ सहवासांत असावीं, त्यांच्या युक्ति व बुद्धि ऐकत असावें. सर्वांचा विचार विचारून

† कै. वासुदेवशास्त्री खरे यांनी मार्मिकपणानें हे मुद्दे मला लिहून कळविले.

कार्यें करीत असावें." † "देव ब्राह्मणांचें इनाम अग्रहार पूजा नैवेद्य नंदादीप पूर्वील दिले ते चालवून जेथें नाहीं तेथें नवीन बंदोबस्त करून दिले. सेवक लोक बहुत निष्ठेनें आज्ञा तिळप्राय उल्लंघन न करितां महाराजांसीं चालूं लागले. जें कार्य ज्यास सांगितलें तो करावयासी गेला, तेथें त्यास यशच प्राप्त व्हावें. ज्यांनीं त्यांनीं राज्यवृद्धीस पावावें, हेंच करूं लागले" "पूर्वी विसकळीत प्रसंगीं चांगलीं माणसें, मातबर लोक परराज्यांत गेले, ते प्रयत्नानें सेवेंत आणून, त्यांचे बंदोबस्त करून ठेविले. गोरगरीब फिर्यादीस उभे राहिले असतां, स्वारींत पालखी उभी करून अगर मजालसींत ऐकून घेऊन समक्ष आज्ञा लागलीच सांगावी. न्यायप्रकरणाकडे सांगावयाचें असेल ते त्यांजकडे सांगून पुनः ऐकून घ्यावें. तालुकदार सुभेदार यांजकडील असेल तें त्यांजकडे सांगावें. वाजवी तें होऊन कोणास वावगा उपद्रव लागूं नये, असें केलें. उग्र दंड करावयाचा नाहीं. शिरच्छेद करणें असतां अन्याय असल्यास आणि बहुत विवेकें करून ठरल्यास कान्होजी आंगरे यांजकडे रवाना करावें. त्यानीं मारणें त्यांस मागावें.' देहान्त शिक्षा कुलाब्यावर कडेलोटानें होत असे.

निजामुल्मुल्कचा नातू मुजफ्फरजंग याचे शाहूविषयीं उद्गार, निघालेले आहेत ते असे, "मोगलाईंत निजामुल्मुल्क, मऱ्हाट राज्यांत शाहूराजे होते. ऐसे माणूस पुढें होणार नाहींत. सर्व राज्य पेशव्यांस सोपून गेले. छत्रपतिसारखा राजा होणें नाहीं. राज्य बरें नांदविलें. अजातशत्रु होते." मृत्यूचें वर्तमान ऐकल्यावरचे हे शब्द आहेत § यावरून 'अजातशत्रु' म्हणजे ज्यांची सर्वांभूतांचे ठायीं समदृष्टि राहिली अशा कोटींत शाहूची गणना मुसलमानांनीं देखील केलेली दिसून येते.

"साताऱ्यास तख्त करून राहिले तेव्हांपासून राज्यकारभार सेवक लोकांपासून अनेक मसलती व युद्धप्रसंग मोठ्या फौजा पाठवून केले, मनसब्यांत बहुतच चतुर, सर्व राज्य मोगलाईंत गेलें होतें, तें मसलतीनें सोडविलें. सर्व लोक आज्ञेंत वागवून नवीन मोठीं माणसें निर्माण केलीं, वाढविलीं. जुनीं माणसें अनुकूल झालीं त्यांचें चालविलें. शहाण्या पोक्त माणसांच्या मसलतीनें चालावें. विश्वासू सेवक लोकांचे हातें कामें घ्यावीं. लघु मनुष्य कैफी व्यसनी दारूबाज यांस समीप न ठेवितां मुत्सद्दी लोकांचे हातून कारभार

† शा. म. ब. चिटणिसकृत, पृष्ठ १९ व ३२, ३३.

§ पे. द. २८.५९

चालविला. मराठे लोकांस शिपाईगिरीचे कामांत ठेविलें. उत्तरदेश सोडवून थोरले महाराजांचा उद्देश सिद्धीस नेला. पूर्वेस दक्षिणेस चतुःसमुद्र मर्यादा होऊन चहूं दिशेचें राज्य एक आज्ञा चालूं लागलें.

" श्रावणमासांत ब्राह्मणांची वेदशास्त्रांत परीक्षा करून प्रथम दाभाड्यांचे मार्फत तळेगांव येथें व पुढें पुणें येथें, चार पांच लक्ष धर्म करावा, असें ठरविलें. दिगंत कीर्ति जाऊन विद्वान तपस्वी महापुरुष चहूं दिशेचे लक्षावधि येऊं लागले. जशी काशी तसें सातारा पुणें विद्यापीठच झालें. आज्ञा कोणीं उल्लंघन न करावी, ऐसें सार्वभौम राज्य केलें. नीतिन्यायें करून प्रजेचें पालन पोषण केलें. गरीब अनाथाचे ठायीं बहुत दया करून त्यांचें दुःख परिहार करावें. रयतेस उपद्रव काडीमात्र नाहीं. पर्जन्यवृष्टि यथाकाल होऊन पृथ्वीनें धान्यपीक बहुत द्यावें ऐसें सुभिक्ष झालें. "

शत्रूंशीं लढत असतांना सुद्धां कधीं आग्रहानें एखाद्यास क्रूर शिक्षा केली, असा प्रकार झाला नाहीं. सर्वांस ममतेनें वागवून शाहूनें आपल्या लगामीं लाविलें. मनुष्य जोडावा कसा, हें तो जाणत असे. जणूं काय बापाच्या विपरीत वर्तनानें राज्यावर काय परिणाम झाला, तो त्याच्या हृत्पटलावर सदैव कोरलेला होता. लोकांनीं केलेले अपराध साफ विसरून तो त्यांस काम देई; आणि त्यांनीं चांगलें काम करून दाखवितांच त्यांस मोठमोठीं इनामें व बक्षिसें देऊन नेहमीं खूष ठेवी. केव्हां त्यांस जरब दाखवी, व केव्हां त्यांचीं आर्जवें करी.*

त्याचें औदार्यही अप्रतिम होतें. स्वतः साध्या वृत्तीनें राहून दुसऱ्यास सुखी व आनंदी पाहून त्यास कृतार्थता वाटत असे. प्रत्यक्ष मारेकऱ्यांनीं येऊन हल्ला केला असतां, त्यांसही त्याजवर शस्त्र उगारण्याची छाती झाली नाहीं. 'कारभाऱ्यांनीं पाहिलें तर तुम्हांस मारतील. शस्त्रें ठेवून निघून जा कसे,' असें सांगून शाहूनें त्यांस वाटेस लाविलें. 'याप्रमाणें अजातशत्रु महाराज, शत्रूसही घाताची इच्छा होऊं नये.'

शाहू स्वतः मोठासा मुत्सद्दी अगर कल्पक नव्हता, पण हे गुण ज्यांच्या ठिकाणीं होते, त्यांस त्यानें उपयोगांत आणिलें. त्यास अन्यगुणपरीक्षा होती. रयतेच्या आबादानीकडे शाहूचें लक्ष नेहमींच विशेष असे. ओसाड प्रदेशाची वस्ती करणें, धामधुमीच्या प्रसंगीं रयतेस सवलती देणें, वाढलेले धारे कमी करणें, नवीन धारेबंदी करून देणें, अशीं कामें शाहूनें पुष्कळ केलीं. त्याच्या

* ऐ. प. ३६, ३८; रा. खं. ६.१६, ८५, ८६; रु. १ पृ. ६०

बहिणीचा नवरा शंकराजी महाडिक तारळेकर यानें आपल्या इनाम गांवांस रयतेवर जुलूम केला, त्याचा निषेध करून जरब दिल्याबद्दलचें पत्र आहे त्यांत 'ऐसा वतनदारीचा पेशा नर्मदेपासून रामेश्वरापर्यंत नाहीं. रयत चोराची नव्हे' अशीं झणझणीत वाक्यें त्यांत आहेत.

'पदें दूर केलीं किंवा नजर ठरविली, मुलखाच्या घालमेली केल्या असतां कोणही एक फंद किंवा आज्ञा उल्लंघन न करितां चालले. याप्रमाणें मोठे धारेनीं व मनसब्यांनीं राज्य बहुत दिवस महाराजांनीं अकुंठित आज्ञा चालवून केलें. ¶

राष्ट्राचा मुख्य पुरुष या नात्यानें शाहू सर्वांचा परामर्ष घेई. त्यांच्या सुखदुःखांत संविभागी होऊन, सण, उत्सव, मेजवान्या वगैरेंच्या निमित्तानें लोकांचें हृद्गत समजून घेऊन त्यांजवर आपली छाप कायम ठेवी. बाजीरावास मुलगे झाले, त्यांचे पुत्रोत्सव केले. दानधर्म वांटला, दिल्हा, महाराजांची स्वारी मेजवानीस गेली. सर्व लहानथोर मंडळी गेली होती. 'विश्वासराव जन्मास आला. साखरा वांटल्या. देकार ब्राह्मणांस दिले. मेजवान्या लहानथोरांसहित, महाराजांस पूर्वी करून, केल्या.' सर्व प्रमुख व्यक्तींसंबंधानें असाच परामर्ष शाहूकडून घेतला जात असे. लग्नादि प्रसंगानें सर्व सरदारांकडून महाराजांस मेजवान्या होत. शाहू असे प्रसंग मुद्दाम घडवून आणी.

शाहूच्या कर्तबगारीचा दुसऱ्या एका दृष्टीनें विचार सुचतो तो असा कीं, बंगाल मद्रासप्रमाणें महाराष्ट्रभाग्याचा अंत अठराव्या शतकाच्या मध्याचे वेळीं न होतां, मराठशाहीनें पानिपत खर्ड्यासारख्या युद्धांत पराक्रम गाजवून आणि आपलें नांव इतिहासांत अजरामर करून, इतरांहून पाऊणशें वर्षें ज्यास्त टिकाव धरिला, याचें पुष्कळसें श्रेय शाहूच्या शांत व प्रोत्साहक राज्यनीतीला दिलें पाहिजे. हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांची व राज्याची अंतर्बाह्य अधोगति धूमधडाक्यानें चालली होती; परिस्थितीशीं टक्कर देऊन पांचशें वर्षांत क्वचित् एखादा शिवाजी निपजला. प्रचंड मोगल बादशाही उलथून पडून पाश्चात्यांची हळू हळू सरशी होत चालली होती. अशा संकटसमयीं अठराव्या शतकाच्या प्रथमार्धांत मराठी राज्यांत शाहूनें नवीन जोम उत्पन्न केला, आणि सर्व हिंदुस्थानभर मराठ्यांचे नांवाचा दरारा बसविला, हा पराक्रम कांहीं लहान नव्हे.

¶ इ. स. पे. द. पृ. २७५–२८६, ऐ. टि. २.५, शा. ब. पृ. ८८

**४ कुटुंबपरिवार.**—शाहूला वडील बहीण भवानीबाई होती ती तारळ्याचे महाडिकांकडे दिली. मातुश्रिया दोघी, व संभाजीच्या नाटकशाळा व मदनसिंग इतकी मंडळी झुल्फिकारखानानें रायगडावर स. १६८९ सालीं पकडली. दोन मातुश्रिया म्हणजे त्याची आई येसूबाई व आजी शिवाजी महाराजांची स्त्री सकवारबाई. जोत्याजी केसरकर, मोरोपंत सबनीस, उद्धव योगदेव राजाज्ञा, हे व आणखी मोठा परिवार त्याजबरोबर बादशहाचे कैदेंत अठरा वर्षें होते.पकडला गेला तेव्हां शाहूचें वय अवघें सात वर्षांचें होतें. नंतर बादशहानें मराठी पंतोजी ठेवून अल्प स्वल्प अभ्यास करविला.§ तसेंच दोन लग्नें करविलीं, अंबिकाबाई ( सिंदे ) व सावित्रीबाई ( जाधव ), तसेंच रक्षा विरूबाई.

अंबिकाबाई लवकरच वारली. बाकीची मंडळी पुढें दिल्लीस गेली. ती स. १७१९ त परत आली. दक्षिणेंत दरम्यान आणखी दोन लग्नें पुरंदराखालीं नारायणाचे देवळीं आंबराईंत झालीं, थोरली धनीण सकवारबाई ( शिर्के ) व धाकटी सगुणाबाई ( मोहिते ). शिवाय लक्ष्मीबाई व धाकली सखू अशा दोन नाटकशाळा होत्या. सगुणाबाईचे पोटीं शाहूला पुत्र झाला, तो तीन वर्षांचा होऊन वारला. सकवारबाईला एक कन्या झाली, तिचें नांव गजराबाई मल्हारराव बांडे यांस दिली. सगुणाबाईला एक मुलगी झाली, तिचें नांव राजसबाई निंबाळकरांकडे दिली. हीं लग्नें स. १७४० त झाल्याचा उल्लेख आहे. रक्षा लक्ष्मीबाईचे पुत्र येसाजी व कुसाजी हे दोन लेकावळे त्यांस शिरोळ सुभा दिला म्हणून शिरोळकर म्हणत. येसाजीचा मुलगा बाळगोपाळजी म्हणून होता.

शाहूला संतति पुष्कळ झाली, पण मुलगे जगले नाहींत. जनानखान्याबाहेर पाऊल पडलें नाहीं. जनानखान्याची व्यवस्था विरूबाईकडे असून तिच्या आज्ञेंत सर्व वागत. ती ता. २४ डिसें० स. १७४० रोजीं वारल्यावर अव्यवस्था व भांडणें चालू झालीं. फत्तेसिंगावर विरूबाईचें प्रेम पुत्रवत् होतें. ती वारली

§ विद्याभ्यासाचा पुढील उल्लेख स्मरणीय आहे. 'अक्षरओळख आंखटांक समजुतीपुरतें शिकविलें. नंतर काजी न्यायनिष्ठ असत, त्याच्याकडे चार घटका मनसबा उलगडण्याचे संधींत पाठवावें. वादिप्रतिवादी विवाद कसे करितात, तो ऐकून काजी न्याय कोणत्या रीतीनें करून दोघांची समजूत करितो, तें ऐकून आणावें. नंतर घोड्यावर हत्तीवर बसावयाचे चालगती सर्व अभ्यास करविला. महाराज सदा आनंदांत. कधींहि मनास त्रास दुर्गुण नाहीं. कैफ अंमल यांजकडे दृष्टावलोकन करीत नव्हते.'

तेव्हां त्यास अत्यंत दुःखावेग झाला. त्यास राजपुत्रासारखा मान होता. गोडूबाई व अहल्याबाई या दोन बायका फत्तेसिंगाच्या होत्या. बच्याबाई म्हणून आणखी एक नांव आढळतें ती त्याची बायको किंवा कन्या असेल.

शाहूची बहीण भवानीबाई शंकराजी महाडिक याची बायको. शंकराजी मेला तेव्हां तिनें सहगमन केलें. तिचे मुलगे दुर्गोजी व आबाजी. या दोघांचीं भांडणें लागलीं, तीं शाहूनें तोडलीं. शाहूची मुलगी गजराबाई बापाजवळच असे. शाहूच्या पश्चात् ती बांड्यांचे वडगावांस गेली. संतूबाई, गजराबाई, लक्ष्मीबाई व गुणवंताबाई अशा शाहूच्या चार मुली वाड्यांत होत्या, त्यांस रामराजानें काढून दिलें. पैकीं गजराबाई बांडे सासरीं गेली. "रामराजाला त्या परिस्थितींत या मुलींची मोठी अडगळ वाटली. संतूबाई तर लहान, कडेवर घेऊन फिरविण्याजोगी होती. स.१७५० च्या जून महिन्यांत रामराजानें त्यांचे फार हाल केले. रमादेवी व रखमादेवी हीं दोन नांवें शा. रो. ६९ त आढळतात त्या कोणी औत्तरीय स्त्रिया सातान्यास राहत असाव्या. †

५ **दिनचर्या.**—'महाराज पुण्यश्लोक, राज्यभार कारभारी यांजवर सोंपवून नेमिल्या नेमाप्रमाणें काम करावें. जाजती हुकुमाशिवाय करण्याचा उजूर कोणाचा नाहीं. आपण जातीनें पांढरी तुमान व अंगांत कफनी, डोईचे केंस लांब सडक, उभे राहिले असतां गुडघ्याखालीं लवणीपर्यंत, कृष्णवर्ण, तेजस्वी, पालखींत बसून अगर घोड्यावर स्वार होऊन, दहाबारा खिजमतगार, व दहा पंधरा मनुष्यें जिलिबींचीं, पुढें दोन स्वार व मागें चिटणिशीकडील कारकूनसहित, पसतीस चाळीस मनुष्य घेऊन, अरण्यांतील शिकार करून तीन प्रहर, घटका दोन घटका अलीकडेपलीकडे, शिकार साधेल तशा रीतीनें, वाड्यांत येऊन आराम करून, शौचास जाऊन, हस्तपाद प्रक्षालन करून, भोजन करावें. नंतर कचेरीस यावें. तेथें प्रातःकाळापासोन जी व्यवस्था झाली असेल, ती विचारून घेऊन, समक्ष येतील त्यांचे जाबजबाब होऊन दिवटी-सलाम मुजरा जाल्यानंतर कचेरी बरखास्त करून, राजकारणीं कामाचीं पत्रें पाहून, त्यांचे जबाब देण्याविषयीं आज्ञा करावी; आणि महालीं मुक्कामीं

† पे. द. २२ पृ० ३३. ६३, ६६; पे. द. ६. ६९, ९७, ९९; पे. द. ७. २०: पे. द. १८.५; पे. द. ८.४८; पे. द. २३.२१; पे. द. ३०. पृ २३४, २४१ २४२: ऐ. टि. २.५; रा. श. पृ. ८७; शा. रो. ६९, ९२, २८८, २०४; ना. रो. १.१३०; इ. सं. पे. द पृ २ व. ले. ३ पृ. २५७; शि. च. सा. १ पृ. १०३.

कामकाजाचे पत्राचा डौल, दररोज पांचशें द्यावा, त्यांचा झाडा पाहून राहिलीं असतील त्यांसुद्धां पांचशें करून द्यावीं, नंतर त्या कारभारीयास रजा द्यावी, अथवा त्याचे लायक गाणें, नाच असल्यास बसवावें, अगर खुशीरंगीनें बसेल तर निरोप द्यावा. या प्रकारें प्रत्यहीं प्रातःस्नानसंध्या पुराण पूजा करून स्वारीस जावें.' 'महाराजांचे शरीरीं बालत्वापासोन सत्तर वर्षे वय होय तों दुखणें किंवा व्याधी कधीं झाली नाहीं. बहुत दृढ होते. वारा, उष्ण, पर्जन्य, उघडे, सर्व काळ अंगावर बहुत सोसणें, शिकारींत वगैरेही मस्तकीं पागोटें नाहीं, ऐसेंही बहुत दिवस व्रत चाललें. विजार किंवा धोतर इतकें मात्र घ्यावें. शालजोडी पासोडी पुढें पालखींत असावी' ‡

६ **कर्मणुकी, व्यवसाय.**—यावरून शाहूची राहणी किती साधी व विरक्त होती हें त्याची दिनचर्या पाहिली असतां लक्षांत येतें. तत्कालीन प्रघातानुरूप व थोड्याबहुत अंशानें मुस्लीम जनानखान्याच्या अनुकरणानें शाहूच्या वाड्यांत दासीरक्षांचा भरणा विपुल असूनही ज्यास निखालस व्यसन म्हणतां येईल असें त्याचें वर्तन नव्हतें. हुक्का पिण्याची संवय त्यास असावी. पक्ष्यांची व जनावरांची शिकार हा त्याचा मुख्य व्यायाम व नाद होता. श्रावणापासून दसरा दिवाळीपर्यंत मासे पकडण्याचा हंगाम असे, तेव्हां तो तेंच काम करी. दरबारप्रसंगीं नाचरंग वगैरे काय होत असेल त्या विषयाची आसक्ति म्हणून त्यास नव्हती. त्याचें सर्व जीवन उघडें असून त्यांत लपवाछपवीचा प्रकार नव्हता. कोणी केव्हांही त्यास वाड्यांत रस्त्यांत जाऊन भेटावें अशी मुभा होती. नाचासाठीं बटकीच्या पोरी आणविल्याचे उल्लेख आहेत. भाट, गवई, वाजंत्रीवाले, गुरव, नटवे यांस वेतनें दिल्याची नांवनिशी आहे. शिकारीसाठीं किंवा घरांत बाळगण्यास जातवंत कुत्रीं हुडकून आणविण्याचा त्यास मोठा हव्यास होता. जातिवंत घोडेही तो आणवीत असून अश्वपरीक्षा तो चांगली जाणत असे. बनगाई, कस्तुरीमृग व हुमेपक्षी काश्मीरच्या राज्यांतून त्यानें मागविलेले आढळतात. केव्हां वाघाची शिकारही तो करी आणि त्या कामाचे तज्ञ तो जवळ बाळगी. " शिकारीचा हव्यास राजधर्म होय. ते बहुत तरतूद सामान वाघ्रा (वागुरा जाळी ) वगैरे असावें. त्या कारखान्यावर हजारों माणूस जळस्थळआकाशीं शिकारीचे तिन्ही प्रकार सिद्ध असावे. बाज, लगड, चित्ते, कुत्रे, जोड्या,

‡ भा. व. शा. म. ब. पृ. ४१; शा. म. च. पृ. ९३.

पायदानें वगैरे बाळगिले. त्यावर मल्हार प्रभु दरोगा केला." या प्रकारच्या नानाविध बाबतींसंबंधानें राणा लोभाचा पत्रव्यवहार मुबलक नजरेस येतो.

सरदारांचीं किंवा नोकराचाकरांचीं लग्नें जुळवून तीं स्वतः सिद्धीस नेण्याची त्यास मोठी हौस वाटे. नानासाहेब पेशव्याचें लग्न रास्त्यांचे मुलीशीं त्यानें जुळविलें. "वाड्यांतील लिंगूबाईच्या लेकास केदारजी केसरकर याची कन्या ठरवून समस्त सरकारकून अश्वगजांसहित स्वतः हजर राहून समारंभ साजरा केला," असे लग्नाचे प्रकार फार आढळतात. मेणबत्या, अत्तर गुलाब, सुऱ्या, तरवारा, तंबाकू, बंदुकीची दारू वगैरे परदेशी जिन्नस कान्होजी आंगऱ्याचे मार्फत मिळवी. हस्तिदंताचा व्यापार मोठा चालत असे. नारिंगीचीं रोपें व इतर फळांच्या बागा तयार करण्याचा शाहूला भारी शोक होता. "दरसाल शिवापुरच्या अंब्यांच्या कोया वीस हजार लावावयास नेतां, त्या कोणे जागीं किती झाडें लावलीं, त्याचा जाबता पाटलाच्या मार्फत तयार करून पाठविणें. पुणें देशांत आंबराया नाहींत त्या करवणें म्हणोन आज्ञा केली आहे." असे लेख पुष्कळ आहेत. ब्रह्मेंद्रस्वामी लिहितो, 'स्वामी देवालयें, वापीकूप तलाव, झाडझाडोरा लावतात हे कीर्त अक्षय आहे. आम्हांस याचा बहुतसा संतोष आहे' या अशा लेखांवरून शाहूच्या खासगी जीवनाची कल्पना होते. ¶

**७ सौजन्याचें सामर्थ्य.**—शाहूच्या मुद्रेंतलें वाक्य त्याची सामान्य भावना व्यक्त करणारें आहे तें असें—

**वार्धिष्णुर्विक्रमो विष्णोः सामूर्तिरिव वामनी ।**
**शंभुसूनोरसौ मुद्रा शिवराजस्य राजते ॥** ‡

आपण लहानसा मनुष्य परमेश्वरी अंश आहों असा या वाक्याचा गर्भितार्थ त्याच्या कारभारांत व्यक्त झाला. त्याच्या कर्तृत्वासंबंधीं कितीही मतभेद किंवा गैरसमज असले तरी शाहू ही मराठ्यांच्या इतिहासांतली एक थोर व्यक्ति असून त्याच्या उदार व निःस्वार्थ धोरणामुळेंच मराठी राज्याचा विस्तार त्वरेनें झाला, यांत संशय नाहीं. तथापि सामान्य जनतेंत व अभ्यासकांतही

---

¶ पे. द. ८ व १८ हे भाग पहावे. रु. १ शेडगाव बखर, भा. व. शा. म. बखर; पे. द. ८.५२.५३; १८.१७,२१ इ.

‡ ता. २६ मे १७०७ व ७ जाने० १७२२ च्या कागदांवर ही मोहोर आढळते. रा. खं. २०. ६०, १९४, १९७ इ०

त्या संबंधानें कित्येक गैरसमज किंवा भ्रामक कल्पना प्रचलित आहेत. कोणी समजतात बादशहाच्या ऐष आरामांत शाहू वाढला, म्हणून त्याचा स्वभाव नेभळा व निष्क्रिय बनला. कोणी म्हणतात त्यास राजकारण काय तें बिलकुल कळत नव्हतें, व त्यास माणसाची परीक्षा नव्हती. पेशव्यांच्या कोंकणस्थ कुटुंबीस अवास्तव महत्त्व देऊन त्यानें राज्यास दुर्बलत्व आणिलें. दक्षिणेंतलें आपलें आद्यस्थान सुव्यवस्थित करण्याचें सोडून उगाच भरमसाट उत्तर हिंदचा कार्यक्रम स्वीकारून राज्यनाश केला. शेजारीं निजाम नांदत होता, त्यास देखील काढतां आलें नाहीं, असा शाहूचा कारभार अव्यवस्थित बनला. अशा प्रकारचे तर्कवितर्क मनमुराद प्रचलित आहेत. हे तर्कवितर्क बहुधा कल्पनेनें बनविलेले असून त्यांस कागद-पत्रांच्या अभ्यासाचा आधार नसतो. ठिकठिकाणीं मूळ कागदांतले उतारे दिले आहेत, त्यांवरून व जयपुर संग्रहातील अलीकडची माहिती पूर्वी बाजीरावाचे भागांत येऊन गेली आहे, त्यावरून ज्याला त्याला आपलें मत बनवितां येईल. शाहू व सवाई जयसिंग औरंगजेबाच्या पदरीं एकत्र वाढले, पुढें पत्रांनीं व वकिलांच्या द्वारां त्यांचें दळणवळण अखेर पावेतों कायम राहिलें, मोगल बादशाहीच्या ऱ्हासकालांत या दोन प्रमुख राजपुरुषांनीं संगनमतानें वागून राष्ट्रकार्य बजावलें, बादशहा व त्याचे उमराव, राजपूत सत्ताधीश, बाजीराव, निजाम अशांच्या हर्षामर्षातून राष्ट्रोदयाचा मार्ग ठरविला, हें लक्षांत घेतां हिंदु व मुसलमान या उभय समाजाचें प्रेम संपादून त्यानीं निर्वैरत्वाच्या पायावर राजकारणाची उभारणी केली. शाहूनें तंजावर पासून दिल्लीपावेतों राज्याचा फैलाव केला. हें कृत्य नेभळ्या व निःसत्त्व इसमाकडून होणें शक्य नाहीं. दीपसिंगानें निजामाला आपला अभिप्राय कळविला कीं, "शाहू राजा पोख्त, शहाणा, विवेकी, मजलसीनें वागणारा आहे म्हणूनच याचें राज्य चालतें," तोच अभिप्राय ग्राह्य मानला पाहिजे. त्याच्यासारखा उदार, धोरणी, परदुःखानें विव्हळणारा राज्यकर्ता औरंगजेबाच्या पश्चात् मराठी राज्यास लाभला म्हणूनच राज्याची वृद्धि होऊन आजचा अभिमानास्पद इतिहास बनला असें दिसून येतें. अशा ऐतिहासिक व्यक्तीचें स्वभावचित्र व कर्तबगारी वाचकांपुढें यथायोग्य मांडली गेली पाहिजे. अलीकडे अहिंसामार्गाचा पुरस्कार केला जात आहे, त्या दृष्टीनें पाहिल्यास देखील शाहूनें पुष्कळ अंशीं याच मार्गाचा अवलंब केल्याचें म्हणतां येतें. बापाचा क्रूर वध, बादशहाची सतरा वर्षांची

कैद, त्यानें चालविलेलें प्रचंड युद्ध, त्यांत उडालेली देशाची भयंकर दैना आणि खुद्द शाहूवर गुदरलेले नानाविध संकटप्रसंग हे जे जीवनाचे अनुभव इहलोकीं फारच थोड्यांच्या वांट्यास येऊं शकतात, त्यांनीं त्याच्या उत्तर आयुष्यास निराळीच कलाटणी दिली. राज्यपद प्राप्त होतांच भूतदया हें त्याचें वर्तनसूत्र बनलें आणि अंतसमयीं कृतार्थतेचा अपरिमित आनंद त्यास लाभला. हा प्रकार वर सांगितलेल्या तत्कालीन लेखांतच जास्त उठावदार दिसतो.

मराठी राज्याचें ध्येय व तें साधण्याचे मार्ग शाहूनेंच आपल्या दीर्घ कारकीर्दींत ठरविले. त्यांची छाप अखेरपावेतों महाराष्ट्रावर बसली. हें ध्येय त्यानें स्वयंस्फूर्तीनें व अंतःकरणप्रवृत्तीनें ठरवून एकंदर राष्ट्रास सौजन्याचा धडा घालून दिला. त्याचें हें ध्येय स्वार्थाचें नसून केवळ चित्तशुद्धीचें होतें. विशिष्ट धर्मबंधनांनीं त्याच्या भावना बनलेल्या नसून त्याची वृत्ति सर्व धर्मांना समान आदर दाखविण्याकडे होती. महाजनो येन गतः स पन्थाः या न्यायानें सर्व राष्ट्राला त्यानें विशिष्ट वळण लावून दुष्ट प्रवृत्तींपासून बहुधा अलिप्त ठेविलें. कांहीं थोडे बहुत युद्धप्रसंग झाले, तरी त्यांना तत्कालीन किंवा आधुनिक युरोपांतील क्रूर हिंसावृत्तीचें स्वरूप कधींच प्राप्त झालें नाहीं. शाहूच्या या अहिंसा वृत्तीचीं उदाहरणें वर ठिकठिकाणीं देण्यांत आलीं आहेत. सूड व प्रतिकार या भावना शाहूनें कशा दाबून टाकिल्या त्यांचींहीं उदाहरणें शाहूच्या वागणुकींत भरपूर व्यक्त झालेलीं आहेत. म्हणूनच राष्ट्रपिता ही पदवी शाहूला कोणीं दिली तर ती योग्यच ठरेल.

८ **व्याप.**—नशिबाचे खेळ शाहू छत्रपतीप्रमाणें दुसऱ्याकोणी कधीं पाहिले नसतील. पहिल्या पंचवीस वर्षांतील त्याच्या यातना वाचकांना अवगत आहेतच. त्या विपत्तिसमयीं तो कधीं डगमगला नाहीं. धैर्य धरून त्यानें भावी उन्नतीचा मार्ग स्वतःच्या बुद्धिप्रभावानें निर्माण केला. पुढील भाग्यकाळांत उन्माद व उपभोग टाकून अर्धा शतकपावेतों स्वराष्ट्रधुरा त्यानें सांभाळली. एवढ्या अवधींत त्याच्या सरदारांनीं देशभर लढून मराठ्यांचें राज्य वाढविलें. स्वकीयांप्रमाणेंच परप्रांतीय लोक देखील त्याची आज्ञा झेलूं लागले. शत्रूंना त्याचे नांवाचा दरारा वाटूं लागला. हंमेश कोणत्या ना कोणत्या तरी नवीन विजयाची बातमी येऊन त्याचें अंतःकरण आनंदानें खुलून जात होतें. आपल्या दीर्घ कारकार्दीत त्यानें स्वकीय

परकीयांचा परामर्ष उदार अंतःकरणानें घेतला. प्रत्येकाच्या कामगिरीचा भरपूर मोबदला देऊन जनतेचें सुख तेंच आपलें जीवितसाफल्य मानलें. सदैव कारभारात निमग्न, स्वहस्तानें असंख्य पत्रें लिहिणारा, राज्याचा वाढता व्याप सांभाळणारा, लोकांच्या सुखदुःखांत संविभागी व समरस होणारा असा राज्यकर्ता सामान्यतः दुर्लभच होय. त्याच्या प्रचंड व्यापाची कल्पना तत्कालीन कागदांत स्पष्ट उमटलेली दिसते. तंटे, भांडणें, मारामाऱ्या, चोऱ्या, दरवडे, खून, अपघात इत्यादि प्रकार तर त्याला उलगडावे लागतच; शिकार हा त्याचा आवडीचा व्यवसाय, त्या शिवाय खेळ, बिदाग्या, मेजवान्या, दरबार, सरदारांचे रुसवे, समजुती व पाठवण्या, विवाहादिसमारंभ, बायापुरुषांचे सत्कार, परराज्यांतील वकिलांच्या व पाहुण्यांच्या भेटी व जबाब, आप्तस्वकीयांचे जन्ममृत्यू, जयापजयाचीं वर्तमानें, अशीं किती प्रकरणें रोजच्या रोज त्यास विल्हेस लावावीं लागत, त्यांची कल्पना त्या वेळच्या लेखांत आढळते. सरदारांस पैसा व फौजा पुरवणें, त्यांचे अंतर्गत द्वेष मिटविणें, कर्जें काढणें व तीं वारणें असले व्यवहारही रोजच्या रोज शाहूस पाहावे लागत. व्याप व कामें दिवसेंदिवस वाढत गेलीं. ज्याला जें काम सांगावें तें त्यानें फत्ते करून यावें, असा आत्मप्रत्यय नोकर वर्गास येत गेल्यानें शाहूच्या योजकतेची चहूंकडे वाखाणणी होऊन हा राजा पुण्यवान् आहे अशी भावना उत्पन्न झाली.

राष्ट्रांत हजारों नवीन कर्तबगार माणसें निर्माण केलीं हें शाहूचें कृत्य न सांगतांही आज चिरस्मरणीय झालें आहे. हजारों कुटुंबें सर्व जातींचीं व सर्व वर्गांतली शाहूच्या प्रोत्साहनानें पुढें आलीं, त्यांच्याच कर्तबगारीनें मराठ्याचा आजचा इतिहास बनला आणि कोणत्या ना कोणत्या रूपानें तीं कुटुंबें अद्यापि पूर्वजांच्या उद्योगाचें फल उपभोगीत आहेत. शाहूनें दिलेल्या सनदाच आपल्यापुढें हजारांनीं मोजण्यासारख्या असून त्याच महाराष्ट्राच्या कर्तबगारीची साक्ष पुरवितात. विद्यमान मराठी राज्यें, सरदार घराणीं, इनामें मिळविलेलीं देवस्थानें वगैरे बहुतेक शाहूकालीन आहेत. धनाजी व पिलाजी जाधव, संताजी घोरपडे व त्यांची प्रचुर कुटुंबें, नागपूरकर भोसले व एकेकाळीं अर्ध्या हिंदुस्थानास व्यापणारा त्यांचा उद्यम, समस्त चिटणीस घराणें, प्रतिनिधि वगैरे अष्टप्रधान व त्यांचे मुतालिक, आंगरे, दाभाडे, राजाज्ञा, इचलकरंजीकर, बारामतीकर, विस्तृत पटवर्धन मंडळ अशा कित्येक हयात व कित्येक दिवंगत कुटुंबांची नुसती नांवनिशी देणेंही शक्य नाहीं. सिंदे, होळकर, पवार,

गायकवाड यांचीं राज्यें तर आज आपल्या दृष्टिपुढें आहेतच. राष्ट्राच्या उद्योगास भरपूर क्षेत्र पुरविणें आणि तें क्षेत्र व्यापण्यास लायक माणसें निर्माण करणें, हें शाहूचें द्विविध कार्य इतिहासांत चिरस्थायी बनलें आहे. त्याचें दृश्य प्रतीक जें शाहूनगर अर्धा शतकपावेतों देशभर गाजलें, तें आतां नामशेष झालें असलें, तरी तेंच शाहूचें मुख्य अधिष्ठान होतें हें सदैव लक्षांत ठेवणें जरूर आहे.

शाहूच्या कारभाराचा स्मरणीय गुण परहितासाठीं झटणें हाच सांगतां येईल. लाखांनीं मोजण्यासारखे पुष्कळ सरदार पदरीं बाळगणारा हा राजा कित्येक हजारांच्या कर्जापायीं गांजलेला पाहून त्याजबद्दल अनुकंपा वाटूं लागते. घासभर अन्न व लोटाभर पाणी एवढ्यातच त्यानें स्वतःचें समाधान मानलें. पेशवे कर्तबगार पाहून त्यांजवर त्यानें संपूर्ण भार टाकिला. पेशव्यां-प्रमाणेंच इतर कुटुंबांना त्यानें पुढें आणिलें. त्याच्या बुद्धींत जातिभेद, धर्मभेद, वगैरे संकुचित भावना बिलकूल नव्हती. त्याची बुद्धि निर्मल जलाप्रमाणें निष्पाप होती. समता व बंधुता हीं आजकालचीं उच्च तत्त्वें शाहूच्या इतकीं दुसऱ्या कोणीं पूर्वी कारभारांत पाळलेलीं आढळणार नाहींत. म्हणूनच पुण्यश्लोक, अजातशत्रु अशा संज्ञांनीं तत्कालीन लेखक त्याचें वर्णन करितात. रघुनाथ पंडितानें नलराजाचें वर्णन पहिल्या पद्यांत केलें आहे तें तत्त्वतः शाहू छत्रपतीसही चांगलें लागू पडतें.

शिवाजीनें निर्माण केलेला, कोणासही चाकरीबद्दल जमीन तोडून न देण्याचा दंडक शाहूनें मोडला आणि नवीन मोठमोठे जागीरदार निर्माण केले त्या योगानें मराठी राज्य मोडलें, असा दोष पुष्कळांनीं शाहूला व पेशव्यांना दिलेला आढळतो. या मुद्याचा विचार प्रसंगानुसार ठिकठिकाणीं केला आहे. जागीरदार मराठी राष्ट्राच्या संकटकाळीं निर्माण झाले, त्यांस हाताशीं घेऊन शाहू व पेशवे यांनीं पुढें राज्याचा उद्योग केला. तत्कालीन परिस्थितींत दुसरा मार्गच नव्हता. जागीरदारांना धाकांत ठेवून त्यांजकडून योग्य कामें घेणारा धनी विद्यमान असेपर्यंत ही पद्धत यशस्वी ठरली. तसा धनी उरला नाहीं तेव्हांच राज्यनाश झाला ही गोष्ट स्पष्ट आहे. यांत शाहूनें मराठ्यांचा सामान्य स्वभाव भांडखोर व स्वार्थी आहे, हें ओळखून त्याच वृत्तीचा उपयोग राष्ट्रोद्योगाकडे करून घेतला. सरदारांस जवळ बोलावून शाहूनें काय कळविलें

याची कल्पना करणें कठिण नाहीं. तो म्हणे, 'तुमच्या हातांत पैसा नाहीं, आमच्याही नाहीं. मुलुख सगळा तुमचा आहे, फौजा जमवा, सोयीस येईल तिकडे संचार करीत जा, ठाणीं बसवा, वाडे बांधा, वसाहती करा, उद्योग-धंदे-व्यापार-सावकारी चालू करा, मंदिरें बांधा, देवाब्राह्मणांचें संगोपन करा, अनाचार व द्वेष कोणाचा करूं नका, म्हणजे देवही तुम्हांस पावेल, तुमचें दैन्य फिटेल, राष्ट्राचें भाग्य उदयास येईल. पैसा नाहीं तर कर्ज काढा, उद्योग वाढवून तीं फेडा.' असा हा स्वावलंबनाचा बिनभांडवली धंदा शाहूनें लोकांस दाखविला आणि आपल्या हयातींत त्यांत यश संपादिलें. पश्चात् हा धंदा बुडाला त्याची जबाबदारी शाहूवर नाहीं. इंग्लंडांत ईस्ट इंडिया कंपनी स्थापन होऊन इकडे उद्योग करूं लागली, तिचा धंदा तरी अशाच स्वरूपाचा नव्हता तर काय ! कंपनीनें भांडवल उभारलें, वखारी घातल्या. शाहूच्या सरदारांनीं कर्जे काढलीं, जिवास जीव देणारे साथीदार जमविले, साहस स्वीकारून अडचणींस तोंड दिलें, वेळीं प्राणही खर्ची घातले. कोणी नागपुर वसविलें तर कोणीं धारेस ठाणें दिलें, कोणीं इंदुरास पेशव्यांच्या पुणेरी वाड्याची नक्कल उठविली, ठिकठिकाणीं मंदिरें बांधिलीं, बाजार पेठा घातल्या, अठरा पगड जातींचे महाराष्ट्रीय साथीदार दक्षिणेंतून नेऊन उत्तरेंत नवीन छावण्या वसविल्या, त्यायोगें मराठशाहीचा फैलाव त्वरेनें होऊन आपला इतिहास बनला. आजच्या बृहन्महाराष्ट्र चळवळीचें अधिष्ठान शाहूच्या वरील उद्योगांत सांपडेल. पांचशें वर्षें ही भारतभूमि हताश होऊन हिंदूंनां त्राता म्हणून कोणी उरला नव्हता, ही आपत्ति निवारण करण्याचें कृत्य प्रथम शिवाजीनें सुरू केलें त्याची सांगता शाहूनें केली. हिंदूंना पुनरपि ऊर्जित काळ उद्भवला. भीमथडीच्या तट्टांनीं पंचनद्यांवर व अटकेवर जलपान करून तृषा भागविली, हा पंनास पाऊणशें वर्षांचा खेळ इतिहासांत आज गाजतो त्याचें श्रेय शाहूला आहे. ईस्ट इं. कंपनीला देखील आपला जम बसविण्यास याहून जास्त काल लागला. उभयतांमधला भेद एवढाच, कीं शाहूनें कोणाचाही हेवादावा न करितां सर्वांचें प्रेम संपादिलें. नादीरशाही किंवा क्लाइव्हशाही यांचा अनन्वित प्रकार आपण वाचतों, तशा द्रव्यापहारबुद्धीस शाहूनें थारा दिला नाहीं. गोवधबंदीचें फर्मानहिंदुस्थानांत सुटलें, तीर्थक्षेत्रें निर्वेध बनलीं, सावकारी पेढ्या निर्माण झाल्या, उत्तर दक्षिण प्रदेशांचे दरम्यान सांस्कृतिक देवघेव झपाट्यानें चालून महाराष्ट्राचें जीवन पुष्ट व समृद्ध बनलें, त्यांत

चांगल्या बरोबर वाइटाचाही प्रादुर्भाव थोडाबहुत झाला असला तर तो सृष्टिक्रमास धरून आहे.

पुरंदरे, हिंगणे, पाटणकर, दाणी अशीं अनेक ब्राम्हण घराणीं मराठ्यांच्या बरोबरीनें राष्ट्रोद्योगांत पुढें आलीं, त्यांच्या हकीकती व आख्यायिका इतक्या विपुल आहेत, कीं त्यांच्या योगानें शाहूच्या कारभारास व मराठ्यांच्या इतिहासास अप्रतिम उजाळा आला आहे. नासिकचा तीर्थोपाध्या महादेवभट हिंगणे बाळाजी विश्वनाथाबरोबर दिल्लीस जाऊन तेथें परराजकारणाचा व्यवसाय सांभाळतो आणि दिल्लीच्या वजिरास समक्ष भेटींत आव्हान देतांना प्राणार्पणाचें साहस पत्करितो, हें एकच उदाहरण मराठ्यांच्या वाढत्या तेजाचें निदर्शक ठरेल. भास्कररामाचा बंगाल्यांत खून झाला त्यामुळेंच त्या प्रांतावर मराठ्यांचा शह बसला. शाहूचा एकंदर कारभार व अद्यापि अवशिष्ट असलेली शाहूनगरच्या रचनेची स्मृति या गोष्टी इतक्या कथापूर्ण व रसाळ आहेत, कीं त्या महाराष्ट्राच्या अंतःकरणांतच भिनलेल्या दिसतात. अशा कथांचें दिग्दर्शन या ग्रंथांत ठिकठिकाणीं केलें आहे त्यांवरून शाहूची योग्यता कळून येईल.

९ **पार्श्वभूमि.**—शाहूचा स्वभाव इतका मृदु कां बनला तें सहज कळून येतें. बापास हालहाल करून ठार मारिलें हा देखावा त्याच्या दृष्टिपुढें असून खुद्द त्याचें जीवित तशाच धोक्यांत असतां परिस्थितीशीं झगडण्याचें एकच हत्यार त्याला अनुकूल होतें, तें त्यानें स्वीकारलें. गोड व विनम्र वृत्ति ठेवून त्यानें शत्रु मित्रांना जिंकिलें. औरंगजेबाचे सरदार, पुत्र, कन्या, नोकर-चाकर इत्यादींचीं अंतःकरणें त्यानें आपल्या सौम्य स्वभावानें वेधून घेतलीं. प्रत्यक्ष बादशहा देखील त्यास म्हणूं लागला, "तुमचे आजे शिवाजी महाव्रात्य, प्रत्यक्ष सैतान, पण तुम्ही नातू तसे नाहीं, तुम्ही साव, सच्चे, तुमचे भलें करावें असेंच आमच्या मनांत सदैव वागतें." शाहू नांव त्याचें अशा प्रकारें महशूर झालें हें सुप्रसिद्ध आहे. औदार्यानें, परोपकारानें, गोड जिव्हेनें, प्रेमळ वर्तनानें दुनियेस आपलीशी करण्याचें अवघड कसब शाहूला अशा प्रकारें परिस्थितीनें शिकविलें. विपत्तींतून चांगले दिवस निर्माण करण्यास शाहूजवळ हा एकच बिनमोलाचा सुसाध्य उपाय स्वाधीनचा होता, तो त्यानें जितका प्रथमायुष्याच्या बादशाही कैदेंत उपयोगांत आणिला, तितकाच पुढील सिंहासनस्थ अधिकारांतही आणिला. सुटकेपासून पांच महिन्यांच्या अवधींत त्यानें

छत्रपतिपद पैदा केलें, कजाख चुलतीस आवरलें, मराठमंडळास आत्मिक बनवून कार्यप्रवण केलें, लोकांस भजनीं लाविलें. बेचाळीस वर्षांच्या कारकीर्दीत ज्या शेंकडो सनदा त्यानें सोडलेल्या आपल्यापुढें आहेत, त्यांत उपकारफेड, प्रोत्साहन, भूतमात्राविषयीं अनुकंपा व औदार्य हे भाव उत्कटत्वानें प्रगट झालेले दिसतात. प्रत्यक्ष गुन्हेगारांवर देखील त्याच्या या स्वभावाची छाप बसली. मारेकऱ्यांच्या हातचीं हत्यारें गळून पडलीं, इंद्रोजी कदमाचा दिमाख जिरून गेला, सवाई जयसिंग हार्दिक दोस्त बनला, प्रत्यक्ष ब्राह्मण पेशव्यानें पितृतुल्य भावनेनें या छत्रपतीची अंतक्रिया सिद्धीस नेण्यांत कृतार्थता मानली. “ तुम्ही स्वामींचे पुरातन सेवक, रायगडापासून एकनिष्ठपणें कष्ट मशागत केली, संकटसमयीं उपयोगास आलां, प्राणरक्षण केलें, तुमचें चालविणें स्वामींस अगत्य ” अशी या सनदांची भाषा वाचून अंतःकरण भरून आल्याशिवाय राहात नाहीं. साताऱ्यास खतीबांचें घर व मशीद आहे. या खतिबांना शाहूनें बादशाही छावणींतून आपल्याबरोबर आणिलें आणि त्यांस खुत्बा पढण्याचा अधिकार दिला. या सनदेंत पुढील मजकूर आहे. “ तुम्ही आमच्या निवडक सरदारांपैकीं उच्च पदवीचे असून मुसलमानी धर्माला नमून वागणारे आहांत. म्हणून तुम्हांस तख्त ठेवण्याकरितां साताऱ्चा किल्ला व सरदेशमुख किताब देण्यांत येत आहेत. कारण तुम्ही झीनतुन्निसा बेगम यास पोटच्या पुत्राप्रमाणें होतां.”§ खतिबांबरोबर बादशाही पंजे शाहूनें आपल्या उपकारकर्त्या बेगमेच्या स्मरणाकरितां साताऱ्यास आणिले. या पंजांची पूजा करून खतीबांना कुटुंबीयांप्रमाणें शाहूनें वागविलें. अर्थात् हिंदु-मुसलमानांचा द्वैतभाव शाहूच्या अमदानींत केव्हांही उत्पन्न झाला नाहीं. ब्रह्मेन्द्रस्वामी, कच्चेश्वरबावा, ठाकूरदास बोवा, गोसावी, रामदासी अशा कितीक धर्मगुरूंना शाहूनें आदरपूर्वक स्वनगरीं आणून त्यांचे धर्माशीर्वाद स्वीकारिले. “ सय्यद आतावाला पीरजादे शकरकोटी हे भले थोर सत्कर्मी रत याजकरितां स्वामी कृपाळु होऊन यांस मौजे लोणीगांव इनाम दिल्हा असे. ” या मुसलमानास दिलेल्या सनदेवरून शाहूची भावना किती समबुद्धीची व सर्वसंग्राहक होती हें दिसून येतें. क्रिस्ती धर्मीयांसही त्याचा आश्रय असाच समभावनेचा होता. वसई घेतल्यावर कोंकणांतील धर्मच्छलक क्रिस्ती पाद्र्यांचा शाहूनें उच्छेद न करितां उलट त्यांचा योग्य परामर्ष घेतला. मानवी समता

§ हतवळणेकृत सातारा वर्णन पृ. १३

त्याच्या स्वभावांतच भिनलेली होती. मनुष्य तेथून सर्व सारखे, उच्चनीच कोणी नाहीं ही त्याची समजूत पदोपदीं व्यक्त होत असे.

**१० समबुद्धि.**—योगिजनास शोभणारी अशी ही समबुद्धि बादशहाचे कैदेंत असतां त्याचे ठिकाणीं बनत गेली. वयाचीं सतरा वर्षें कर्मठ बादशहाच्या सांनिध्यांत गेल्यामुळें स्वधर्मापेक्षां मुस्लीम धर्माचेंच आचरण अहोरात्र त्याच्या लक्षांत भरत होतें. कदाचित् त्या धर्माचें इंगित ओळखणारा दुसरा निपुण गृहस्थ त्या वेळीं हिंदूंमध्यें बहुधा कोणी नसेल. झीनतुन्निसा बेगमेनें त्याचें संगोपन पुत्र समजून केलें, म्हणून तिच्याबद्दल शाहूच्या अंतःकरणांत मातृप्रेम वसत होतें. संभाजीसंबंधानें त्या बेगमेच्या मनांत पतिभावना वागत होती, असा जो बखरकारांचा उल्लेख आढळतो, तो सर्वथा अवास्तव मानण्याचें कारण नाहीं. संभाजीचा वध सर्वांच्या डोळ्यासमोर घडलेला ताजा होता. जरा अंतर्भेदी दृष्टीनें तत्कालीन घडामोडी उकलून पाहिल्या म्हणजे त्यांत पुष्कळ गर्भितार्थ दिसून येतो.

ज्यांची प्रत्यक्ष ओळख नाहीं अशा सामान्य रयतेचा परामर्ष घेतलेले, लोकांच्या तक्रारी दूर करून त्यांच्या सुखसोई करून देणारे कागदही कांहीं थोडेथोडके नाहींत. मराठ्यांच्या इतिहासांतील मुख्य संभूति शाहू महाराजांच्या प्रोत्साहनानें निर्माण झालेली आपल्यापुढें आहे. त्यापूर्वीच्या शिवकालांतील प्रात्यक्षिक अवस्था कालोदरांत गडप होऊन गेली. आज वावरणारीं घराणीं, इनामें, उत्पन्नें बहुतेक शाहूकालीन असून त्यांचाच ठसा महाराष्ट्रावर कायमचा उमटलेला दिसतो. भिन्न प्रकृतींच्या व भिन्न-लायकीच्या व्यक्तींस एका कार्यक्रमांत गोवून त्यांजकडून योग्य कामगिरी घेणें हें अवघड काम शाहूइतकें दुसऱ्या कोणी सिद्धीस नेलें नसेल. सर्वांकडून त्यानें घडेल ती सेवा घेतली. अनेक जहांबाज व्यक्ती युक्तीनें वठणीस आणिल्या. परशुरामपंत प्रतिनिधि, दमाजी थोरात, उदाजी चव्हाण, उदाजी पवार, प्रत्यक्ष चुलती ताराबाई व संभाजी, चंद्रसेन जाधव, जानोजी निंबाळकर अशा अनेक व्यक्ती दाखवितां येतील, कीं त्या विरोधी असूनही शाहूच्या भजनीं लागल्या, निदान निरुपद्रवी बनल्या. प्रत्यक्ष ज्यास सजा भोगावी लागली असा एकच इसम कान्होजी भोसले दिसतो. पण त्याचेंही शाहूनें वाईट केलें नाहीं. चंदासाहेब सात वर्षें साताऱ्यावर कैदेंत असूनही त्याची

व्यवस्था घरच्यासारखी उत्कृष्ट ठेवण्यांत आली होती. तो बिलकूल असंतुष्ट नव्हता. त्यानें दंगा धोपा कांहीं केला नाहीं.

ढिला, आळसी व विलासी असे शाहूचे कित्येक दोष अनेकांकडून दाखविण्यांत येतात. पण त्यांची उपपत्ति भिन्न प्रकारें लागते. राजे लोकांचा सामान्य रिवाज असा दिसतो, कीं आपण तेवढे गुणसागर, नोकर व लोक सर्व चुकारू. कोणत्याही सत्कृत्याचें श्रेय आपण घ्यायचें, दोष तेवढे लोकांच्या माथीं मारायचे. हा ढोंगीपणा शाहूचे अंगीं बिलकूल नव्हता. त्याला आंत बाहेर असें कांहीं नव्हतें. चूक झाली तर तो लगेच पदरांत घेई आणि भलाईचा वांटा दुसऱ्याचे पदरांत टाकी. इतरांचे सुख तेंच आपलें असें तो मानी. कठोर वृत्ति धारण करण्यास तो धजत नसे. रणांगणावर कठोर वृत्तीचा अवलंब करावा लागतो, म्हणून तो पेशा त्यानें सदैव त्याज्य मानला. तरी प्रत्येक राष्ट्रीय हालचालींकडे त्याचें लक्ष पूर्ण वेधलेलें असे. रिकामा म्हणून कधीं बसला नाहीं, सारखें काम चालू असे. प्रवासांत, शिकारींत, शय्यागृहांत कोठेंही तो असला तरी कामास खळ पडत नसे. सरदारांच्या भेटी घेणें, त्यांचे रुसवे व समजुती काढणें, जरब दाखविणें, बक्षिसें देणें, शिक्षा करणें, सर्वांस चालक पेशव्यांच्या लगामीं लावणें या गोष्टी तो दयार्द्रतेनें, आपुलकीच्या भावनेनें, पापभीरुत्वानें सिद्धीस नेई. मनानें मोकळा, स्पष्ट बोलणारा, स्वभावज्ञ व समयज्ञ, सदाचरणी, उदार, दीलदार, स्वतः झीज सोसून राज्याचें हित जोडणारा, परदुःखानें गहिंवरणारा, असा हा शाहू राष्ट्राला संकटकाळीं लाभला, म्हणूनच मराठी राज्याची त्वरित वृद्धि होऊन गोडवे गाण्याजोगा आपला इतिहास बनला. नाहीं तर औरंगजेबाचे मृत्युसमयीं मराठी राज्य म्हणून कांहीं नव्हतेंच. तामसी वृत्तीचे मुसलमान किंवा हिंदु कांहीं थोडे नव्हते, त्यांच्या झगडण्यांत सर्व-स्वाचा नाश होण्याचाच संभव जास्त होता. या आपत्तींतून स्वराज्याचा बचाव करून त्याचा विस्तार मोठ्या साम्राज्यांत करण्याचें श्रेय मुख्यतः शाहूस व त्यास भजणारे पेशवे यांसच दिलें पाहिजे.

शाहूचें राजमंडळ म्हणजे एक विश्वकुटुंब बनलें होतें, हें वर सांगितलेंच आहे. पेशवे, प्रतिनिधी, इतर प्रधान, सरदार, मानकरी, वकील, राण्या, रक्षा, दासदासी, नोकरचाकर सर्व या मंडळांत एकजीव बनले होते. विरूबाई नुसती रक्षा खरी, पण तिला सर्व राजमंडळ मातुश्रीचा मान देई. इतर सामान्य

कुटुंबांतले रागद्वेष याही विश्वकुटुंबांत भरपूर होते. वैयक्तिक मतलब, चढाओढ, हेवेदावे, खटपटी असले प्रकार त्यांत नव्हते असें नाहीं, पण त्यांचें स्वरूप खेळीमेळीचें असून गळेकापूपणाचें नव्हतें; आणि शेवटीं महाराजांची आज्ञा सर्वच मान्य करीत असल्यामुळें प्रकरण विकोपास जात नसे. एकीच्या भावनेनें अठरापगड जाती मोहिमात व रणांगणावर एकमेकांच्या खांद्यास खांदा लावून आपलीं कामें करीत. या राजमंडळाचें कर्तेपण वडील कर्त्या पुत्राप्रमाणें पेशव्याकडे असून तोही तशाच भावनेनें एकंदर व्यवहारांची निगा अंतः-करणाच्या जिव्हाळ्यानें ठेवी. एवंच मराठमंडळाचा हा स्वामी शाहू तत्कालीन राष्ट्राचा प्रचंड बलसंचय व राष्ट्रोद्योगाचा मूर्तिमंत अवतार बनला होता.

११ **दोषाविष्करण.**—शाहूच्या अंगीं दोष मुळींच नव्हते असें म्हणतां येत नाहीं. छत्रपतीनें जाग्यावर बसून वर्धमान राज्याचे व्यवहार उलगडण्याचा रिवाज पाडला तो घातक झाला. प्रत्यक्ष बाह्य प्रदेशाची भौगोलिक रचनाही त्यास अवगत नसल्यामुळें निष्कारण कलह माजत आणि कारभारांत घोटाळे उत्पन्न होत. सरदारांच्या अंतस्थ लाथाळ्या ज्या प्रत्यक्ष क्षेत्रावर एखाद्या सेनानीस सहज मिटवितां आल्या असत्या, त्या निष्कारण वाढत गेल्या. जंजिऱ्यावरील मोहीम व तिचें कागदी भारूड वरील कारणानें उपस्थित झालेलें दिसतें. पेशव्याचें कुटुंब यशस्वी समजून शाहूनें हाताशीं धरिलें तें गैर नव्हतें, पण पुष्कळदां पेशव्यांचा शिरजोरपणा पुष्कळांस जाचक होई तो केवळ धनीच मिटवूं शकला असता. शाहूची सत्ता मुख्यतः नैतिक स्वरूपाची होती, तिला व्यावहारिक दृष्टीची जोड असती तर जास्त उपयोग झाला असता. थोरल्या शिवाजीचें कर्तृत्व मनांत आणलें म्हणजे शाहू पुष्कळसा हलका दिसतो यांत संशय नाहीं. पण जाग्यावर बसून नैतिक दरारा तो केवढा गाजवी हें प्रत्यक्ष नानासाहेबाच्या पदच्युतीवरून व्यक्त झालेंच आहे. पेशवे व इतर सरदार मुलूखगिरीवरून येतांच प्रथम शाहूला भेटून आपल्या कामाचा झाडा देत. सत्य शोधून पारिपत्य करण्यास शाहू कधीं हयगय करीत नसे. शाहूच्या मर्जीविरुद्ध एखादी गोष्ट करणें जवळच्यांस कठिण पडे. गोविंदराव चिटणीस त्याचा केवळ आत्मिक बनला होता. तो महाराजांची मर्जी सांभाळून युक्तीनें पुष्कळ कामें उरकून देई. चिटणीसाची सल्ला शाहू बहुधा मान्य करीत असे, म्हणून पेशवे सुद्धां गोविंदराव चिटणीसाची मनधरणी करून वागत. त्यानेंही कधीं आपल्या विश्वासाचा दुरुपयोग केला नाहीं.

दुसरा एक मुद्दा शाहूच्या कारभारांत जाचक होता, तो तत्कालीन लोकमताचाच निदर्शक आहे. "जुनें मोडूं नये, नवें करूं नये" ¶ हें तत्त्व प्रभावी गणलें जात होतें, तेंच शाहूनें स्वीकारिलें. जगांत स्थिर असें कांहीं नसून प्रसंग पडेल त्याप्रमाणें राज्यकारभारांत बदल होत गेले तरच राज्य चालतें. शिवाजीनें तर वरील अशक्य दंडक साफ धुडकावून दिला. जमिनी इनाम देणें त्यानें बंद केलें, मोऱ्यांसारखे प्रतिष्ठित सरदार कुलाच्या मोठेपणावर शिवाजीस विरोध करूं लागतांच त्यांस शासन केलें, मुसलमान झालेल्यांस प्रायश्चित्त देऊन स्वधर्मांत परत घेतलें; या त्याच्या तजविजी पाहिल्या म्हणजे जुन्यास चिकटून राहाण्याचें त्यानें कधीं मान्य केलें नाहीं. या बाबतींत शाहूनें तरी आपण होऊन नवीन असें कांहीं ठरविलें नाहीं. समाजाची सामान्य प्रवृत्ति विद्यमान होती तीच त्यानें पाळिली. हक्क, मान-मरातब, वृत्तिवेतनें इत्यादि प्रकार जुने चालत आलेले अविच्छिन्न पुढें शाबूद ठेवणें राज्यास अपायकारक असतें. लोकांच्या उत्पन्नांची व हक्कांची घालमेल पेशव्यांनीं करूं नये अशी लेखी आज्ञा मरणसमयीं शाहूनें जाहीर केली, त्याचा परिणाम पेशव्यांसच लगोलग भोगावा लागला. सरदार लोक उत्पन्नें तेवढीं सांभाळून राहूं लागले, फौजा ठेवून मर्दुमी करण्याचें विसरून गेले. चालू प्रघात तसेच पुढें चालविण्याकडे माणसाची सामान्य प्रवृत्ति असते. चतुरस्र राज्यकर्ता या प्रवृत्तीस जितक्यास तितकेंच महत्त्व देतो, हा प्रकार माधवराव पेशवा वगैरेंच्या उदाहरणावरून व्यक्त होणारा आहे. एकंदरींत शाहूनें जाग्यावर बसून कारभार केला त्याचा हा परिणाम होय.

**१२ लोभांतील मंडळी.**—शाहूचें एकंदर जीवन अर्धाशतकपावेतों महाराष्ट्राशीं निकट तादात्म्य पावलें होतें, त्याचे वृत्तान्त अनेक निरनिराळ्या ठिकाणीं विखुरलेले मनोरंजक असूनही सामान्य वाचकांस सहज मिळण्या-सारखे नाहींत. यास्तव पुष्कळसा विस्तार सोसूनही ते वाचकांपुढें मांडणें अवश्य वाटतें. मुख्यतः शेडगावकर बखर व भा० व० मासिकांतील शाहूबखर यांत तपशील मिळतात ते शाहूच्या निकटवर्ती सहचरांकडूनच प्रसिद्ध झालेले असले पाहिजेत.

विरुबाई, जोत्याजी केसरकर, बसवंतराव कासुरडे, विठोबा खोजे, इंद्रोजी कदम सुपेकर, शेट्या वाघजी संकपाळ, हुजरे मायाजी फडतरे, मेगोजी

¶ ऐ. प. २९,३०.

हुकेबारदार, अशा कित्येक मंडळींच्या मनोरंजक आख्यायिका उपलब्ध आहेत. सातारा व त्याच्या आसमंतांतील शाहूच्या वेळचीं स्मरणीय स्थळें व खुणा, तसेंच शाहूचा स्वभाव व जवळची मंडळी, यांसंबंधानें रु. १ च्या बखरींत पृष्ठ ११९ पासून १३६ पावेतों मजकूर अवश्य वाचण्यालायक आहे. आपल्यावर झालेल्या उपकारांची फेड शाहू अत्यंत दक्षतेनें व सढळ हातानें करीत असे. जोत्याजी केसरकर याचे पूर्वोपकार स्मरून त्यास शाहूनें मोठ्या योग्यतेस चढविलें. 'बालपणापासून एकनिष्ठपणें त्यानें सेवा केली, व त्याची सेवा घेतली. सबब महाराज छत्रपति स्वामी त्यावर कृपाळु होऊन त्यास सरदेशमुखी वतनाचे वतनी गुमास्ते केलें, आणि १८ कारखान्यांवर अधिकार देऊन दरख नेमून दिले. जरीपटका त्यानें स्वारीबरोबर हत्तीवर पुढें धरावा; व शहर सातारा येथें वाड्यापुढें सरकारी होळी होईल तीस त्यांनीं पोळी बांधावी व पूजा करावी. याप्रमाणें मानपान करून दिले. दक्षिणेंत आले तेव्हां उतरले, तेथें केसरकर यांनीं गुरुवार पेठेची वसाहत केली, या पेठेची जकात माफ व कायदेकानू वगैरे त्याजकडे चालवावे, अशीं राजपत्रें करून दिलीं. तुम्हीं आपलें लग्न करावें, अशी आज्ञा केली असतां केसरकरांनीं स्वामीस अर्ज केला कीं, माझें म्हातापण, ऐशीं वर्षांची उमर, आतां लग्न नको; परंतु महाराजांनीं पुत्र होतील असा आशीर्वाद दिल्यावरून त्यानीं लग्न केलें. कांहीं दिवसांनीं त्यांना दोन पुत्र झाले. सांवताचे वाडीनजीक केसरी गांवचे वतनदार म्हणून केसरकर नांव पडलें.' बाजीराव व परसोजी भोसले, अंबाजी त्रिंबक व लक्ष्मण गोमाजी पुरंदरे, महादाजी यमाजी व यशवंत गंगाधर बोकील, खरगोणचे जागीरदार गुलाबराव, गदाधर प्रल्हाद, बापूजी सोनाजी दिघे, खंडोबल्लाळ, नारोराम, शेखमिरे, विसाजी नारायण जाखी, आनंदराव सुमंत, बारामतीकर जोशी वगैरे आपणांस प्रसंगीं साह्य करणारांस त्यानें मोठ्या योग्यतेस चढविलें. अशी आणखी शेंकडों उदाहरणें आहेत. कर्नाटकांतलें शहाजीचें वृंदावन, मौजें वड्डू येथील संभाजीचें वृंदावन यांची व अशाच पूर्वजांच्या व कुटुंबीयांच्या आठवणींची यथायोग्य व्यवस्था शाहूनें बांधून दिली. चिंचवडचे मोरयादेव, एकनाथ, तुकाराम, कल्याण गोसावी, सिद्धेश्वरबाबा, ठाकूरदास बाबा, ब्रह्मेन्द्रस्वामी, नासिक येथील पूर्णानंदस्वामी, मनसाराम उदासी, नानकपंथी व मुसलमान संत यांच्या समाधींच्या नेमणुका त्यानें बांधून दिल्या.§

§ इ स. पे. द. मा. पृ. १०, ११, ११९; शा. रो. ले. ८७–८८, ९३–९४ पे. द. मा. पृ. २३७, २४०, २५८

अशा नेमणुकांच्या सनदांतील मजकूर मासलेवाईक आहे. ‘आपल्या आशीर्वादानें आम्हांस राज्य प्राप्त झालें’ असें कचेश्वरबावास लिहून त्यांस साताऱ्यास आणून जवळ ठेवलें. विठ्ठल विश्वनाथ घिसास, पुरंदरे, महादाजी कृष्ण जोशी, बोकील अशा सर्वांस ‘तुम्ही आमच्याकरितां कष्ट मेहनत केली, अडचणींत कर्ज देऊन परामर्ष घेतला, एकनिष्ठ सेवा केली व करीत आहां, तुमचें चालविणें स्वामींस अगत्य’ अशा कनवाळु भावनेची शब्दयोजना केवळ त्याच्याच वाणींतून प्रसवली असली पाहिजे. यांत त्याचें हृद्गत ओतलेलें प्रत्ययास येतें.

शाहूमहाराजांविषयीं पुष्कळ गोष्टी व आख्यायिका जर अद्यापि सांगण्यांत येतात, तर त्यांच्या हयातींत व मृत्यूनंतर कांहीं काळपावेतों त्या पुष्कळच प्रचलित असल्या पाहिजेत. आख्यायिका जरी अक्षरशः खऱ्या नसल्या, तरी तात्पर्यार्थानें त्यांत तथ्य असतें, आणि म्हणूनच एकाद्या ऐतिहासिक व्यक्तीच्या आख्यायिका म्हणजे तिचा स्वभाव ओळखण्याची मुख्य खूण मानतात. एके प्रसंगीं सरदार इंद्रोजी कदम आपलें व हाताखालच्या लोकांची शरीरें मोलवान दागदागिन्यांनीं सजवून मोठ्या ऐटीनें शाहूचे भेटीस आला. महाराजांस हा प्रकार समजल्याबरोबर त्यांनीं आपल्या खंड्या कुत्र्याचे अंगावर दागदागिने, पागोटें, शिरपेंच वगैरे चढवून त्यास दरबारांत बसविलें आणि आपण जवळ साधें कुडतें घालून बसले. त्या सरदारानें दरबारांत येऊन हा प्रकार पाहिल्यावर त्याचें मन खट्टू झालें आणि महाराजांची वाखाणणी करून रीतीप्रमाणें भेट घेऊन निघून गेला. त्यास लष्करी सामर्थ्यानें अटकाव करणें शक्य असतांही शाहूनें वरील सौम्य उपचारानें लोकास साधेपणाचा व संसारांतील खऱ्या रहस्याचा धडा शिकविला. एकंदरींत इहलोकच्या संसारयात्रेचें बीज शाहूनें ओळखून त्याचा प्रभाव पन्नास वर्षेपावेतों मराठमंडळावर बिंबविला.

बाळाजी विश्वनाथ, रघूजी व फत्तेसिंग भोसले, प्रतिनिधि वगैरे अनेक मंडळीस शाहूनें किती योग्यतेस चढविलें, तें महशूर आहेच. आख्यायिकांवरून शाहूच्या स्वभावाची अटकळ होते. अनीतीचा किंवा गाफीलपणाचा ध्वनि शाहूच्या संबंधानें ऐकूं येत नाहीं, सर्वत्र गौरवच आहे. **बसवंतराव कासुरडे** नांवाचा जातीचा वाणी विरूबाईजवळ होता. विरूबाईही त्याच्याच जातीची होती. ती दोघें एकमेकांचा अभिमान बाळगून बहीण

भाऊ म्हणवीत. जनानखान्यांत राहाण्यायोग्य असल्यामुळें बसवंतराव खोजे असें नांव त्यास पडलें होतें. विरूबाईला तो समुद्रस्नानास घेऊन गेला होता. जनानखान्यास दरुनीमहाल असें म्हणत, त्या ठिकाणीं बसवंतरावाचा सक्त पहारा असे. त्याच्या दक्षतेचीं उदाहरणें घडून आल्यावरून शाहूनें त्यास उदंड द्रव्य बक्षीस दिलें. तो म्हणे 'राजे मोठे पुण्यप्रतापी, पुण्यपुरुष, दानशूर, लहानथोरांस देणग्या देऊन कीर्ति जगविख्यात केली; राज्यांत सर्वांचा जीर्णोद्धार केला. प्रत्यक्ष शिवाचा अवतार.' बसवंतरावानें पुष्कळ द्रव्य जमा केलें, तें तो सरकारांत देऊं लागला; परंतु महाराजांनीं त्यास दानधर्म करण्यास सांगितलें. त्यावरून श्रीशंभुमहादेवाचें देवालय हेमाडपंती सिंघणराजाच्या वेळेचें होतें, तें उकलून बारामतीहून दगड आणून देवालय नवीन बांधविलें. पायरीचे कांसवालगत 'चरणीं तत्पर बसवंतराव निरंतर,' अशीं अक्षरें कोरलेलीं आहेत. साताऱ्यांत बसवंतपुरा ऊ० बसाप्पाची पेठ व बसाप्पाची वाडी त्याच्या नांवाची आहे. कसबे निंब येथें विरूबाईनें बाग व विहीर बांधिली, त्यानजीक बसाप्पानें वाडा बांधिला. विरूबाईनें परळी किल्ल्यावर रामदासाचे समाधीसमोर आपल्या नांवचें एक तुळशीवृंदावन बांधिलें, आणि शंभुमहादेवास तिनें एक दीपमाळ बांधिली. शंभुमहादेवाचा पुजारी शिवरामभट याजवर बसवंतरावाची मेहेरबानी होती. त्याजला तेथें राहण्यास ठिकाण करून दिलें.

**मायाजी फडतरे** नांवाचा दुजऱ्या हुशार व अक्कलवान असून शाहूच्या कृपेनें मोठ्या योग्यतेस चढला होता. तसेंच श्रीनिवासराव प्रतिनिधि यांजवर महाराजाची फार मर्जी होती. त्यांस स्वतः 'राव' अशी ते हाक मारीत. ते नित्य दर्शनास सरकारवाड्यांत येत. एके दिवशीं त्यांस येण्यास उशीर लागला, तेव्हां स्वतः महाराज त्यांच्या घरीं भेटीस गेले. महाराजांस शिकारीचा नाद विशेष होता. पुष्कळदां शिकारीच्या नादांत एकटेच कोठें तरी भटकत जात, त्या वेळीं ज्यांचा त्यांस उपयोग घडे त्यांचा परामर्ष ते स्मरणपूर्वक घेत.

मेगोजी हुक्केबारदार नांवाचा इसम बादशाही चालीप्रमाणें हमेशा हुक्का घेऊन स्वारीबरोबर फिरत असे. या मेगोजीवर शाहूची मोठी मेहेरबानी होती. महाराजांचा आवडता खंड्या कुत्रा होता, त्याजला पोषाख व जडजवाहीर घालून ते दरबारात जवळ बसवीत. या कुत्र्याचें थडगें संगममाहुली येथें बांधलेलें आहे. माहुलीजवळ एक पाणपोई लोकांस पिण्याचें पाणी

मिळण्याकरितां ठेविलेली होती. त्या जागेस पोईचा माळ म्हणत. तसाच महाराजांनीं एक गेंडा बाळगलेला होता, तो ज्या माळावर बांधीत त्यास गेंड्याचा माळ म्हणत. तेथेंच पुढें दमाजी गायकवाडाचा पेशव्याच्या फौजेनें पराभव केला.

**१३ शाहूनगर.**—बंदोबस्तासाठीं मराठ्यांची राजधानी सातारा किल्ल्यावर स्थायिक झाली. पुढें ती गैरसोयीची वाटून किल्ल्याच्या उत्तरेकडील पायथ्याशीं शाहूनें एक लहानसें शहर वसवून त्यास शाहूनगर असें नांव दिलें. त्यासच हल्लीं सातारा असें म्हणतात.

सातारा हें किल्ल्याचें नांव. शहराचें नांव शाहूनगर ठेवण्यांत आलें. " सर्व कारखाने किल्ला साताऱ्यावरी ठेवून वरता वाडा बांधविला. शाहूतलाव म्हणून तळें केलें. कांहीं लोक वरते, कांहीं खालीं रहावे असें केलें. खालीं शाहूनगर त्यास व वाड्यास पाणी खर्चास नाहीं म्हणून यवतेश्वराहून नहर बांधून आणिले. "

या शाहूनगरीची रचना व त्यांतील भागांचीं नांवें शाहू छत्रपतीच्या अमदानीची आठवण करून देतात. राजकीय महत्त्व संपलें तरी मराठशाहीची सुविख्यात राजधानी म्हणून साताऱ्याचा अभिमान लोकांस वाटतो. शाहूनगराची स्थापना सन १७२१ च्या सुमारास झाली. ता. २८ मार्च, स. १७२१ च्या पत्रांत तांतडीनें वाडा बांधण्याचा उल्लेख आहे. शाहूच्या व पेशव्यांच्या आरंभीं भेटी होत त्या रोजनिशींत नोंदलेल्या आहेत, त्यावरून शहराच्या रचनेचा थांग लागतो. इहिदे अशरीनच्या सफर महिन्यांत म्हणजे स. १७२० च्या डिसेंबरांत शाहूची भेट बाजीरावानें सातारा किल्ल्यावर घेतली. त्यानंतर सात आठ महिन्यांच्या भेटी माची किल्ले सातारा येथें झालेल्या आहेत. त्यापुढें इसन्ने अशरीनच्या जिल्काद महिन्यांत म्हणजे ऑगस्ट स. १७२१ त शाहूनगरनजीक किल्ले सातारा येथें बाजीरावानें शाहूची गांठ घेतली, असा उल्लेख आहे. अर्थात् स. १७२१ च्या सुमारास शाहूनगरची स्थापना झाली. राजधानींतल्या या भेटी शाहू तख्तावर बसून घेई. ‡

‡ म. द. रु. १ पृ. १५७–१६३; पे द. ८–२; ना. रो. २ बाजीरावाचे मुक्काम. सगुणाबाईच्या अपिलांत सर्व वाड्यांचा तपशील परिपूर्ण दिलेला आहे.

शाहूची गादी प्रथम सातारा किल्ल्यावर राज्याभिषेक झाला तेथें होती, तेथून पुढें ती त्यानें शाहूनगरांत माचीवर रंगमहालचा वाडा बांधून तेथें आणिली. तख्ताचे मागील बाजूस चौकांत विहीर होती त्यास तख्ताची विहीर असें म्हणतात. छत्रपतीच्या गादीला मंचक, तख्त, सिंहासन अशीं नांवें दिलेलीं आढळतात. रंगमहालच्या पुढील बखळींत पूर्वी मोठा वाडा होता, त्यांत हें सिंहासन होतें. त्या वाड्यास पुढें सेनापतीचा वाडा म्हणत. तो इंग्रज सरकारनें स. १८६५ सालीं विकला. त्या बखळींत हल्लीं तख्ताची विहीर आहे. प्रतापसिंहानें भवानी पेठेंत नवीन वाडा बांधला आणि जुना वाडा बाळासाहेब सेनापतीस विकला, म्हणून त्यास सेनापतीचा वाडा हें नांव मिळालें. रंगमहालचा वाडा स. १८७४ त जळाला, त्याचा आता अवशेष कांहीं नाहीं.

जिला अदालत म्हणतात, ती इमारत शाहूनें बांधिली, त्या जागेंत पेशवे उतरत आणि त्याच्या जवळच पुरंदऱ्याचा वाडा आहे. शाहूच्या वेळच्या व त्यानंतरच्या स्थितींत शहराची रचना व मोठमोठ्या लोकांचे वाडे ह्या संबंधानें पुष्कळच फेरफार झाला; आणि हल्लींची स्थिति तर त्याहूनही कांहीं वेगळीच आहे. ता. २० मार्च स. १७५३ रोजीं होळीच्या रात्रीं शाहूनगरांत मोठी आग लागून पुष्कळसे वाडे जळाले, त्यात पेशव्याचा, पुरंदऱ्याचा, गोविंदराव चिटणीसाचा, तसेंच नारोराम मंत्री व दत्ताजीपंत वाकनीस ह्याचा असे वाडे एका रात्रींत जळाल्याचा उल्लेख पुरंदरे रोजनिशींत आहे. $ यावरून पेशव्यांनी पुनः आपला वाडा जरूर नसल्यामुळें साताऱ्यास बांधलाच नाहीं असें दिसतें.

शहरातील पेठांचीं नांवें सात वारांवरून ठेविलेलीं असून शिवाय रामाऊचा गोठ, यादवगोपाळ पेठ, व्यंकटपुरा, चिमणपुरा, दुर्गापुरा, केशरकरपेठ, राजसपुरा, पंताचा गोठ, रघुनाथपुरा इत्यादि नांवें ऐतिहासिक व्यक्तींवरून पडलीं आहेत. अदालतीच्या वाड्यापलीकडे खतीबांचें घर व मशीद आहे. माचीवर डफळ्यांची पागा, अक्कलकोटकरांचा वाडा, मंत्र्यांचा वाडा, पिंगळयांचें घर, व शेखमिऱ्याची पागा वगैरे शाहूच्या वेळच्या स्थळांचे थोडेबहुत अवशेष विद्यमान आहेत. शेखमिरे हे आदिलशाहींत वाई प्रांताचे

$ खं. ६–पु. रो. पृ. १०३

सुभेदार असून शाहू आला तेव्हां साताऱ्च्या किल्ल्यावर परशुराम त्रिंबकाच्या हाताखालीं होते. त्यांनी प्रतिनिधीस कैद करून किल्ला शाहूच्या स्वाधीन करून दिला म्हणून शाहूची त्यांजवर मर्जी बसून साताऱ्याशीं त्यांचा निकट संबंध जडला.

माचीच्या संबंधानें हल्लीचा प्रत्यक्ष प्रकार पाहिला असतां त्या वेळची माची म्हणजे स्वप्नसृष्टिच होय, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. यवतेश्वराहून व महादऱ्याहून उत्तम पाणी आणून साताऱ्यांत नळाच्या पाण्याची भरपूर व्यवस्था शाहूमहाराजाच्या वेळेपासून करण्यांत आली होती. मंगळवारांत रामाऊचा गोट म्हणून स्वतंत्र पेठ होती, तेथें नागपूरकर भोसल्यांचा वाडा आहे. भोसल्यांच्या घराण्यांत रामाऊ म्हणून स्त्री होती, तिच्या नांवावरून वरील नांव पडलें. व्यंकटपुरा म्हणून दुसरा एक भाग आहे, तेथें इचलकरंजीकरांचे पूर्वज व्यंकटराव घोरपडे, बाळाजी विश्वनाथाचा जांवई याची पागा असे, त्यावरून या पुऱ्याचें नांव पडलें. यांतच श्रीकृष्णेश्वराचें † प्रसिद्ध देऊळ आहे. तें बाजीरावाचा मामा कृष्णराव चासकर साताऱ्यास मामलेदार होता, त्यानें शके १६४५ त बांधिलें. हें देवालय शहरचे पश्चिम टोंकास यवतेश्वराचे पायथ्यास आहे. देवालय बांधलें तेव्हां त्या भागास सदाशिवपुरा असें नाव असून, पुढें पांच वर्षांनीं व्यंकटराव घोरपडे त्या भागांत वाडा बांधून राहूं लागले, तेव्हांपासून त्यास व्यंकटपुरा हें नांव प्राप्त झालें. स. १७३९ त शाहूनगरांत व बाहेर प्रमुख मंडळी कोण होती, त्यांची यादी पे. द. १७·८४ यांत दिलेली उपयुक्त वाटेल. उत्तर हिंदुस्थानांतून व दक्षिणेकडून अनेक कुटुंबें सावकारी, वकिली, देवतार्चन

† या देवालयांत खालील शिलालेख गाभाऱ्याचे बाहेर दगडी खांबावर आहे.
'श्रीकृष्णेश्वर नामकं पशुपतेर्लिंगं शिवं नार्मदं
ज्योतिर्वित्कुलदीपकृष्णजमहादेवेन संस्थापितम् ।
स श्रीशाहुनृपात्सदाशिव इति प्राप्याभिधानं नवं
लिंगाग्रां कृतवान्सदाशिवपुरीमित्यूचिवान् चास्करः ॥
शके १६४५ शोभकृत् संवत्सरे, माघ शु॥ त्रयोदशी सोमः ॥
कृष्णाजी जनार्दनपंत ' [ता. २७ जानेवारी, स. १७२४]

¶ आशानंद शाहूबरोबर प्रथम दक्षिणेंत आला त्यास शाहूनें मुकासे दिल्हे. सातारा पत्र व्य० भा. २.२५९ पहा.

इत्यादि कामें करणारी शाहूनगरांत येऊन राहिल्याचे उल्लेख पुष्कळच आहेत. आशानंद¶ सुखानंद, मनसापुरी, बनसीपुरी, रूपपुरी, सुमेरगिरि गोसावी § वगैरे अनेक नामांकित गृहस्थ व्यापारी वगैरे त्या नगरांत वास्तव्य करून राहिले त्यांचे अवशेष अद्यापि आढळतात.

चिमणाजी दामोदर म्हणून शाहूचा सरदार असून त्याची पागा सातान्यास होती, त्या जागेस चिमणपुरा हें नांव मिळालें. विष्णु विश्वनाथ पंडित हा राणी सगुणाबाईचा खासगी कारभारी होता, त्याच्याच विद्यमानें धावडशी येथील भार्गवरामाच्या इमारतीचें काम झालें. शाहूस सगुणाबाईपासून एक मुलगी झाली, तिचें नांव राजसबाई. सातान्यास राजसपुरा नांवाची पेठ आहे, ती इच्या नांवानें वसली. यादव गोपाळ खटावकर नांवाचा ताराबाईचा कारभारी शाहूजवळ पहिला मुख्य कारभारी म्हणून राहिला;‡ त्याचे नांवावरून सातान्यास एक पेट वसलेली आहे. या पेठेस पेठखालसा असेंही म्हणत, कारण यादव गोपाळ याला शाहूनें खालशाचे उत्पन्नाची बाब तोडून दिली होती. यावरून यादव गोपाळचे घरास खालशे हें आडनांव पडलें होतें. सातान्यास सचिवांचा वाडा आहे. त्यांस सातान्यास यावें लागे तेव्हां ते आपल्या या वाड्यांत उतरत. सरकारी पीलखान्याचा खर्च सचिवानें भागवावा असें ठरलें होतें. यादवगोपाळ पेठेंत पीलखाना होता तो पूर्वी रंगमहालाजवळ असे. महाराजांची स्वारी रंगमहालांतून निघून अदालतीवरून यादवगोपाळ पेठेंतून वाड्यांत जावयाची, किंवा मोठ्मोठ्या समारंभाचे वेळीं वाड्यावरून भवानी पेठेच्या मोठ्या रस्त्यानें गुरुवारांतून पोईच्या नाक्यावरून परत रंगमहालांत यावयाची, असा परिपाठ होता. सातारा शहरच्या उत्तर बाजूस 'रघुनाथपुरा' नांवाची पेठ हल्लीं करंजें गावांत मोडते. ती बाजीरावाचा मुलगा रघुनाथ याचे नांवावरून वसली.

सोमवार पेठेंत अनगळांचा वाडा होता. त्यांच्यांत परशुराम नारायण अनगळ म्हणून मोठा सावकार होऊन गेला. माहुली येथील रामेश्वराचें देवालय व एक घाट अनगळांनीं बांधिला; आणि महाबळेश्वर येथील कृष्णाबाईच्या देवळाची दुरुस्ती केली. शनिवार पेठेंत बाळाजीपंत नातूंचे दोन वाडे आहेत. प्रतापसिंह महाराजांच्या वेळीं त्यांस जुना वाडा बक्षीस

§ पे. द. ३०.२१४; १८.१८. ‡ त्रै. ६ पृ. ८३

दिला होता तेथेंच नानाफडणीस साताऱ्यास आला असतां उतरे. नातूंच्या वाड्यासमोर सुमंताचा वाडा आहे. सुमंतांचे वंशज कऱ्हाड तालुक्यांत रिसवड येथें राहतात. शिर्क्यांचा वाडा व पंडितरावांचा वाडा हे गुरुवार पेठेंत आहेत. शिर्के याचें मूळनांव 'श्रीक;' शाहूची बायको सकवारबाई व संभाजीची जिजाबाई ह्या शिर्क्यांच्याच घरांतल्या. रविवार पेठेंत पंतांचा गोट आहे, तेथें प्रतिनिधी उतरत. प्रतिनिधींचा वाडाही तेथेंच आहे. साताऱ्यास महाराजाचे खालोखाल संबंध म्हणजे ह्या प्रतिनिधींचा असून, त्यांचा इतिहास या पुस्तकात ठिकठिकाणीं आला आहे. मल्हारपेठ व दुर्गापेठ ही नावें कोणाचे नांवावरून पडलीं, तें समजत नाहीं. बसाप्पा पेठ व केसरकर पेठ यांची उत्पत्ति मागें दिलीच आहे.

**तानशेट भुरके** नांवाचा गृहस्थ शाहू महाराजांचे वेळीं टाकसाळीवर अधिकारी होता. त्यास हा अधिकार शाहूनें राजशक ६७ रौद्रनाम संवत्सरीं म्हणजे सन १७४० त दिला. तानशेटचे पूर्वज आदिलशाहींत संगमनेर येथें टांकसाळीचे कामावर होते. अद्यापि हें घराणें सातारा येथें सावकारी करून नांदत आहे. हल्लींचे त्या घराण्याचे वंशज वासुदेवराव यांचे वडील रामशेट फेब्रुवारी १९१७त वारले, तेव्हां त्यांचें वय १०५ वर्षांचें होतें. सदाचरणानें वागून धंदा करणारीं, मध्यम स्थितींतील अशीं जुनीं कुटुंबें साताऱ्यास पुष्कळ आहेत.

वंशावळ,—**भुरके**
**टंकसाळीचे** कामदार

सुडकशेट
|
तानशेट
|
महादशेट
|
बाळशेट
|
रामशेट
|
वासुदेवराव

या घराण्यांत नानाप्रकारच्या शिक्क्यांचें ठसे उपलब्ध आहेत. साताऱ्यास शाहूच्या राजवाड्याजवळ बाजार भरे, त्यास 'हुजूर बाजार' म्हणत. या हुजूरबाजारांत 'श्री शाहूनगर छापा' अशा अक्षरांचा शिक्का चालत असून, त्या उत्पन्नाची बाब कृष्णाजी नाईक जोशी पोतदार यांजला सोपवून दिलेली होती. $

$ शाहूनगर या कलमांतील माहिती रा. वा. वि. जोशी, सातारा यांनीं मेहेरबानीनें दिली.

# सूची


**अजितसिंग**, मारवाडचा–१३५
**अजीमुल्लाखान**, माळव्याचा–४१
**अंताजी माणकेश्वर**–९१, ९४
**अंताजी शिवदेव**–११०
**अन्वरुद्दीन**, आरकाटचा नबाब-१२३
**अभयसिंग**, मारवाडचा–१३५
**अमीरखान**, दिल्लीचा उमराव-खून ९७
**अर्जुनसिंग धंधेरे**–९३
**अलीवर्दीखान**–पूर्ववृत्त, बंगालची सुभेदारी प्राप्त ५९, भास्कररामाची स्वारी ६१, बादशहाकडे तक्रार ६९, पेशव्याची भेट ७०–७१, भास्कर रामाचा खून ७६–७८, मराठ्यांशीं चौथाईचा तह ८१–८२, मृ० ८२.
**आपाजी आंगरे**–१११
**आबूजीनाईक जोशी**–१२४, बायको भिऊबाई मृ० १६५.
**इंद्रोजीकदम सुपेकर**–१९६, २००, २०२
**ईश्वरसिंग**–९८, ९९, १३६, जयपुरगादीचें युद्ध १३७, १३८, १३९, होळकराची स्वारी १४३, आत्महत्या १४४.
**उद्धव योगदेव राजाज्ञा**–१८६
**कचेश्वर बावा**–१९६
**कमरुद्दीनखान वजीर**–मृ० १००
**कर्नाटक**–व्युत्पत्ति व मर्यादा ११५ मोगलांचे सहा सुभे, पांच नबाब व शहाजी जागीर ११६
**काशीताई**, नानासा० ची मातुश्री-१९
काशीयात्रा १०५-१०८,मृ० १०७
**कुसाजी भोसले**, शाहूचा दासीपुत्र–११७, १२७
**कृष्णराव चासकर**–१०६
**केशवदास**, जयपुरचा प्रधान–१३७ विषप्रयोग मृ. १४३
**कोन्हेरराम कोल्हटकर**–७९, ८९
**खंडेराव होळकर**–१३७
**गंगाधर यशवंत चंद्रचूड**–९५, १०७, १४३, मराठ्यांची जयपुरास कत्तल १४४
**गंगाधर स्वामी चाफळकर–मृ०**१५२
**गंगाराम** महाराष्ट्रपुराणकर्ता–६३
**गजराबाई बांडे**, शाहूची कन्या–१५४ १८६
**गोपिकाबाई** नानासा० बायको–लग्न २०
**गोविंद तिमाजी**, हिंगण्यांचा हस्तक–१४४
**गोविंद बल्लाळ खेर**–८६, ८७, ९२, शाहूच्या अस्थी गंगाप्रवाहांत १७९
**गोविंदराव चिटणीस**–१५४, १६० १६३, १७१, सकवारबाईचा रोष १७२, १७३ राज्यभार घेणाराचा तपास १७२, १७७, शाहूचा विश्वास १९९

**चंदासाहेब,** दोस्त अलीचा जावई–३७, ५८, ६०, त्रिचनापल्ली कपटानें काबीज ११७, राणीची आत्महत्या ११८, कैद व खटपटी साताऱ्यास १२१, सुटका १२२, निजामाशीं संबंध १२२, १९७

**चिमाजी आपा**–१९, मृ० २१ व ४५

**चिमणाजी दामोदर**–२०७

**जगत्राज,** छत्रसाल पुत्र–९२

**जनार्दनपंत,** नानासा० बंधु–३३, ४०, साताऱ्यास १७२

**जयसिंग** सवाई, जयपुरचा–४०, पेशव्याशीं भेट ४६–४७, मृ. ५१, ९१, मृत्यु व पश्चात् कलह ९८ व १०२, राजपुतांचा करार व मृ० १३६, शाहूशीं स्नेह १९६.

**जयाप्पा सिंदे**–होळकराशीं बेबनाव ४१

**जानोजी निंबाळकर**–साताऱ्यास १६६

**जानोजी भोसले,** रघूजी पुत्र बंगालवर स्वारी ८१

**जिजाबाई** राणी कोल्हापुरची–२२, १२५, १६७

**जिवाजी खंडेराव चिटणीस**–मृ. १५२

**जोत्याजी केसरकर**–१८६, २००

**ज्योतिबा सिंदे**–खून ८६ व १०२

**झाशी**–स्थापना व कारभारी ८७

**झीनतुन्निसा बेगम**–१९६

**ठाकूरदासबावा**–१९६, २०१

**डूमा, फ्रेंच गव्हर्नर**–चंदासाहेबाचे कुटुंबास आश्रय ११९

**तानशेट भुरके** टांकसाळवाले–२०८

**ताराबाई राणी**–१६५, नातू गुप्त १७१, १७७, रामराजाचा पुरस्कार १७८.

**तुळाजी आंगरे**–सरखेलीवर दाखल १०८, गोवळकोट व अंजनवेल काबीज १०९, शाहूशीं भेट ११०, मुडागडची लढाई १११

**त्रिंबक विश्वनाथ पेठे**–रघूजीकडून कैद ६८

**दमाजी गायकवाड**–माळव्यावर स्वारी ५२ व ६७

**दादोबा प्रतिनिधि,** जगजीवनराव–स्थापना १५२, कैद १८०

**दादो भीमसेन,** पे० चा सरदार–९४

**दामोदरपंत हिंगणे**–पत्र ९७

**दुर्लभराम,** जानकीरामाचा पुत्र–नागपुरास कैदेंत ८०

**देवराव मेघश्याम**–शाहूचा सोबती १६८

**दोस्तअली,** कर्नाटक नबाब–११७, लढाईत मृ. ११८.

**दोस्त महंमदखान भोपाळकर**–९१

**नागोराव मेघश्याम,** शाहूचा सोबती–१६८

**नानासाहेब,**बाळाजी बाजीराव पेशवा-जन्म व प्रथमायुष्य १९-२० संभाजीशीं गुप्त करार २१, पेशवाईचीं

वस्त्रें २५, कारभारी व विरोधक २६, पहिले उद्देश २७, हिशेबी कारभार २८, कामाचा उरक २९, धोरण ३०, शाहूचें संधान ३१, रघुनाथरावास उपदेश पत्र, तत्कालीन शिक्षण ३२–३३–३५, पहिला उत्साह व जूट ३५, जयसिंग सवाई भेट ३६ व ४६-४८, स्वाऱ्या ३९, निजामाची भेट ४४, माळव्याचें फर्मान ४९–५०, महाराष्ट्र पुराण ६३, रघूजीशीं तेढ व बुंदेलखंडांत छावणी ६५-६६, त्रिवेणीचीं स्नानें, बंगालस्वारी व रघूजीची भेट ७०, अलीवर्दीची भेट ७१, भास्कररामाचा खून ७६-७८, ओर्छा झाशी काबीज ८५-८७, माळव्यांत पहिली छावणी ८८, रघूजीशीं बाह्य देखावा ८९, भेलसा काबीज ९०, सय्यद लष्करखान भेट ९०, सुरंज भेलसा स्वारी ९१, बुंदेल्यांशीं संग्राम ९२–९५, नेवाईची स्वारी ९८-१००, माधवसिंग भेट व यशवंतराव पवाराची समजूत ९९, ब्रह्मनदीचें पत्र, महाराष्ट्रीय जीवन १०२–१०३, मातुश्रीची काशीयात्रा व रुसवा १०५–१०७, आंग्रे बंधूंच्या तक्रारी १०८, माणिकगडची भानगड व मुडागडची लढाई १११, चेऊल राजकोट पाडला ११२, बाबूजी नायकास ओढलें १२६, राजपुतांशीं बेबनाव १३५, राजपूत युद्धांत धरसोड १३८–१३९, भीषण काल १४०, सिंदे-होळकरांचा कलह १४१, शाहूचा रोष व पदभ्रष्टता १५५–१५८, शाहूस दटावणीचें पत्र १५९, दानतीवर आक्षेप १६३, नासिरजंगाची भेट व स्नेह १६६, सकवारबाईचा विरोध १६७, जिजाबाईशीं स्नेह १६८, साताऱ्यास फौज व बंदोबस्त १७२, शाहूकडून राज्याची सनद १७३, सकवारबाईच्या सतीचा प्रकार १८०–१८२

**नारायण दीक्षित पाटणकर**–१०७

**नारो आपाजी तुळसीबागवाले**–पुणें शहरावर नेमणूक १५५

**नारो रायाजी ठाकूर गोडे**–मुडागडची लढाई १११

**नारोशंकर**–झाशी स्थापना ८६, ९१, १०१

**नासिरजंग**–बापाशीं बंड ४१ व १२२, बाबूजीवर चढाई १२७, १२९

**निजामुल्मुल्क असोफजा**–पुत्राचा बंडावा ४१-४३, मिलाफ ४४, पेशव्याशी भेट ४४, ९०, मृ० १०० चंदासाहेबाशीं संबंध व त्रिचनापल्ली काबीज १२३

**पिलाजी जाधव**–४७, ४८, ५०, अलीवर्दीची भेट ७०, ८८, ९१ १६१

**प्रतापसिंह**, तंजावरचा राजा–१२२

**फत्तेसिंग भोसले**–कर्नाटक स्वारी ११७ व विजय १२२, कारभार १२४, १२५, १३१, १६२

**फैजमहंमदखान भोपाळकर**–९१

**बराणजी मोहिते**, सगुणाबाईचा भाऊ–५२

**बसवंत खोजा**–२००, २०२

**बळवंतसिंग**, काशीचा राजा--१०६

**बाजीराव पेशवे**–मृ० १९

**बाबूजी नाईक जोशी**–पेशवाईची खटपट २३ व ११९, पुण्यांतून उच्चाटन, बारामतीस वास्तव्य ५१–५३ पेशव्याच्या मातुश्रीची दक्षिणयात्रा १०५, निजामाशीं तेढ १२४, १२५, पेशव्याकडून पायओढ व निजामाकडून पराभव १२६, नासिरजंगाचा विरोध १२७, त्रागा १२९, दुर्दशा १३० १३१, निजामाची भेट १४१, १५५, शाहूच्या भेटीस मनाई १६९.

**बाबूराव कोन्हेर**, नागपुरचा कारभारी ७९, ८७.

**ब्रह्मेन्द्रस्वामी**–१९६

**भवानीबाई**, शाहूची बहीण–१८६, १८७.

**भास्करराम कोल्हटकर**–५८, ६० बंगाल स्वारी ६१, बंगाल काबीज व खून ६३, महाराष्ट्र पुराण ६३, दुर्गापूजेचा विध्वंस ६४, ७३, अमानुष खून ७६--७८, स्त्री ताईबाई व पुत्र काशीराव भास्कर ७९.

**भिऊबाई**, बाजीराव बहीण-मृ. १६५

**मल्हारकृष्ण**, अलगीवाले–ओछींवर ६६, खून ८६.

**मल्हारराव होळकर**–धार काबीज ४६, बादशहास जामीन ५०, पुत्र व सून ९७, १३९, सिंद्यांशीं बेबनाव १४१, राजपुतांकडून फौजेची कत्तल १४४

**महादेवभट हिंगणे**–३५, ४०, पुण्यास ४१, माळव्याचें फर्मान ४८, पुत्रास पत्र ७४, खून व कामगिरी ९६ व १०४, चार पुत्र ९६

**महादोबा पुरंदरे**–२६, ४७, ५२, ८८, उत्तरछावणीची सूचना ८९, १०१, १२८, १५४, दगा १६६, १७८.

**माधवसिंग**, जयपुर राजा–पेशव्याची भेट ९९, १३६, भावाशीं युद्ध १३७, १४०.

**मानाजी आंग्रे**–१९, ४५, १०८, ११०, १११.

**मायाजी फडतरे**, शाहूचा सेवक–२००, २०३

**मीनाबाई**, राणोजी सिंद्याची स्त्री–९७

**मीरआसद**, दोस्त अलीचा दिवाण–११८, १२०, रघूजीच्या कैदेंत १२०.

**मीरकासीम**–भास्कर रामाचा खून ७८.

**मीरजाफर**–६४, भास्कर रामाचा खून ७८.

**मीरहबीब**–६०, भास्करपंतास सामील - ६२, ८०, ८१ मृ. ८२

**मुजफ्फरजंग**, निजामाचा नातू–१२४ शाहूविषयीं उद्गार १८३.

**मुधोजी भोसले**–रघूजीचा पुत्र-शाहूस दत्तक देण्याचा विचार १५७, दुरुस्ती पहा.

**मुरारराव घोरपडे**–२९, १२०, १२३ १२४, १२८, १२९, सदाशिव भाऊशीं भेट १३०, १३१, १६५, १६७.

**मुस्ताफाखान**–अलीवर्दीचा सेनानी–६२, ६४, ७०, भास्कररामाचा खून ७६, मृ. ८०

**मूर्तजाअली**–नबाब–१२३

**मूर्शीदकुलीखान**, बंगालचा नबाब–मृ० ५८

**मेगोजी हुकेबारदार**–शाहूचा सेवक २००

**मोरोपंत सबनीस**–१८६

**यमाजी शिवदेव**, मुतालिक प्रतिनिधीचा–१०८, ११०, १५५, कैद १८०

**यशवंतराव पवार**-५०, धारचा कबजा ६७, पेशव्याशीं रुसवा व समेट ९९

**यशवंतराव पोतनीस**–१३१, १५४

**यार महंमदखान**, भोपाळकर-९१,९२

**येसाजी भोसले**, शाहूचा दासीपुत्र ११०, १२५, १२७, याचा पुत्र बाळगोपाळ १८६

**येसूबाई**, शाहूची मातुश्री–१८६

**रघुनाथ गणेश**, पेशव्याचा वकील निजामाजवळ–१२८

**रघुनाथराव पेशवे**–स्वभाव ३३

**रघुनाथ हरि नेवाळकर**–८७

**रघूजी भोसले**–पेशवाई बाबूजीस देण्याची खटपट २३, बाबूजीचें साह्य ५२, साताऱ्यास ५२, पेशव्याशीं खटका ५७ व ५९, महाराजांकडे तक्रार ६८, पेशव्याशीं व अलीवर्दीखानाशीं संग्राम ७१-७३, समेट ७५ व ८९, कोल्हटकरांशीं घरोबा ७९, बंगाल जिंकला ८०-८२, दुर्लभरामास कैद व दंड ८९, कर्नाटक स्वारी ११७-१२२, फ्रेंचांस धमकी ११९, मीर आसदशीं करार १२०, बडासाहेबाचा पाडाव १२१, शाहूकडून गौरव १२२, सगुणाबाईचें साह्य १२५, भास्कर–रामाचा खून व प्रतिकार १२५, निजामाची भेट १४१, १५५, शाहूची भेट साताऱ्यास १६० व १६६. १६५.

**राजसबाई निंबाळकर**–शाहूची कन्या १८६.

**राजामल्ल,** अ० राजमल्ल ऊ० मलजी जयपुर प्रधान–४८, मृ. १३७.
**राणोजी सिंदे**–मृ. ९७, बायको मीनाबाई.
**राधाबाई पेशवे**–१९, गृहदक्षता ३४, ५२.
**रामाजी महादेव,** कोंकणसुभा–आंगऱ्यांचा विरोध १०८, ११०
**रामचंद्रबावा सुखटणकर**–३५, ४७, ६६, ९४, राणोजीशीं स्नेह व जयापाशीं विरोध ९५, पेशव्याचा इतबार १००, १०१, १०७, १५१, १६०, १६४.
**रामराजा**–२२, तपास १६५
**रामाऊचा गोठ**–२०६
**रामोजी** ऊ. कुवरजी शिर्के–मृ. १६९, वंश १७९
**रायाजी भोसले,** रघूजीचा चुलत भाऊ–कलह १६६.
**विठ्ठल विश्वनाथ घिसास,** शाहूचा सोबती–२०२
**विरूबाई**–मृ० ४५, १५२, माहुलीस छत्री १६९, १८६, १९८, २००, २०३.
**विश्वासराव लक्ष्मण,** नारोशंकरचा पुतण्या–८७.
**विसाजी दादाजी** – पेशव्याच्या मातुश्रीचा कारभारी–१०६
**वीरसिंह देव,** बुंदेला ओर्छेकर–८६
**व्यंकाजी देवराव,** रघूजीचा वकील दिल्लीस–६८
**व्यंकाजी शिवदेव**–पेशव्याचा वकील आरकाट येथें–४५
**शंकराजी महाडिक तारळेकर,** शाहूचा मेहुणा–१८५, १८७
**शहानवाजखान**–कैद ४३
**शाहू छत्रपति**–नानासा० स पेशवाई २५, पेशवा–रघूजी समेट ७५, ९०, निराशेचा प्रादुर्भाव १४९ व्यग्रतेचीं कारणें १५०–१५२, राण्यांच्या व्यवस्थेची याद १५३, विवंचना १६०, वनवासवाडीस तृणगृह १६८, प्रकृति विकोप १७०, नाथाजी व कुशलसिंह या राजपुतांस दत्तक घेण्याचा विचार १७१, मृ० १७४, अंत्यविधि १७७, समकालीन लोकमत १८२–१८३, विद्येस उत्तेजन १८४, महाडिकास जरब १८५, परामर्श १८५, कुटुंब परिवार, स्त्रिया नाटकशाळा संतति १८६, मुली १८७, दिनचर्या शिकार १८७, कर्मणुकी व्यवसाय १८८, बाहेरील जिनसांचा शोक १८९, सौजन्याचें सामर्थ्य, राज्यविस्तार, राजपूतांचा स्नेह १९०, भूत दया व अहिंसा १९०, व्याप व नशीबाचे खेळ १९०–१९३, आश्रित कुटुंबें १९२, राज्जवृद्धीची मीमांसा १९४, शाहू नांवाची उत्पत्ति १९५, सर्वधर्मांचा आदर व मानवी

समता १९६, गुणसमुच्चय विश्व कुटुंब १९८, दोषाविष्करण १९९, लोभांतील मंडळी २०१, आवडता कुत्रा २०३, शाहूनगरची रचना २०४, नगरांतील वाडे व पेठा २०५

**शिवभट साठे**, कटकचा कारभारी–८२

**शुजाखान**, बंगाल सुभेदार–मृ० ५८

**शेटीमलीक**, शाहूचा सेवक–१६३

**शेट्याजी संकपाळ**, शाहूचा सेवक–२००

**श्रीपतराव प्रतिनिधि**–मृ० १५१

स्त्री राधाबाई सती,

**सकरवारबाई**, राणी–१२५; १३५, १५२, वर्तनाचे निर्बंध १५३, १५५, १६५, बापाचा मृ० १६९–१७०, ताराबाईचा मूल खोटा १७२, शाहूचा प्रतिपाळ १७२, घराणें १७९, सती १७८ १८२, १८६

**सखारामबापू बोकिल**–१०१, १२८, १६१

**सगुणाबाई राणी**–११०, १५३, वर्तनाचे निर्बंध १५३, रघूजीस निरोप १६६, प्रकृति बिघाड व मृ० १६९, मुधोजीस दत्तक घेण्याचा बेत १८६, दुरुस्ती पहा.

**सदाशिवरावभाऊ**-पुरंदऱ्यास उपदेश-पत्र व स्वभाव ३३, कर्नाटकचा उद्योग १२८, मुराररावाची भेट व कोल्हापुरची प्रधानकी १३०, कर्नाटक स्वारी १६१, बाबूजी-नायकास शह १६७

**सफदरअली, नबाब**–मृ० ६०, ११९, १२३

**सफदरजंग**, मनसूर अलीखान–१४५, महादेव भटाचा खून ९६

**संभाजी आंगरे**–मृ० १०८

**संभाजी**, कोल्हापुर छत्रपति-पेशव्याशीं करार २१, १२५, साताऱ्यास आगमन १६४–१६५, १६६, सकवारबाईचा पाठिंबा १७२, १७४

**संभासिंग**, छत्रसालाचा नातू–९२ ९४

**सय्यद लष्करखान**–४३, पेशव्यांची भेट ९०, १२८

**सर्फराजखान**–घेरियाच्या लढाईंत मृ० ५९

**साबाजी भोसले**–बंगाल स्वारींत ८१

**सुखानंद**, शाहूचा स्नेही–१६८

**हिरदेसा**, छत्रसाल पुत्र–९२